॥ ॐ तत्सत् ॥

भाग १ ला

श्रीमद्भगवद्गीतार्थ–

# रहस्यदीपिका

[ मूळ श्लोक, पदशः अन्वय, मराठी अर्थ आणि
विस्तृत विवरण यांसह ]

लेखक

गीतावाचस्पति सदाशिवशास्त्री भिडे

आवृत्ति दुसरी

सन १९२८ | कागदी २॥ रु. कापडी ३ रु. | शके १८५०

॥ ॐ तत्सत् ॥

श्रीमद्भगवद्गीतार्थ-

# रहस्यदीपिका

[ मूळ श्लोक, पदशः अन्वय, मराठी अर्थ आणि
विस्तृत विवरण यांसह ]

लेखक

गीतावाचस्पति सदाशिवशास्त्री भिडे

आवृत्ति दुसरी

सन १९२८ | कागदी २॥ रु. कापडी ३ रु. | शके १८५०

# अर्पणपत्रिका

यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम् ।
स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः ॥

ज्या महात्म्यानें गीतारहस्याच्या द्वारें अनादि
कर्मयोग-शास्त्राचें पुनरुज्जीवन करून स्वतः-
च्या शुद्ध आचरणानें तो सिद्धान्त अखिल
जनतेच्या अंतःकरणांत प्रतिबिंबित
करून ठेवला आहे, त्या स्थितप्रज्ञ,
कर्मयोगी, जनताहृदयनिवासी लो०
**बाळ गंगाधर टिळक यांस**
गीतार्थ-रहस्यदीपिका अनन्य-
भक्तिपूर्वक समर्पित असो.

—**सदाशिवशास्त्री भिडे**

# पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना

अध्येष्यते च य इमं धर्म्यं संवादमावयोः ।
ज्ञानयज्ञेन तेनाहमिष्टस्यामिति मे मतिः ॥

सन १९१४ सालीं लोकमान्यांनीं गीतारहस्य प्रसिद्ध केल्याबरोबर विरुद्ध टीकेचें बरेंच काहूर उडालें होतें हें वाचकांना स्मरत असेलच. त्यांतील बहुतेक टीकाकारांचा रोंख असा होता कीं, लोकमान्यांनीं गीतारहस्य-निबंधांत प्रतिपादन केलेला सिद्धान्त त्यांनीं केलेल्या गीतेंतील श्लोकांच्या वाक्यार्थावरून ठरत नाहीं, सबब कर्मयोगशास्त्राविषयींचें आपलें मत त्यांनीं स्वतंत्र प्रतिपादन करावें; पण तेंच गीतेचें तात्पर्य आहे असें त्यावरून सिद्ध होत नाहीं.

वरील वादविवादाची धुमश्चक्री चालू असतां हरिपूर येथें 'रहस्यकार व भाष्यकार' या विषयावर माझें व्याख्यान झालें. ह्या व्याख्यानाचा गोषवारा वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झाल्यावर टीकाकारांचे मुख्य मुख्य सेनापति बरेंच गरम झाले व त्यांनीं आपल्या टीकेचा हल्ला माझ्यावरही सुरू केला. त्यामुळें प्रस्तुत ग्रंथ लिहिण्याचा माझा उत्साह द्विगुणित होऊन, मी ह्या कामास प्रवृत्त झालों.

लोकमान्यांनीं लिहिलेल्या रहस्य-निबंधांतील कर्मयोगाचा सिद्धान्त गीतेच्या मूळ श्लोकांतूनच वाक्यार्थाच्या नियमांस अनुसरून कसा सिद्ध होतो हें दाखवावें, हा ह्या ग्रंथाचा मुख्य उद्देश आहे. प्रतिपक्षाच्या टीकांमुळें किंवा पूर्वग्रहामुळें, गीतेच्या मूळ श्लोकांचें तात्पर्य कर्मयोगपर कसें आहे हें ठरविण्याच्या बाबतींत बहुजनसमाजाचें अंतःकरण बरेंच साशंक आहे. ही शंका दूर करण्याचे कामीं ह्या ग्रंथाचा थोडा जरी उपयोग झाला तरी वरील हेतु सिद्धीस गेला असें म्हणण्यास हरकत नाहीं.

१९१५-१६ चे सुमारास ही टीका लिहून पुरी झाल्यावर लोकमान्यांकडे ती पाठविली. आमची हस्तलिखित प्रत सबंध वाचून झाल्यावर, त्यांची रहस्यसंजीवनी व आमची रहस्यदीपिका यांतील भिन्न भिन्न स्थळांविषयीं समक्ष चर्चा करण्याकरितां लो॰ टिळकांनीं आम्हांस बोलाविलें व आम्हीं पुण्यास सुमारें १०-१२ दिवस त्यांच्याशीं समक्ष चर्चा केली. त्यांत रहस्यसंजीवनीहून भिन्न

असलेलीं बहुतेक स्थळें आपणांस मान्य आहेत: असें त्यांनीं सांगितलें; आणि " कर्मयोगशास्त्रांतील गीतारहस्य हा आकरग्रंथ व तुमचें पुस्तक हा प्रकरणग्रंथ म्हणतां येईल." असा त्यांनीं आशीर्वादही दिला. हें त्यांचें आशीर्वचन प्रस्तुत पुस्तकावर लेखी घ्यावें असा आमचा फार हेतु होता; परंतु पुस्तक प्रसिद्ध करण्यास आजवर अनेक अडचणी आल्यामुळे ती गोष्ट तशीच राहून गेली. तथापि त्यांच्या मुखांतून निघालेल्या स्वयंस्फूर्त आशीर्वचनावर आमचा पूर्ण भरंवसा आहे.

विद्यार्थिदशेंत शांकरभाष्याचें अध्ययन करीत असतांच गीतेच्या मूळ श्लोकांच्या वाक्यार्थांचा विचार करण्याची प्रवृत्ति आमचे गुरु के० वे० शा० सं० बाळशास्त्री तैलंग यांच्यापासूनच आम्हांस मिळाली होती. त्यामुळे गीतेंत कर्मयोग प्रतिपादन केलेला असावा, असें तेव्हांपासूनच वाटूं लागलें होतें. तेव्हांपासून गीतेच्या मूळ ग्रंथाचा व्यासंग सुरू असल्यामुळे, गीतेचें तात्पर्य कर्मयोगपरच आहे, असा मनाशीं ठाम निश्चय झाला. परंतु हा निश्चय लोकांपुढे जाहीरपणानें मांडण्याचा अधिकार लोकमान्यांसच होता व तदनुसार त्यांनीं गीतारहस्य प्रसिद्ध केल्या-बरोबर '**उक्तार्थे संमतिः**' या न्यायानें गीतार्थाच्या तात्पर्यनिश्चयास मूर्त स्वरूप देणें आमच्यासारख्यांना सोईचें झालें.

हा ग्रंथ तयार करण्याचे बाबतींत ज्याचे श्रम सर्वस्वीं कारणीभूत झाले आहेत ते माझे वडील बंधु ती० भिकाजी गोपाळ भिडे यांचे आभार मानण्यापेक्षां त्यांचे चरणीं प्रणाम करणेंच उचित होय. ज्या मित्रमंडळींनीं या ग्रंथ-लेखनाच्या कामीं मला निस्वार्थ बुद्धीनें साहाय्य केलें त्या सर्वांचा मी आभारी आहें.

नजरचुकीनें राहून गेलेलीं दोषस्थळें काढून टाकण्याचे कामीं सहृदय वाचकांनीं मला सहाय्य करावें अशी माझी त्यांस सप्रेम विनंति आहे, आणि हा ग्रंथ लोक-मान्यांस म्हणजे महाराष्ट्राच्या आत्म्यासच अर्पण केला असल्यामुळें, महाराष्ट्र माझी ही विनंति मान्य करील अशी मला उमेद आहे.

शेवटीं भगवान् श्रीकृष्णांनीं प्रगट केलेला, समर्थांनीं उपदेशिलेला व लोक-मान्यांनीं प्रतिपादन केलेला अभ्युदयनिःश्रेयसदायक कर्मयोग आर्यांच्या अंतः-करणांत सदैव जागृत राहो, अशी योगेश्वर भगवान् श्रीकृष्णाची प्रार्थना करून ही प्रस्तावना पुरी करितों.

**सदाशिवशास्त्री भिडे**

# लेखकाचे दोन शब्द



**गीता सुगीता कर्तव्या । किमन्यैः शास्त्रसंग्रहैः ॥**
**या स्वयं पद्मनाभस्य । मुखपद्माद्विनिःसृता ॥**

—भीष्मपर्व, अ. ४३, श्लोक १

**रहस्यदीपिकेची** दुसरी आवृत्ति काढण्याचा सुप्रसंग लाभल्याबद्दल **प्रथम परमेश्वरास** भक्तिपूर्वक वंदन करणें हें माझें आद्य कर्तव्य होय. गीताशास्त्राचें **जसजसें काळजीपूर्वक** अध्ययन करावें तसतसें राष्ट्रधर्माचें तेजस्वी तात्त्विक **स्वरूप मनाला अधिकाधिकच** पटत जातें; व आमच्या राष्ट्राची सर्वांगीण उन्नति गीतेंत प्रतिपादन **केलेल्या** कर्मयोगानेंच होईल, हा भरंवसा उत्तरोत्तर दृढमूल झाल्यावांचून राहात नाहीं. भगवद्गीता हें आमचें नुस्तें एकांगी तत्त्वज्ञान नसून **हिंदूंच्या राष्ट्रधर्माचें तें त्रिकालाबाधित अधिष्ठान** आहे, हें तत्त्व आतां सर्वांनाच पटूं लागलें आहे.

गीतेंतील राष्ट्रधर्माचीं तत्त्वें निरनिराळ्या मार्गांनीं समाजांत प्रचलित होणें **अत्यंत** अगत्याचें आहे. अशा दृष्टीनें अद्यापि पुष्कळच प्रयत्न व्हावयास पाहिजे. **अशा** प्रयत्नांना मदत व्हावी ह्या उद्देशानेंच या द्वितीयावृत्तींत शक्य ती सुधारणा **केली** आहे. आमचे मित्र **श्री० कृष्णाजी महादेव लिमये** (नाशिक) यांनीं **अत्यंत** परिश्रमपूर्वक ज्या सूचना केल्या त्यांचा मला या आवृत्तीचे वेळीं फारच **चांगला** उपयोग झाला. रहस्यदीपिकेचें समग्र पुस्तक अत्यंत काळजीपूर्वक वाचून त्यांतील प्रश्नांवर समक्ष वादविवाद करून सर्व सूचनांचें लेखी टिपण करून **देणारे** हेच एक गृहस्थ मला भेटले. याबद्दल त्यांचे आभार मानावे तितके थोडेच **आहेत.** वाचकांनीं याप्रमाणें रहस्यदीपिकेचा काळजीपूर्वक अभ्यास करून त्यांतील **प्रश्नांवर** लेखी अगर तोंडी चर्चा केली तर हिंदुधर्मातील राष्ट्रीय ब्रह्मविद्येचें **स्वरूप** प्रगट होण्यास फारसा उशीर लागणार नाहीं. यासाठीं रहस्यदीपिकेचें **असें** काळजीपूर्वक अध्ययन करण्याबद्दल वाचकांस आग्रहाची विनंति आहे.

प्रस्तुत आवृत्ति छापण्याची जबाबदारी **गीता-धर्म मंडळानें** घेतल्यामुळें माझे **पुष्कळच** श्रम वांचले आहेत. निष्कामबुद्धीनें मंडळाचे कार्य करणारे श्री० **गजाननराव केतकर** यांनीं सर्व कामाचा बोजा आपल्या शिरावर घेतला म्हणूनच ही

**रहस्य**दीपिकेची दुसरी आवृत्ति निघाली. या आवृत्तीस गीता-धर्म-मंडळाचे एक घटक, गीताजयंत्युत्सवाचे उत्पादक व मंडळाच्या **गीतार्थ-चर्चा मंडळाचे अध्यक्ष दे० भ० जनार्दन सखाराम करंदीकर**,बी.ए., एल्एल्. बी., उपसंपादक केसरी, यांनीं मार्मिक व विद्वत्तापूर्ण अशी प्रस्तावना परिश्रमपूर्वक लिहून दिल्यामुळें या आवृत्तींत महत्त्वाची भर पडून तिची उपयुक्तता वाढली आहे. श्री० **करंदीकर** यांचे या 'पुरस्कारा'बद्दल कृतज्ञतापूर्वक आभार मानणें हें माझें कर्तव्य होय. श्री० **परशुराम पुरुषोत्तम साठे** यांनीं छापखान्याकडे देण्याची प्रत तयार करण्याचे बाबतींत चांगलें साहाय्य केलें याबद्दल त्यांचेंहि आभार मानणें जरूर आहे. शेवटीं ज्यांनीं राष्ट्रधर्मबुद्धि जागृत केली त्या **लोकमान्य बाळ गंगाधर टिळकांस** अभिवादन करून हे 'दोन शब्द' पुरे करतों.

**सदाशिवशास्त्री भिडे**

# रहस्य-दीपिकेचा पुरस्कार



"श्रीमद्भगवद्गीता हा आमच्या धर्मग्रंथांपैकीं एक अत्यंत तेजस्वी व निर्मल हिरा आहे." —गीतारहस्य, पृष्ठ १

लोकमान्य टिळकांनीं गीतारहस्य ग्रंथ लिहून गीतेंतील उपदेश कर्मयोगपर आहे असें सिद्ध केल्यापासून ज्यांच्या मनोभूमिकेंत कर्मयोगपर अर्थाचें पूर्वीच बीजारोपण झाले होतें, पण प्रतिकूल वातावरणामुळें ज्या बीजाचा अंकुर वर डोकें काढूं शकला नव्हता, त्यांच्या मनोभूमिकेंतील तो अंकुर फोफावण्यास वाव झाली. **गीतावाचस्पति सदाशिवशास्त्री भिडे** यांची मनोभूमिकाहि वर निर्दिष्ट केलेल्या स्वरूपाचीच होती. गीतेचा सगळा रोख कर्मयोगाचा उपदेश करण्याकडे आहे असें त्यांना पूर्वीपासूनच वाटत होतें. परंतु गीतारहस्यकारांनी तो सिद्धान्त निर्भयपणें जगापुढें मांडीपर्यंत भिडेशास्त्री यांनाहि तें मत स्वतःच स्वतंत्रपणें पुढें मांडण्याचें धाडस करवले नाहीं. पण लोकमान्यांचा ग्रंथ प्रसिद्ध होतांच त्यांच्या कर्मयोगाच्या झेंड्याभोंवतीं जे अनेक वीर गोळा झाले त्यांत भिडे-शास्त्री हे वीर पहिले होते असें म्हणण्यास हरकत नाहीं. लोकमान्यांनीं लिहिलेल्या गीतारहस्यांतील कर्मयोगाचा सिद्धान्त गीतेच्या मूळ श्लोकांतूनच कसा सिद्ध होतो हें दर्शविण्याच्या हेतूनें त्यांनीं स्वतः गीतेचें शास्त्रीय पद्धतीनें विवरण करण्याचें काम अंगावर घेतलें आणि रहस्यदीपिकेची पहिली आवृत्ति पांच वर्षांपूर्वी प्रसिद्ध केली. गीतारहस्यांतील सिद्धान्तांचेच यांत मुख्यतः स्पष्टीकरण असल्यानें या ग्रंथाला शास्त्रीबुवांनीं **रहस्यदीपिका** हें नांव दिले आहे व तें अगदीं अन्वर्थक आहे. गीतारहस्यांतील बहुतेक प्रमुख सिद्धान्तांचें यांत विवरण असल्यामुळे या ग्रंथानें गीतारहस्यांतील सिद्धांतावर चांगलाच प्रकाश पडतो आणि त्यांस पुष्टि मिळते. शिवाय गीतारहस्यांतील जीं कित्येक स्थळें पूर्वी दुर्बोध वाटत होतीं त्यांचाहि उलगडा या रहस्यदीपिकेनें उत्कृष्टपणें होतो.

रहस्यदीपिका ग्रंथ लिहितांना कोणत्याहि विशिष्ट टीकाकारांना उत्तर देण्याचा ग्रंथकाराचा हेतु नसल्यामुळें रहस्यदीपिकेंत कोणत्याहि मताचें साक्षात् खंडन किंवा मंडन नाहीं. परंतु गीतेंतील मूळ श्लोकांचें शास्त्रीय पद्धतीस अनुसरून यांत

विवरण केलेलें असल्यामुळें तें वाचल्यानें गीतेच्या श्लोकांतून कर्मयोगपर अर्थच कसा निघतो व गीतेंतून संन्यासपर काढलेला अर्थ मूळ श्लोकाला कसा सोडून आहे, याविषयीं वाचकांची आपोआपच खात्री पटते. अभ्युदय व निःश्रेयस हीं धर्माचीं दोन अंगें असल्यानें तीं परस्परविरोधी असूं शकत नाहींत; तीं परस्परांस पोषक अशींच असलीं पाहिजेत आणि म्हणूनच निःश्रेयसार्थी पुरुषानें प्रवृत्ति-मार्गाचें अवलंबन केल्यास त्याला अभ्युदयपूर्वक मोक्ष मिळतो असेंच गीतेंतील प्रतिपादनावरून शास्त्रीबुवांनीं सिद्ध केलें आहे. आणि 'ज्ञानादेव तु कैवल्यम्' या सिद्धान्ताला बाध न येतां कर्मयोगनिष्ठा मोक्षप्रद होते असेंहि शास्त्रीबुवांनीं दाखविलें आहे. या संबंधांत कर्मयोग आणि संन्यासयोग या दोन निष्ठांची तुलना करून त्यांच्यांत सारखेपणा कोठपर्यंत आहे व भिन्नत्व कोठें आहे हें त्यांनीं प्रस्तावनेंत तुलनात्मक कोष्टक देऊन उत्तम रीतीनें सिद्ध केलें आहे.

गीतेंत कर्मयोगाचेंच प्रतिपादन केलें आहे असें शास्त्रीबुवांनीं आपल्या अर्थ-विवरणांत जागोजागीं सिद्ध केलेंच आहे. पण गीतेंतील सर्वच उपदेश समष्टि-धर्माचा म्हणजे राष्ट्रधर्माचा आहे. तो व्यष्टिधर्माचा म्हणजे वैयक्तिक धर्माचा नाहीं. हेंहि ठिकठिकाणीं दाखवून शास्त्रीबुवांनीं कर्मयोगाचें दृढीकरण केलें आहे. संन्यास मार्गाचा उपदेश हा व्यक्तिधर्मांतच येऊं शकतो. राष्ट्रधर्मांत संन्यास-मार्गाचा उपदेश अनुपपन्नच आहे, हें तत्त्व लक्षांत घेतल्यास गीतेंतील उपदेशाचा रोख समाजधर्माकडे आहे आणि म्हणूनच गीतेंत संन्यासधर्म सांगितला नसून कर्मयोगच सांगितला आहे, हें निराळें सिद्ध करावें लागत नाहीं. अर्थातच शास्त्री-बुवांच्या या विचारसरणीनें गीतारहस्यांतील कर्मयोगपर सिद्धान्ताला चांगलाच दुजोरा मिळतो. अकराव्या अध्यायाच्या उपसंहारांत शास्त्रीबुवा लिहितात कीं, "भक्तिमार्गाला अवश्य तितकें परमात्म्याचें ज्ञान झाल्यावर भगवान् गोपालकृष्ण हेंच आपलें उपासनेचें प्रतीक असें एखाद्यानें शास्त्रावरून ठरविलें तर भगवान् श्रीकृष्णाच्या उपदेशाप्रमाणें प्राणांचीहि पर्वा न करतां अक्षरशः वागणें म्हणजे श्रीकृष्णाप्रमाणेंच यावज्जीव लोकहितार्थ झटणें व असें करतांना आपलें उपास्य जो श्रीकृष्ण त्याची आपण उच्चप्रतीची ही सेवाच करीत आहों असा अन्तः-करणास प्रत्यय येणें हीच त्याची खरी सगुणभक्ति होय. राष्ट्र हेंच परमात्म्याचें प्रतीक असें समजून अनन्य-भक्तीनें त्याची उपासना करणें हीच परमेश्वराची खरी व श्रेष्ठ उपासना होय असें विश्वरूपदर्शनावरून निर्विवाद सिद्ध होतें."

त्याचप्रमाणें शेवटच्या उपसंहारांत ते लिहितात कीं, " स्वार्थत्यागपूर्वक निष्काम-उपासनामय बुद्धीनें आचरलेली ही वर्णधर्मात्मक ईश्वरोपासना हाच राष्ट्रधर्म होय. अशा राष्ट्रधर्मानेंच मनुष्याला आत्मकल्याण व लोककल्याण साधतां येतें. म्हणून राष्ट्रधर्म हाच सर्वांत श्रेष्ठ धर्म होय. व्यक्तिधर्म व राष्ट्रधर्म यांत विरोध दिसूं लागल्यास व्यक्तिधर्म बाजूस ठेवून, म्हणजे तो गौण आहे असें ओळखून, मनुष्यानें बुद्धियोगपूर्वक राष्ट्रधर्मच आचरण केला पाहिजे, म्हणजे त्यांत व्यक्तीचें-हि कल्याण सहजच साधतें. मात्र या राष्ट्रधर्माचें आचरण करितांना ईश्वरभक्ति, शुद्धबुद्धि, आत्मसंयमन, वैराग्य, पावित्र्य व शांति या बुद्धियोगांतील सद्गुणांकडे दुर्लक्ष करतां कामा नये. अशा रीतीने आचरिलेला राष्ट्रधर्म ब्रह्मज्ञानाच्या परि पाकास उपयोगी पडतो व त्यायोगें ब्रह्मसाक्षात्कार होऊन मनुष्य कृतार्थ होतो."

शास्त्रीबुवांनीं वरील अवतरणांत राष्ट्रधर्म हा ब्रह्मसाक्षात्कारास उपयोगी पडतो व राष्ट्रधर्म हाच सर्वांत श्रेष्ठ धर्म होय, असें जें विधान केलें आहे तें गीतेंतील संन्यासयोग व कर्मयोग यांच्या तुलनेचेंच एक स्वरूप होय. याच दृष्टीनें देवभक्ति व देशभक्ति म्हणजेच रामभक्ति व राष्ट्रभक्ति यांची गीतेच्याच विचार-सरणीस अनुसरून तुलना करावयाची झाल्यास ती पुढीलप्रमाणें करतां येईल :

**रामभक्तस्तु यत्स्थानं राष्ट्रभक्तोऽपि तद् व्रजेत् ।**
**रामभक्ते राष्ट्रभक्तिरन्यूना मोक्षसाधने ॥**
**रामभक्तिर्यथा राष्ट्रभक्तिर्मोक्षप्रदा तथा ।**
**लोककल्याणकारित्वाद् राष्ट्रभक्तिर्विशिष्यते ॥**
**रामभक्ते राष्ट्रभक्तिर्ज्यायसी नात्रसंशयः ।**
**एकामप्यास्थितः सम्यग् द्विविधं विंदते फलम् ॥**

अशी ही तुलना भिडेशास्त्री यांनीं प्रत्यक्ष श्लोकांत वर्णिलेली नसली तरी त्यांच्या उपसंहारांतील विचारसरणीला हे श्लोक तंतोतंत अनुसरून आहेत. आणि उप-संहारांतील विवेचनाची त्यांनीं जी मांडणी केली आहे ती गीतेचा आधार घेऊनच केली असल्यानें गीतेंतील कर्मयोगाचें तात्पर्य थोडक्यांत दर्शविण्याकरितां वरील श्लोक नवे रचून येथें दिले आहेत.

भिडेशास्त्री हे वेदान्त, तर्क, व्याकरण इत्यादि शास्त्रांत पारंगत असल्यानें गीतेंतील श्लोकांचे त्यांनीं बसविलेले अर्थ या सर्व शास्त्रांना अनुसरून आहेत. आणि त्या अर्थांची त्यांनीं केलेली मांडणीहि तर्कपद्धतीस धरून आहे.

गीतेच्या प्रत्येक अध्यायांत जीं प्रकरणें आलीं आहेत त्यांस अधिकरणें ही संज्ञा देऊन त्या प्रत्येकांत आरंभीं प्रतिज्ञा किंवा विधान आणि शेवटीं निगमन किंवा सिद्धान्त अशी सांखळी कशी दिसून येते याचें विवेचन त्या त्या श्लोकाखालील टीपेंत आणि प्रत्येक अध्यायाच्या उपसंहारांत त्यांनीं मार्मिकपणें केलें आहे. त्यामुळें गीतेंतील विचारसरणी विस्कळित नसून तर्कशुद्ध आहे हें वाचकांच्या मनावर चांगलेंच पटते. त्याचप्रमाणें भिडेशास्त्री यांनीं गीताध्यायसंगति हें जे प्रकरण पुस्तकाच्या शेवटीं जोडलें आहे त्यांतहि गीतेंतील एकंदर विचारपद्धति कशी सूत्रबद्ध व सुसंगत आहे याची फोड त्यांनी मोठ्या कुशलतेने केली आहे. अशा रीतीनें हा रहस्यदीपिका ग्रंथ अभ्यासकांस अत्यंत सुबोध आणि उपयुक्त असा झाला आहे.

## भगवद्गीतेंतील कर्मयोगपर उपदेश

"गीतेंत कर्मयोग गौण आणि संन्यास मुख्य समजणें म्हणजे यजमानास त्याच्याच घरांत पाहुणा ठरवून पाहुण्यास यजमान करण्याइतकेंच असमंजस पणाचें होय."
—गीतारहस्य, पृष्ठ ४६६

येथवर गीतावाचस्पति भिडेशास्त्री यांच्या ग्रंथांतील वैशिष्ट्याचा विचार झाला. भगवद्गीतेंत श्रीकृष्णाने जो कर्मयोगाचा उपदेश केला आहे त्या कर्मयोगाचें स्पष्टीकरण शास्त्रीबुवांनी कसें केलें आहे याची कल्पना वाचकांना रहस्यदीपिका वाचून होईलच. तथापि भगवद्गीतेंत कर्मयोगाचें जें प्रतिपादन श्रीकृष्णानें केलें तें कोणत्या परिस्थितींत केलें आणि त्या परिस्थितीवरून भगवद्गीतेचें सार कर्मयोगावांचून अन्य कांहीं असूं शकेल कीं काय याचा विचार संकलित स्वरूपानें करून कर्मयोगावर सकृद्दर्शनींच जे कांहीं आक्षेप येतात त्यांचें निराकरण करणें अवश्यक असल्यानें गीतेंतील तत्त्वज्ञानाची उभारणी कशी करण्यांत आली आहे तिचा थोडासा विचार प्रस्तावनारूपानें करूं.

## गीतेंत काय सांगितलें आहे ?

"माझी दृढभक्ति करून मत्परायणबुद्धीनें स्वधर्माप्रमाणें प्राप्त झालेलीं कर्मे करीत जा म्हणजे इहलोकीं व परलोकीं उभयत्र तुमचें कल्याण होईल. भिऊं नका, असें अर्जुनाला निमित्त करून भगवान् सर्वांसच आश्वासन देत आहेत. यासच कर्मयोगशास्त्र म्हणतात व हेंच सर्व गीताधर्माचें सार होय."
—गीतारहस्य, पृष्ठ ८५०

वेदान्तशास्त्राप्रमाणें केवळ ब्रह्मज्ञान सांगणें व तत्संबंधीं भिन्न भिन्न मतांचा परामर्श घेऊन द्वैत किंवा अद्वैतमत प्रस्थापित करणे हा कांहीं भगवद्गीतेचा मुख्य विषय नव्हे. पुढें आलेल्या दारुण प्रसंगाने बावरलेल्या व गळाठलेल्या अर्जुनाला त्याचें कर्तव्य काय हे समजावून देऊन तें कर्तव्यच मोक्षप्राप्तीचें साधन कसें होते हेंहि विशद करून सांगणें आणि अर्जुनाचा मोह घालवून त्याच्या मनांत पुनः युद्धाविषयींचा उत्साह उत्पन्न करणें हा भगवद्गीतेचा उद्देश होय. या हेतूस अनुसरून सबंध गीतेला किंवा निदान उपसंहारात्मक अशा १८ व्या अध्यायाला तरी 'अर्जुन–उत्थानयोग' असे नांव द्यावयास पाहिजे होतें. ही कल्पना अगदींच नवी असल्यामुळें तिच्या स्पष्टीकरणार्थ थोडकेंसें विवेचन करणे जरूर आहे, सबब पुढील ऊहापोह करीत आहे.

## अर्जुन-उत्थानयोग

गीतेतील प्रत्येक अध्यायाच्या समाप्तीनंतर त्या अध्यायांतील प्रतिपाद्य विषयाचें दर्शक असें नांव त्या अध्यायाला दिलेले आहे. हें नामकरण श्रीकृष्णानें प्रत्यक्ष गीतेचा उपदेश करतांना केलें नसून तें मागाहून कोणी तरी केलें असावें यांत शंका नाहीं. असें असल्यानें प्रत्येक अध्यायाला जे नांव हल्लीं रूढ आहे त्या नांवाला कांहीं भगवंतांच्या वचनासारखें पावित्र्य येऊं शकत नाहीं. आणि म्हणूनच जर एखाद्या अध्यायाच्या नामकरणांत कांहीं विसंगतता आढळून येईल तर तें नामकरण बदलून त्या अध्यायास दुसरें नांव देण्यास हरकत नाही. अशी शंका दोन अध्यायांच्या नांवासंबंधानें विशेषतः प्रामुख्यानें नजरेसमोर येते. पांचव्या अध्यायाला **'संन्यासयोग'** असें म्हटले आहे. वास्तविक पाहातां त्या अध्यायांत संन्यासयोग व कर्मयोग या दोहोंची तुलना असून तुलनात्मक विचारपद्धतीनें कर्मयोगाचें श्रेष्ठत्व सिद्ध करून त्या अध्यायाची परिसमाप्ति झाली आहे, यास्तव त्या अध्यायास **'कर्मयोगवैशिष्ट्यम्'** असें नांव द्यावयास पाहिजे होतें, व तसें नांव त्यास देणेंच युक्त होईल. त्याचप्रमाणें १८व्या अध्यायास **'मोक्षसंन्यासयोग'** असें म्हटलें आहे. या अध्यायांतहि संन्यासयोगाचें प्रतिपादन नसून सबंध गीतेचा उपसंहार त्यांत सांगितलेला आहे. आणि त्या उपदेशाचें पर्यवसान **'स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव'** (१८-७३) या अर्जुनाच्या उक्तींत झालें आहे. या दृष्टीनें पाहातां या अध्यायाला **'उत्थानयोग'** असें नांव समर्पक

होईल. व तें उपक्रमोपसंहाराला सुसंगत असेंहि दिसेल. गीतेंतला पहिला अध्याय हा उपक्रमादाखल असून त्या अध्यायाला **'अर्जुनविषादयोग'** असें म्हटलें आहे आणि तें अत्यंत समर्पक आहे. गीतोपदेशाच्या आधींची अर्जुनाची स्थिति एका शब्दांत वर्णावयाची झाल्यास **'विषाद'** हाच एक शब्द त्याच्या स्थितीचें यथार्थ चित्र दृष्टीसमोर उभें करूं शकेल व त्याच दृष्टीनें पहिल्या अध्यायांत व दुसऱ्या अध्यायाच्या आरंभीं अशा अनेक ठिकाणीं अर्जुनाच्या स्थितीचें वर्णन करण्या-करतां याच शब्दाची पुनःपुन्हा योजना केली आहे. स्वतः अर्जुनदेखील आपल्या स्थितीचें वर्णन करतांना 'सीदंति मम गात्राणि' असें म्हणून स्वतःची स्थिति श्रीकृष्णास निवेदन करतो. तत्पूर्वी संजयानेंहि 'कृपया परयाविष्टो विषीदन्नि-दमब्रवीत्' असें अर्जुनाविषयीं म्हटलें आहे. तसेंच श्रीकृष्णानें उपदेशास प्रारंभ करण्याच्या वेळचें संजयाचें जें वचन आहे त्यांतहि 'विषीदंतमिदं वाक्यं उवाच मधुसूदनः' असें म्हटलें आहे. त्यानंतर पुनः श्रीकृष्णानें उत्तर देण्यास प्रारंभ केला त्या वेळच्या वर्णनांतहि 'सेनयोरुभयोर्मध्ये विषीदं तमिदंवचः' असें वाक्य असून त्यांतहि हाच शब्द आलेला आहे. स्वतः श्रीकृष्णानें उपदेश करण्यापूर्वी अर्जुनाची निर्भर्त्सना केली त्यांत विषाद हा शब्द नसला तरी 'क्लैब्यं मास्म गमः पार्थ' आणि 'क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परंतप' असें म्हणून अर्जुनाच्या दौर्बल्याचा तिरस्कार केला आहे. या सर्व वचनांवरून अर्जुनाच्या मनःस्थितीचें यथार्थ स्वरूप वाचकांच्या दृष्टीसमोर उभें राहातें व तें **'अर्जुनविषादयोग'** या पदानें यथार्थ वर्णिलें आहे.

हा गीतेचा उपक्रम झाला. यानंतरच्या उपदेशांत ठिकठिकाणीं श्रीकृष्णानें 'तस्मादुत्तिष्ठ कौंतेय', 'त्यक्त्वोत्तिष्ठ परंतप', 'तस्मात्त्वमुत्तिष्ठ यशोलभस्व', 'आतिष्ठो-त्तिष्ठ भारत' असा उपदेश अर्जुनास केला असून त्याचा अर्जुनाचे मनावर परिणाम होऊन त्यानें **'स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव'** असा जबाब दिला. यावरून हातपाय गळाठलेल्या अर्जुनाच्या पापभीरु मनाला धीर देऊन श्रीकृष्णानें त्याला युद्धास सज्ज होण्यासाठीं जो उपदेश केला त्याचा योग्य परिणाम अर्जुनाच्या मनावर घडला हें उघड आहे. तो परिणाम अठराव्या अध्यायाच्या नामकरणांत स्पष्टपणें दाखवावयास पाहिजे होता; पण त्याच्याऐवजीं या अध्यायास 'मोक्षसंन्यासयोग' असें नामाभिधान देण्यांत आलें आहे! ही विसंगततेची परमावधि होय. ती विसंगतता काढून टाकून सुसंगत असें नांव द्यावयाचें झाल्यास

अठराव्या अध्यायास **'अर्जुन-उत्थानयोगः'** असेंच म्हणावयास पाहिजे. म्हणजे ही उपक्रम--उपसंहाराची जोडी बरोबर समर्पक जुळेल. आणि समग्र गीतेचें तात्पर्यहि 'अर्जुन-उत्थानयोग' या सामासिक पदावरून वाचकांच्या मनावर स्पष्ट ठसेल आणि मग गीतेंत कर्मसंन्यास सांगितला आहे का कर्मयोग सांगितला आहे असल्या शंकेला जागाच राहाणार नाहीं.

युद्धास प्रवृत्त झालेल्या अर्जुनाला मोहामुळें तात्कालिक उपरति झाली व त्या स्मशानवैराग्याचें निरसन करून अर्जुनाला स्वधर्मप्रवृत्त करण्याकरिता गीता सांगितली गेली आणि 'नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाच्युत । स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव' या श्लोकांत गीतेंतील उपदेशाचे पर्यवसान झालें. यांत अर्जुन स्वतःच सांगतो कीं, 'माझा आगातुक मोह नाहींसा झाला आणि मला स्वधर्माची पुनः स्मृति झाली. मला जो संशय वाटूं लागला होता तो संशय फिटला आणि म्हणून तूं जो उपदेश केलास तदनुरूप मी आतां वर्तन करितों'. या अर्जुनाच्या सांगण्यावरून अर्जुनाला जो संशय वाटूं लागला होता, तो संशय फेडण्याचेंच कार्य मुख्यत्वेंकरून श्रीकृष्णानें आपल्या उपदेशांत केलें हें उघड आहे. म्हणून गीतेंतील उपदेशानें रहस्य शोधतांना अर्जुनाच्या शंका कोणत्या होत्या हें पाहिलें पाहिजे; कारण जसा प्रश्न तसें त्याचें उत्तर असणार, हे निर्विवाद आहे.

अर्जुनाच्या मनांत मुख्यतः तीन शंका उपस्थित झाल्या होत्या. भीष्मद्रोणादि कौरवपक्षीय वीर हे स्वजन आहेत आणि ते आपल्या हातून मारले जाणार याचा त्याला खेद वाटूं लागला होता. पितामह भीष्म आणि आचार्य द्रोण यांचा वध माझ्या हातून होतो, आणि वध झाला कीं वध करणाऱ्याला पाप चिकटलेंच पाहिजे; कारण, कोणाचाहि वध करणें ही गोष्ट अधर्म्य आहे असे अर्जुनास वाटूं लागलें होतें. आणि असलें घोर कर्म आपल्या हातून घडल्यास ते मोक्षाच्या आड येईल अशीहि अर्जुनाची कल्पना झाली होती. म्हणजे स्वजनांच्या मृत्यूविषयींचा शोक, पूजार्ह व्यक्तींच्या वधामुळें लागणारें पाप आणि कर्मबंधनाचा पाठीस लागणारा ससेमिरा असें या अर्जुनाच्या शंकांचें त्रिविध स्वरूप होतें. या मुख्य शंकांना अनुलक्षून कुलक्षयादि इतर अनिष्ट गोष्टी अर्जुनानें वर्णिल्या आहेत. तथापि युद्धाचा तो भावी नैसर्गिक परिणाम असून त्याचा अर्जुनाशीं साक्षात् संबंध येत नाहीं व तो संबंध आला तरी क्षत्रियधर्माप्रमाणें युद्ध करणें हेंच मुळांत पाप आहे ही जी अर्जुनाची कल्पना तींतच कुलक्षयादिकांपासून उद्भवणाऱ्या पापाविषयींच्या

भीतीचा अंतर्भाव होतो. म्हणून ती शंका स्वतंत्र मानली नाहीं व श्रीकृष्णानेंहि त्या शंकेला स्वतंत्र उत्तर दिलेलें नाहीं. अर्जुनाच्या या शंका निश्चित स्वरूपाच्या असून त्यांवर श्रीकृष्णानें दिलेलीं उत्तरेंहि स्पष्ट आहेत. यामुळें गीतेंतील अर्जुनाचा प्रश्न काय आणि त्या प्रश्नावर श्रीकृष्णाचें उत्तर कोणतें यांची सांगड जेणें करून उत्तम रीतीनें बसेल तोच गीतेचा तात्पर्यार्थ असला पाहिजे. यास्तव अर्जुनाचा एकेक प्रश्न घेऊन त्याचें समाधान श्रीकृष्णानें कसें केलें तें पाहूं; पण तत्पूर्वी अर्जुनानें आपल्या शंका ज्या स्वरूपांत मांडल्या त्यांतच अनेक हेत्वाभास असल्यामुळें अर्जुनाची बाजू कशी लंगडी पडली आणि त्याचींच बोटें त्याच्या डोळ्यांत घालून श्रीकृष्णानें त्यास कसें कुंठित केलें तें पाहाणें जरूर आहे.

## अर्जुनाच्या विचारांतील हेत्वाभास

कौरवपक्षीय योद्धयांना स्वजन मानून त्यामुळें अर्जुन मोहग्रस्त झाला ही त्याच्या विचारसरणींतील पहिली चूक होय. श्रीकृष्णानें याचें निरसन पर्यायानें दोन ठिकाणीं केलें आहे. एखादा पुरुष केवळ आपल्या कुळांत अगर देशांत जन्मला किंवा त्याचा आपल्याशीं कोणत्या तरी नात्यागोत्याचा संबंध आला तर तेवढ्यानें त्याला स्वजन मानणें, आणि स्वजन म्हटला कीं, तो अवध्य समजणें ही कल्पना जगाच्या कल्याणाच्या दृष्टीनें चुकीची असून साधूंचें रक्षण व दुष्टांचें दंडन हें जें ईश्वरी कार्य त्या कार्याला जो साहाय्यभूत होतो तो स्वजन व जो त्याच्याविरुद्ध वर्तन करितो तो स्वजन नव्हे आणि ज्याअर्थी भीष्म व द्रोण हे अधर्माच्या बाजूनें लढत आहेत त्याअर्थी त्यांना मी स्वजन मानीत नाहीं व तूंहि त्यांना स्वजन मानणें योग्य नव्हे असें श्रीकृष्णानें पर्यायानें सुचवून अर्जुनाच्या या शंकेचें निरसन केलें आहे (अ. ४, श्लोक ९). भीष्मद्रोणादि कौरवपक्षीय वीर अधर्माचा पुरस्कार करीत असल्यामुळें ते आततायी आहेत असें स्वतः अर्जुनच कबूल करीत असल्यामुळे आणि 'आततायिनमायान्तं हन्यादेवाविचारयन्' या नियमानुसार आततायी लोकांचा प्रतिकार करणें हेंच कर्तव्य ठरत असल्यानें या आततायी लोकांना मारल्यानें आम्हांला पाप लागेल व सुख मिळणार नाहीं ही अर्जुनाची विपरीत कल्पना खोडून काढून, आततायी लोकांना मारून साधूंचें रक्षण करणें हेंच क्षत्रियाचें खरें कर्तव्य होय असें श्रीकृष्णानें अर्जुनास समजावून दिलें आहे.

अर्जुनाच्या विचारसरणींतील दुसरी चूक 'यद्यप्येते न पश्यन्ति लोभोपहतचेतसः। कथं न ज्ञेयमस्माभिः पापादस्मान्निवर्तितुम्।' या श्लोकांत आहे. कौरव-

पक्षीय योद्धे लोभाविष्ट होऊन युद्धाला उद्युक्त झाले ही गोष्ट स्वतः अर्जुनानेंच 'लोभोपहतचेतसः' या विशेषणानें व्यक्त केली आहे. पण अर्जुनाचें म्हणणें असें कीं, एकानें मूर्खपणा केला व त्याचा घोर परिणाम त्याला दिसत नसला, तरी ज्याला त्यांतला मूर्खपणा उमगला त्या शहाण्यानें तरी भांडण टाळलें पाहिजे. कौरवांना या युद्धामुळें होणारी हानि दिसत नसेल पण ज्याअर्थी ती आम्हांला दिसत आहे त्याअर्थी आम्हींहि त्यांच्यासारखेंच आंधळेपणानें कां वागावें ? अर्जुनाच्या या शंकेंतले बीज हेंच कीं, दुसरा मूर्खपणामुळे कसाहि वागला तरी शहाण्या माणसानें स्वतः कसें वागावें हें त्याच्यापुरतें निश्चितपणें ठरलेलें असतें व तसें त्याला वागतां येतें पण असा एकांगी विचार करून जगांतले व्यवहार चालत नाहींत. दुसऱ्यानें मूर्खपणाने कां होईना; पण गांवाला आग लावण्याचा अत्याचार आरंभिला तर शहाण्या माणसाला त्याचा योग्य बंदोबस्त करणें प्राप्तच आहे.'दुर्दान्तानां दमनविधयः क्षत्रियेष्वायतन्ते' या नियमानुसार दुष्टांचें दमन करणें हें क्षत्रियांचें कर्तव्य आहे व तें कर्तव्य करण्यास कोणाहि क्षत्रियानें कचरूं नये, असेंच श्रीकृष्णानें 'स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकंपितुमर्हसि' (२ ३१) या श्लोकांत सांगून अर्जुनाची विचारसरणी खोडून काढिली आहे. क्षत्रियाचें, किंवा राजाचें, किंवा समाजाच्या धुरीणाचें कर्तव्य त्याच्या स्वतःच्या मनांतील इच्छेनुसार ठरत नसून त्याचे प्रतिपक्षी जे कोणते डावपेंच योजतील त्यांवर त्याची कृति अवलंबून राहाणार हें उघड आहे. प्रतिपक्षी अन्यायाने व दंडेलीनें वागूं लागला तरी मी मात्र माझी सहिष्णुता सोडणार नाहीं असें म्हणून क्षत्रियाचें चालणार नाहीं.

अर्जुनाचे मनांतली तिसरी विपरीत कल्पना अशी की, कांहीं कृत्यें स्वरूपतःच दोषावह असतात तर कांहीं स्वरूपतःच निर्दोष असतात. युद्ध हें हिंसामूलक असल्याने सदैव दोषास्पद व पापकारकच असणार यास्तव तें त्याज्य होय; भिक्षावृत्तींत असला कोणताहि दोष नसल्यानें ती सर्वथैव पुण्यकारक व ग्राह्य होय. या बुद्धीनेंच त्यानें 'गुरूनहत्वाहि महानुभावान् श्रेयो भोक्तुं भैक्ष्यमपीह लोके ।' अशी कल्पना करून युद्ध टाकून भिक्षाटण करणेंच अधिक बरें असें ठरवून टाकलें ! यांतील हेत्वाभासाचा निरास करण्याकरितांच श्रीकृष्णानें त्यास सांगितलें कीं, या जगांत असें कोणतेंच कृत्य नाहीं कीं ज्यांत कसलाच दोष घडत नाहीं. 'सर्वारंभा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः' ( १८–४८ ) हा नियम कर्मांना लागू असल्यामुळें अमुक एक कर्म मूलतः पापकारक आणि दुसरें एखादें कर्म मूलतःच

पुण्यकारक असें असूं शकत नाहीं. ज्या कर्माला शुद्धबुद्धि प्रेरक असेल तें कर्म निर्दोष आणि ज्याला कामक्रोधादि विकार प्रेरक असतील तें कर्म सदोष असाच नीतिशास्त्राचा सिद्धान्त आहे; म्हणून तूं कर्माच्या बाह्य स्वरूपाकडे न पाहातां त्याच्या पाठीमागें असलेल्या प्रेरक अशा बुद्धीकडे लक्ष दे; 'बुद्धौ शरणमन्विच्छ कृपणाः फलहेतवः' हा उपदेश लक्षांत ठेव. अमुक एक कर्म श्रेष्ठ आणि दुसरें एखादें कनिष्ठ असें मानणेंच चुकीचें आहे. ह्या सृष्टींत मीं चातुर्वर्ण्य निर्माण केलें व त्याबरोबरच त्या त्या वर्णाला अनुरूप अशीं कर्में लावून दिलीं. त्यांतील कांहीं कामें एका वर्णाच्या दृष्टीनें त्याज्य वाटतील तर दुसऱ्या वर्णाला तींच आवश्यक असतील. अर्थातच जें कर्म सर्वांच्या दृष्टीनें कोणत्याहि दोषापासून अलिप्त असें असेल तेवढेंच कर्म मी करीन असा जर आग्रह कोणी धरूं लागेल तर वर्णाश्रमधर्म चालणार नाहीं. कारण, जो तो समाजाला श्रेयस्कर गोष्ट कोणती ती करण्याला तयार न होतां स्वतःला प्रिय वाटणारी अशीच गोष्ट करूं लागेल व त्यामुळे सृष्टिक्रमाला बाध येऊन समाजांत घोंटाळा माजेल. याकरितांच 'श्रेयान् स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात्। स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥' (३-३५) असें सांगितलें आहे. आपणांस एखादें कृत्य विगुण असें वाटलें, तरी वर्णधर्माप्रमाणें तें जर आपलें स्वभावनियतकर्म असेल तर तें केलेंच पाहिजे. 'सहजं कर्म कौंतेय सदोषमपि न त्यजेत्', 'स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम्।' असा नियम समाजाची घडी विघडूं नये म्हणूनच सांगण्यांत आला आहे. सारांश, अर्जुनाला वाटत होतें त्याप्रमाणें धर्मशास्त्रकारांनीं अमुक एक गोष्ट कोणत्याहि परिस्थितींत पापकारक अशी मानली नसून तिला विशिष्ट कारणामुळे दोष जडतो असें सांगितलें आहे. त्यामुळें स्वतःच्या वर्णाश्रमधर्माचा आणि परिस्थितीचा विचार लक्षांत न घेतां युद्धाला सुरवात झाल्यावर आणीबाणीच्या प्रसंगीं युद्ध हे त्याज्य आहे असे मानण्यांत अर्जुनाच्या हातून केवढी चूक होत आहे याचें श्रीकृष्णांनीं विवरण केलें, आणि अर्जुनास आपली चूक कबूल करावयास लाविलें.

## अर्जुनाच्या पहिल्या दोन शंकांचें निरसन

येथवर अर्जुनाच्या हेत्वाभासाचा विचार झाला. आतां त्याच्या मुख्य तीन शंकांचा विचार करूं. युद्ध केल्यास भीष्मद्रोणादिक आप्त मृत्युमुखीं पडतील, त्या योगानें आपणास शोक होईल व त्या शोकावेगांत राज्योपभोगहि त्याज्य वाटेल

तेव्हां असलें युद्ध करून तरी काय फायदा ? ही पहिली शंका. यावर श्रीकृष्णाचें उत्तर थोडक्यांत व समर्पक आहे. 'आत्मा हा अमर आहे, तो मरत नाहीं व मारलाहि जात नाहीं, जन्ममृत्यु ही एक देहाला घडणारी अवश्यक अवस्था आहे व तीपासून होणारें सुखदुःख सोसलेंच पाहिजे; कारण त्यांतून सुटकाच नाहीं. आत्मा अमर असल्यानें तो जसा मरत नाहीं, त्याचप्रमाणें तो विकार रहित असल्यानें त्याला मारण्याचा दोषहि लागत नाहीं. तुला जें वाटत आहे कीं, मी भीष्मादिकांना मारणार व माझ्या हातून ते मरणार ही समजूतच चुकीची आहे. त्यांच्या देहाला मृत्यु येईल, पण आत्मा अमर असल्यानें त्याला कांहींच बाधा होणार नाहीं. त्याचप्रमाणें तुझ्या हातून बाण सुटून जरी भीष्मादि मरण पावले तरी या तुझ्या शारीरिक क्रियेचा दोष अविकार्य अशा तुझ्या आत्म्याला लागत नाहीं'.

बरें, आत्मा अमर असल्यामुळें देहनाशाबद्दल शोक करणें व्यर्थ असलें तरी यावरून एवढेंच म्हणतां येईल कीं, जेव्हां केव्हां यदृच्छेनें भीष्मद्रोणादिक कालवश होतील, त्या वेळीं त्याबद्दल आपण शोक करीत बसूं नये; पण त्यावरून आज हें युद्ध चालवावें आणि मीं स्वतः भीष्मद्रोणादिकांना मारावें हें माझें कर्तव्य कसें ठरेल ? अर्थातच आत्म्याच्या अमरत्वाविषयीं श्रीकृष्णानें सांगितलेला सगळा निर्णय मान्य करून देखील 'न योत्स्ये' हा अर्जुनाचा निश्चय कायमच राहूं शकेल.

ही अर्जुनाची कल्पना लक्षांत घेऊन त्यानें युद्ध कां केलें पाहिजे याचीं कारणें सांगण्यास येथून श्रीकृष्णानें प्रारंभ केला. आणि त्यांत 'स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकंपितुमर्हसि ।' येथपासून 'ततो युद्धाय युज्यस्व नैवं पापमवाप्स्यसि' येथ पर्यंतच्या आठ श्लोकांत युद्ध अवश्य केलेंच पाहिजे, याविषयीं निरनिराळीं कारणें सांगण्यांत आलीं आहेत. या विवेचनानें अर्जुनाचें पूर्ण समाधान झालें नाहीं म्हणून त्यानें तिसऱ्या अध्यायांत 'तत्किं कर्मणि घोरे मां नियोजयसि केशव' असें म्हणून तीच शंका पुनः उपस्थित केली. अशा रीतीनें पहिले पाढेच पुनः पढविण्याची पाळी आलेली पाहून श्रीकृष्णानें हा मुद्दा जास्त स्पष्ट करण्याकरितां 'न हि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत्' । येथपासून अर्जुनानें आपलें प्राप्त कर्तव्य कां केलें पाहिजे याची कारणपरंपरा निराळ्या रीतीनें सांगण्यास सुरवात केली. आणि त्यांत मुख्यत्वेंकरून निरुत्तर करणारीं अशीं पुढील नऊ कारणें सांगितलीं. तीं अशीं:—

[१] कोणीहि मनुष्य मुळींच कोणतेंहि कर्म न करतां क्षणभरदेखील राहूं शकत नाहीं (३–५).

[२] बाह्येंद्रियांचें संयमन करून मनांत विषयांचें ध्यान करीत राहिल्यानें मिथ्याचारत्व येतें (३–६).

[३] शरीरयात्रा चालण्याकरितां तरी कांहीं कर्मे अवश्य करावींच लागणार (३–८).

[४] या सृष्टीची उत्पत्तिच यज्ञमूलक आहे, व त्यांत परस्परांनी परस्परांच्या धारणपोषणार्थ कर्मे केलीं तरच हें सृष्टिचक्र सुरळीतपणें चालूं शकतें. असें असतां जो कोणी दुसऱ्याच्या कर्माचा फायदा स्वतःला घेतो, व आपण मात्र कांहीं कर्म करीत नाहीं तो चोरासारखा दोषी ठरतो (३–१२).

[५] सामान्य लोक मोठ्यांचें अनुकरण करतात यास्तव त्यांचा बुद्धिभेद होऊं नये व त्यांना योग्य उदाहरण घालून द्यावे व अशा रीतीने लोकसंग्रह करावा यासाठीं विद्वानानेंहि अनासक्त बुद्धीने कर्म केलेंच पाहिजे (३–२१).

[६] मनुष्य ज्ञानवान् झाला तरी त्याची प्रकृति त्याला कर्म करायला लावतेच. याकरितां प्रकृतीच्या आधीन होऊन कर्म करण्यापेक्षां आपणच प्रकृतीला ताब्यांत ठेवून तिला योग्य कर्मीत गुंतविणें चांगलें (३–३३).

[७] एखाद्यानें आपलें वर्णोचित कर्म केलें नाहीं तर सृष्टींतील ती उणीव भरून काढण्याकरितां दुसऱ्या कोणाला तरी तें कर्म करावें लागतें. आणि त्या योगाने वर्णसंकर होतो व तेवढ्यानेंहि सृष्टिचक्र नीट न चालतां प्रजा त्रस्तच राहाते (३–२४).

[८] ईश्वर जर आपलें कर्तव्य न करील तर सृष्टीचा नाश होईल. एवढी जबाबदारी प्रत्येक प्राण्यावर नसली तरी त्याच्या शक्तीच्या मानानें मनुष्यमात्रावर ईश्वरानें चालू केलेलें हें जगच्चक्र चालविण्याची जबाबदारी आहे व ती जो टाळील तो फुकटखाऊ, चैनी व पापी ठरेल (३–१६).

[९] गुणकर्मानुसार जो आपला स्वधर्म ठरला असेल त्याला अनुरूप असे कर्म, जरी त्यांत कांहीं वैगुण्य दिसलें तरी, प्रत्येकाने केलेंच पाहिजे. स्वधर्म-पालनांत मृत्यु आला तरी तो श्रेयस्कर आहे, पण वैगुण्याच्या कल्पनेनें आपला वर्णधर्म सोडून दुसऱ्या वर्णाचा आचार स्वीकारणे हें समाजाला नाशकारक आहे. याकरितां प्रत्येकानें स्ववर्णोचित कर्म केलेंच पाहिजे (३–३५).

येणेप्रमाणें ही कारणपरंपरा सांगून कोणासहि प्राप्त कर्म टाळतां येत नाहीं, व तें टाळण्यांतच पाप असून प्राप्तकर्म करण्यांत पाप नाहीं असें श्रीकृष्णानें अर्जुनास अनेक दाखले देऊन समजावून दिलें. या दुसऱ्या शंकेंत आपलें वर्णोचित जें युद्धकर्म तें केल्यानें युद्धांत होणाऱ्या हिंसेमुळें आपल्याला पाप लागेल अशी जी अर्जुनाला धास्ती वाटत होती तिचें निर्मूलन करण्यासाठीं श्रीकृष्णानें स्वधर्माचरण करण्यांत पाप नसून स्वधर्माचा आचार सोडून देण्यांतच उलट पाप आहे असें सांगितलें. आणि 'युद्धे चाप्यपलायनम्' हा क्षत्रियधर्म असल्यानें हें युद्ध सोडून गेल्यास तुझी अपकीर्ति होईल, तुला भलभलती निंदा ऐकावी लागेल आणि परवर्णोचित अशी भैक्ष्यवृत्ति स्वीकारल्याने मात्र पुण्य न लागतां उलट पापच लागेल; पण, स्वधर्माप्रमाणें आचरण केल्यास पाप न लागतां पुण्यच लागेल असें सिद्ध करून दाखविलें. म्हणूनच यांतील सिद्धान्तमूलक वाक्यांचें पर्यवसान 'नैवं पापमवाप्स्यसि ।' 'युद्ध्यस्व विगतज्वरः।' 'स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः।' 'स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम्।' 'स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः।' इत्यादि वचनांत झालेलें आहे.

## अर्जुनाच्या तिसऱ्या शंकेचें निरसन

अर्जुनाच्या शोकनिवारणार्थ आणि युद्ध केल्यानें पाप लागेल या शंकेच्या निरसनार्थ शास्त्राधारानें एवढें विवेचन केल्यावर अर्जुनाच्या मनांतील तिसऱ्या शंकेवरील श्रीकृष्णाच्या उत्तराचा विचार ओघानेंच पुढें येतो. जें युद्ध टळत नाहीं तें युद्ध स्वधर्म म्हणून करणें आणि त्या युद्धांत कोणीहि आप्तेष्ट मृत्यु पावल्यास त्याबद्दल शोक न करणें या दोन्ही गोष्टी पटल्या तरी स्वधर्माचरण म्हणून केलेलें युद्ध हें एक कर्मच असल्यानें प्रत्येक कर्म जसें बंधनकारक असतें तसेंच हेंहि कर्म बंधनकारक असणार; तेव्हां हें युद्धकर्म करून कर्मबंधनांत पुनरपि पडण्यापेक्षां कर्मच टाकणें हा बंधन टाळण्याचा सुलभ व खात्रीलायक उपाय आहे असें अर्जुनाच्या मनानें घेतलें होतें आणि म्हणून क्षत्रियानें स्वधर्माचरण म्हणून युद्ध केल्यास त्याला पाप न लागतां जरी पुण्यच लागलें, तरीदेखील पुण्यमुद्धां बंधनकारकच असल्यानें संन्यासाचा मार्गच श्रेयस्कर ठरत असतां मी युद्ध करून कर्माच्या बंधनांत कां सांपडावें, अशी शंका मनांत धरून, कर्मसंन्यास आणि कर्मयोग या दोहोंपैकीं कोणता मार्ग श्रेयस्कर आहे तें मला निश्चिनपणे सांग असा अर्जुनानें

प्रश्न केला. आणि त्यावर 'संन्यासः कर्मयोगश्च निःश्रेयसकरावुभौ ॥ तयोस्तु कर्म-संन्यासात्कर्मयोगो विशिष्यते ॥'(५-२) असें म्हणून संन्यासमार्गापेक्षां कर्मयोगाचा मार्ग अधिक चांगला असें निःसंदिग्ध उत्तर देण्यांत आलें. हेंच उत्तर या श्लोकाच्याहि पूर्वी 'यस्त्विंद्रियाणि मनसानियम्यारभतेऽर्जुन। कर्मेंद्रियैः कर्मयोगमसक्तः स विशिष्यते ॥'(३-७) या श्लोकांत सांगण्यांत आलें होतें. पण त्या ठिकाणीं पूर्वीच्या श्लोकांत मिथ्याचारी माणसाच्या वर्तनाचें वर्णन केलेलें असल्यामुळे अर्जुनाची अशी समजूत झाली असावी कीं, बाह्यतः कर्माचा त्याग करून अंतःकरणांत कर्माचें ध्यान करणाऱ्या दांभिकापेक्षां कर्मयोगी श्रेष्ठ असेल, पण पूर्णत्वानें अंतर्बाह्य कर्म-संन्यास करणाऱ्यापेक्षां कर्मयोगी श्रेष्ठ आहे असें कांहीं त्या श्लोकावरून ठरत नाहीं; तेव्हां असा खरा कर्मसंन्यासी हा जर कर्मयोग्यापेक्षां श्रेष्ठ निदान त्याच्या बरोबरीचा तरी ठरेल तर आपण या युद्धाच्या लचांडापासून सहजच सुटूं. याकरितां संदिग्ध उत्तर न देतां मला काय तें एकदां निश्चित सांग, असा अर्जुनानें हट्ट धरला. पण यावरील श्रीकृष्णाचें उत्तर त्याच्या अपेक्षेप्रमाणें न येतां संन्यासापेक्षां कर्म योगच श्रेष्ठ असेंच त्यास उत्तर मिळालें. हा सिद्धान्त श्रीकृष्णाने अर्जुनाला कोणकोणच्या प्रमाणांनीं पटवून दिला तें आपण नंतर पाहूं. पण अर्जुनाच्या शंकेवर कर्म-योगच श्रेष्ठ असेच उत्तर गीतेंत दिलेलें आहे एवढी गोष्ट तरी कोणासहि नाकबूल करतां येणारी नाहीं. श्रीकृष्णाकडून दोन वेळां हेंच उत्तर मिळालें असतां तोच प्रश्न थोड्याशा निराळ्या स्वरूपानें विचारून आपल्याला कोठें तरी थोडीशी पळवाट सांपडते काय हें पाहण्यासाठीं अर्जुनानें पुनः अठराव्या अध्यायांत संन्यास व त्याग यांचें तत्त्व मला समजावून द्या म्हणून पृच्छा केली. पण उलटतपासणींत वकिलानें कसेहि आडवेतिडवे प्रश्न केले तरी खरा साक्षीदार ज्याप्रमाणें आपला मुद्दा न सोडतां त्याला पोषक असेंच उत्तर देतो, त्याप्रमाणें श्रीकृष्णानेंहि अर्जुनास पुनः सांगितलें कीं, '**नियतस्य तु संन्यासः कर्मणो नोपपद्यते।**' (१८-७) म्हणजे ज्याचें जें नियत कर्म असेल त्याचा त्याला संन्यास सांगितलेलाच नाहीं. अर्थात् जेथें शास्त्रानेंच संन्यास सांगितलेला नाहीं. तेथे कर्मसंन्यास बरा कीं कर्मयोग बरा हा प्रश्नच सयुक्तिक ठरत नाहीं इतक्या निकरानें श्रीकृष्णानें कर्मयोगाचें तत्त्व अर्जुनाच्या गळ्यांत बांधल्यावर मग अर्जुनाला शंका घेण्याला कांहींच जागा राहिली नाहीं. तरी पण नियतकर्म म्हणजे सहज किंवा स्वभावसिद्ध कर्म होय, व तें टाकतां येत नसेल, पण माझा

स्वभावच युद्ध पराङ्मुख आहे,असें म्हणण्याला अर्जुनाला जागा राहील, हें ओळखून अर्जुनानें तशी शंका विचारण्याच्या पूर्वींच श्रीकृष्णानें सांगितलें कीं, 'यदहंकार- माश्रित्य न योत्स्य इति मन्यसे। मिथ्यैष व्यवसायस्ते प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति।' 'स्वभावजेन कौंतेय निबद्धः स्वेन कर्मणा। कर्तुं नेच्छसि यन्मोहात् करिष्यस्यवशोऽपि तत्॥' (१८-५९ व ६०) अर्थातच अर्जुनाची जन्मप्रकृति व त्याचा नियत-धर्म लक्षांत घेऊन 'माझा स्वभावच युद्धविन्मुख आहे असेंहि सांगण्याला तुला सवड नाहीं,' हेंहि अर्जुनाने न विचारतांच श्रीकृष्णानें सांगून टाकले! अशा रीतीनें सगळीकडून वेढून शह दिल्यावर ज्याप्रमाणें प्रतिपक्षाचा डाव कबूल करावा लागतो त्याप्रमाणें शंका घेण्याला कोणतीहि जागा न राहिल्यामुळें अखेरीस अर्जुनानें 'करिष्ये वचनं तव' (१८-७३) असे म्हणून कर्मयोगाचें श्रेष्ठत्व कबूल केलें व त्याप्रमाणें आचरणहि केले.

अशा रीतीनें युद्ध टाळण्यासाठी व कर्माचा स्वरूपतः त्याग करण्यासाठी अर्जुनाला जेवढे मुद्दे सुचले तेवढे सगळे मांडून देखील त्याला हार खावी लागली व श्री- कृष्णाच्या सांगण्याप्रमाणे कर्मयोगाचें श्रेष्ठत्व मान्य करावे लागले. असें असतां याच गीतेंतून आणि कृष्णार्जुनांच्या याच संवादांतून गीतेंत कर्मसंन्यास सांगितला आहे, गीता निवृत्तिपर उपदेश करते, आणि कर्मयोग हा गौण मार्ग असून संन्यास- मार्ग हाच श्रेष्ठ मार्ग होय असे सांगण्यांत यावे हा एक अद्भुत चमत्कारच समजला पाहिजे! कर्मयोगापेक्षां संन्यासमार्ग श्रेष्ठ अशा अर्थाचे एकहि वचन गीतेंत कोठेंहि नाहीं. असे असतां गीता संन्यासपर आहे असला प्रवाद संन्यासमार्गीयांनीं कसा प्रचलित केला याचेच राहून राहून आश्चर्य वाटतें!

## गीतेंत इतर निष्ठा कां सांगितल्या?

"ज्ञानमूलक व भक्तिप्रधान कर्मयोग हीं एकच निष्ठा सर्व गीतेंत प्रतिपाद्य होय; आणि सांख्यनिष्ठा, ज्ञानविज्ञान किंवा भक्ति यांचें जें निरूपण भगव- द्गीतेंत आले आहे तें एका कर्मयोगनिष्ठेच्या पूर्त्यर्थ किंवा समर्थनार्थ अनुषंगानें आलेले आहे, स्वतंत्र विषय प्रतिपादन करण्यासाठीं नव्हे."

—गीतारहस्य, पृष्ठ ४५६

'गीतेला जर कर्मयोगाचाच उपदेश करावयाचा होता तर तींत संन्यास, ध्यान, भक्ति, आत्मज्ञान इत्यादि सांगण्याचें कारण नव्हतें'. असला एक पोचट

आक्षेप पुढें येतो, पण हा आक्षेप घेणाऱ्यांना गीतेंत कर्मयोगाची जी व्याख्या केली आहे तीच लक्षांत नाहीं असें दिसतें. गीतेतला कर्मयोगी हा शास्त्रनिषिद्ध कर्में करणारा किंवा शास्त्रोक्तच पण काम्यकर्में करणारा असा नसून तो आत्मौपम्यबुद्धीनें, आसक्ति टाकून, भक्तियुक्त अन्तःकरणानें, निरहंकारबुद्धीनें प्राप्त कर्तव्य करणारा असा असतो. कर्मयोगाचीं हीं लक्षणें साध्य होण्याला ध्यान, आत्मज्ञान व भक्ति या सर्वांची जरुरी असल्यामुळें गीतेंत ते विषयहि समाविष्ट झाले आहेत. अर्थातच ते ते विषय स्वतंत्रपणें आले नसून कर्मयोगाला पोषक म्हणूनच त्यांचें वर्णन गीतेंत आलें आहे. तात्पर्य, कर्मयोगाचें प्रतिपादन करतांना ज्ञानाची व भक्तीची इतकी प्रशंसा कां केली अशी पृच्छा करणें हें तुम्हांला जिलबी करावयाची असतांना साखरेची व रव्याची इतकी चिकित्सा कशाला करतां अशी पृच्छा करण्यासारखेंच विचित्र आहे ! गीतेनें केवळ काम्य कर्मांची निंदा अनेक ठिकाणीं केली असल्यामुळें गीतेतला कर्मयोग हा काम्यकर्माहून निराळा असला पाहिजे हें सहजच कोणाच्याहि लक्षांत येईल. तिसऱ्या आणि चौथ्या अध्यायांत अनुक्रमें श्लोक ३० व ४१ ह्यांत कर्मयोग्याचें वर्णनहि पर्यायानें दिलें आहे. त्याचप्रमाणें सात्त्विक कर्म व सात्त्विक कर्ता यांचेंहि वर्णन १८ व्या अध्यायांत आलें आहे. या सर्व वर्णनांतील मुख्य लक्षणें एकत्र करून गीतेंतील कर्मयोग्याचें लक्षण सांगावयाचें म्हटल्यास तें पुढीलप्रमाणें सांगतां येईल.

**मुक्तसंगोऽनहंवादी भक्तिज्ञानसमन्वितः ।**
**यज्ञार्थं जनहितार्थंच कर्मयोगी विचेष्टते ॥**

असल्या कर्मयोग्यालाच उद्देशून भगवंतांनीं—

**हत्वाऽपि स इमाँल्लोकान्न हंति न निबध्यते**

—अ. १८, श्लोक १७

असला निर्भयपणाचा ताम्रपट दिला आहे. केवळ ज्ञानयोगी, केवळ ध्यानयोगी व केवळ भक्तियोगी यांना कर्माचरणाची सदैव भीति वाटत असते, कारण त्यांची सगळी मदार कर्मसंन्यासावर असते; पण कर्मयोग्याला इतर कोणत्याहि मार्गाची भीति राहिलेली नसते, हाहि एक त्याचा विशेषच होय.

## ज्ञानोत्तर कर्म होऊं शकतें

ज्ञानी माणसाच्या हातून कर्मच जर होऊं शकत नाहीं, तर मग त्यास कर्मयोगाचा उपदेश कोण करील, अशी अखेरची म्हणून एक शंका पुढें मांडण्यांत

येत असते. ज्ञानी मनुष्य ज्ञानोत्तर कर्म करण्याला अपात्र होत असेल तर मग ज्ञानोत्तरहि कर्म करावें हा पक्षच खुंटतो हें खरें. पण ही कल्पना तरी खरी आहे काय, याचें निरीक्षण केले पाहिजे. सांप्रदायिक टीकाकार ज्ञान व कर्म यांचा 'तमःप्रकाशवत्' विरोध आहे असें म्हणतात. 'तमः प्रकाशाचा' दृष्टान्त जर यास खरोखरीच लागू पडत असेल तर ज्ञान्याच्या हातून कर्म घडणें केव्हांहि, कोणत्याहि स्थितींत अशक्य झालें पाहिजे; पण वस्तुस्थिति काय दिसते ? हेच सांप्रदायिक स्वतःच अनेक ठिकाणीं कबूल करतात कीं, ज्ञान्याच्या हातून अनेक कर्में घडतात. शरीररक्षणापुरते ज्ञान्यानें व्यवसाय करावे अशी मुभा याच सांप्रदायिकांनी आपल्याच ग्रंथांतून स्वतःच ज्ञान्याला देऊन टाकली आहे ! ज्ञानप्राप्ति होतांच तात्काल कांहीं मोक्षप्राप्ति होत नाहीं, हे उभय पक्षांसहि मान्य आहे. अर्थातच ज्ञानप्राप्तीनंतर ज्ञानी मनुष्य कांहीं कालपर्यंत राहातो व अशा एका विशिष्ट स्थितींतील मनुष्यासच 'जीवन्मुक्त' असे म्हणतात. हा 'जीवन्मुक्त' प्रारब्धकर्माचा क्षय होईपर्यंत राहातो, असेंहि सांप्रदायिकांचेंच मत आहे. ब्रह्मसिद्धान्त-मालेंत श्रीयुत बाबा गर्दे लिहितात कीं, 'ज्ञान्याला ज्याअर्थी प्रारब्ध सुटत नाहीं त्याअर्थी तें त्यानें भोगलेंच पाहिजे. म्हणून ज्ञान्यालाहि विषयेच्छा होण्याचा संभव आहे !' म्हणजे एकीकडे ज्ञान व कर्म यांचा 'तमःप्रकाशवत्' विरोध सांगणारे हे संन्यासमार्गीय ग्रंथकार ज्ञानी मनुष्य निरिच्छ बुद्धीनें व्यवहार करील एवढेंच न म्हणतां त्याच्या गळ्यांत विषयेच्छेचें लोढणेंहि अडकवून देतात ! तरी पण कर्मयोगी टीकाकारांनी 'ज्ञान्यानें निष्कामबुद्धीनें लोकसंग्रहार्थ कर्म करावें' असें म्हणतांच तेथें मात्र त्यांचा ज्ञानकर्मविरोध खडा उभा राहातो ! ज्ञानी पुरुष जर राज्यादिक व्यवहार करूं शकतो तर तो लोककल्याणाचें कार्य कां करूं शकणार नाहीं ? वस्तुतः ज्ञान व कर्म यांचा विरोध नसून ध्यान किंवा समाधि व कर्म यांचा विरोध आहे. समाधिसुखांत तल्लीन झालेला ज्ञानी कर्म करूं शकणार नाहीं. पण तो कांहीं दिवसाचे चोवीस तास समाधींतच असतो असें नाही. जेव्हां तो समाधींत नसेल त्या वेळीं त्याच्या बाह्य क्रिया सुरूच असतात आणि त्या त्याला बंधनकारक होऊं शकत नाहींत. 'तत्त्वविद्यदि न ध्यायेत् प्रवर्तेत तदा बहिः। प्रवर्ततां सुखेनायं को बाधोऽस्य प्रवर्तने ॥' असें पंचदशींत ध्यानदीपांत सांगितलें आहे. या बाह्य प्रवृत्तीनें एकाग्रतेला प्रतिबंध होत असल्यामुळें

तेवढ्यापुरता ज्ञानी ब्रह्मानंदाच्या सुखाला मात्र अंतरतो; परंतु ती बाह्यप्रवृत्ति आत्मज्ञानाच्या अगर मोक्षाच्या मुळींच आड येत नाहीं, हें पंचदशीकारांचें वचन संन्यासमार्गीयांनीं लक्षांत ठेवण्यासारखें आहे. 'मोक्षो न हीयते किन्तु ब्रह्मानंदो न लभ्यते' हें वचन ज्ञानी कर्म करूं शकत नाहीं किंवा त्यानें कर्म केल्यानें तो पुन्हा अज्ञानांत पडतो असें कांहीं सांगत नाहीं. पंचदशीकारांनीं 'मोक्षो न हीयते किंतु ब्रह्मानंदो न लभ्यते।' या वचनानें जीवन्मुक्त कर्मयोग्याला कर्म करीत असतांना ब्रह्मानंद मिळत नाहीं असें म्हटलें आहे; पण गीताशास्त्रानें याच्यापुढें मजल मारली आहे. गीतेचें म्हणणें असें आहे कीं, जीवन्मुक्त कर्मयोग्याचा ब्रह्मानंद नेहमींच अढळ असतो. त्याच्या ब्रह्मानंदाला समाधीची मुळींच गरज नसते. जीवन्मुक्त कर्मयोग्याची साम्यबुद्धिच त्याचा ब्रह्मानंद कायम ठेवूं शकते (अ. ६, श्लोक ३). पण कर्माविषयीं उदासीन राहणाऱ्या संन्यासी पुरुषाला मात्र समाधींत गेल्यावांचून ब्रह्मानंदाचा लाभ होत नाहीं असें गीतेनें स्पष्ट सांगितलें आहे (अ.५, श्लोक २१).

यावरून कर्मयोग हा अंतीं मोक्षप्रद तर आहेच; पण जीवन्मुक्तावस्थेंतहि ब्रह्मानंददायक असून शिवाय लोकसंग्रहकारक आहे, हा गीतेचा अभिप्राय स्पष्ट होतो व तो भिडेशास्त्री यांनीं रहस्यदीपिकेच्या पांचव्या अध्यायाच्या उपसंहारांत विशद करून सांगितला आहे. पंचदशीकार पुढें असेंहि म्हणतात कीं, 'नापेक्षा ब्रह्मवृत्तेश्च मुक्तस्य द्वैतविस्मृतेः। अस्ति चेद् याज्ञवल्क्यादेराचार्यत्वं न संभवेत्॥' त्याचप्रमाणें जनकाचा दाखला देऊन ते म्हणतात. 'तत्त्वज्ञानेन देहादिसाधनानुपमर्दनात्। ज्ञानिनाचरितुं शक्यं सम्यग्राज्यादि लौकिकम्॥', ज्ञानी मनुष्य राज्यादि सर्व लौकिक व्यवहार करूं शकतो हें कबूल केल्यावर मग ज्ञान आणि कर्म यांचा 'तमःप्रकाशवत्' विरोध कोठें राहिला ?

## निष्काम कर्म शक्य आहे काय ?

"खुद्द परमेश्वर ज्याप्रमाणें कर्में करितो, त्याप्रमाणें जीवन्मुक्तानेंहि निष्काम बुद्धीनें लोकसंग्रहार्थ आमरण सर्व व्यवहार करणें अधिक श्रेयस्कर होय. निष्कामत्वाचा व कर्माचा विरोध नाहीं असा गीतेचा सिद्धान्त आहे."

—गीतारहस्य, पृष्ठ २९७

ज्ञानोत्तर कर्म शक्य नाहीं ही जशी संन्यासमार्गीयांची एक शंका कर्मयोगाविरुद्ध पुढें येते, त्याचप्रमाणें निष्काम कर्म शक्य तरी आहे काय ? अशी एक शंका व्यव-

ह्मारश माणसांकडून विचारली जाते. 'यद्यद्धि कुरुते जन्तुः। तत्तत्कामस्य चेष्टितम्।' असें मनुस्मृतींत म्हटलें आहे. यावरून निष्काम बुद्धीनें कर्म होणेंच शक्य नाहीं आणि सकाम कर्म तर बंधनकारक असल्यानें तें सर्वांनींच त्याज्य मानलें आहे; अर्थातच निष्काम कर्मयोगाला 'वदतो व्याघातः' या न्यायानें अधिष्ठानच राहिलें नाहीं मग हें कर्मयोगाचें बंड कशाच्या आधारावर चालणार? असा हा आक्षेप संन्यासमार्गीयांकडून वस्तुतः पुढें येत नसला तरी कर्मसंन्यासाला तो पोषक असल्यानें कोणीकडून तरी कर्मयोगाची अशक्यता किंवा अव्यवहार्यता सिद्ध झाली म्हणजे आपलें काम झालें, अशा बुद्धीनें संन्यासमार्गी टीकाकारहि त्याचा आधार घेत असतात. हा आक्षेप शब्दाची स्पष्ट व्याख्या न केल्यानें निरुत्तर करणारा असा वाटतो. परंतु वास्तविक पाहतां 'यद्यद्धि कुरुते जन्तुस्तत्तत्कामस्य चेष्टितम' यांतील काम शब्द हा सकाम व निष्काम अशा दोन्ही प्रकारच्या हेतूला अनुसरून योजिलेला आहे. मनुष्य जें जें काम करतो तें तें फलाच्या आशेनें (सकाम) तरी केले असेल किंवा फलाची अपेक्षा न धरितां, अथवा फलत्यागाचा संकल्प मनांत धरून, (निष्काम) केलें असेल. जेथें केलेल्या कार्याला नैसर्गिक फल यावें अशीहि इच्छा नसेल तेथें मात्र कर्त्याच्या हातून कर्मच घडणार नाहीं. लोकसंग्रहादि हेतूनें किंवा ईश्वरार्पण बुद्धीनें अथवा यज्ञचक्र चालविण्याच्या कर्तव्यबुद्धीनें अगर वर्णाश्रम-धर्मोचित स्वकर्माभिरतत्वाच्या कर्तव्यभावनेनें जें कर्म केलें असेल तें निष्काम-कर्मच होय व तें बंधनकारक नाहीं. अर्थातच या ठिकाणीं 'निष्काम' या शब्दाचा अर्थ आसक्तिरहित एवढाच मानला पाहिजे. नाहीं तर ज्यांत ईश्वरार्पणादि बुद्धि स्पष्ट व्यक्त आहे तें कर्महि सकाम कर्मांच्या कोटींत घालावें लागेल! किंबहुना मोक्षाचा हेतु मनांत बाळगल्यानेंहि निष्काम कर्माला बाध येऊं शकेल! पण गीतेंत कोठेंहि मुमुक्षुत्व, मोक्षाकांक्षा, लोकसंग्रह, वर्णाश्रमधर्मतत्परता इत्यादि हेतु सकाम समजून त्याज्य मानलेले नाहींत. यावरून निष्काम कर्मयोग यांतील 'काम' शब्दाचा अर्थ 'बंधनकारक अशी वासना' एवढाच मर्यादित घेतला पाहिजे. तसें पाहूं गेल्यास निष्काम कर्म असा शब्दप्रयोग गीतेनें योजिलेलाच नाहीं. गीतेंत जेथें जेथें कर्मयोगाचें लक्षण किंवा पथ्य म्हणून सांगण्यांत आलें आहे त्या त्या ठिकाणीं आसक्ति सोडणें, फलासक्ति न धरणें, फलत्याग करणें, संगविवर्जित होणें इत्यादि शब्दप्रयोग आले आहेत. अर्थातच गीतेचा कटाक्ष आसक्ति व फल टाकण्याकडे आहे, म्हणून मनांत कसलीहि इच्छा नसतांना कर्म कसें हातून

घडूं शकेल हा आक्षेप गीतेंतील शब्दयोजनेला लागूं पडूं शकत नाहीं. काम-क्रोधादि षड्रिपूंच्या प्रेरणेनें कर्म करण्याविषयीं उद्भवणारी वासना त्याज्य असून असल्या षड्विकारांपासून अलिप्त असलेली साम्यबुद्धि निष्काम अशीच मानली जाते. यास्तव निष्काम बुद्धीनें कर्माचरण होऊंच शकत नाहीं आणि म्हणून कर्मयोगाचें सांगितलेलें लक्षण 'वदतो व्याघातः' अशा स्वरूपाचें आहे, ही कोटि-हि टिकूं शकत नाहीं.

## कर्माविषयीं आग्रह कां ?

यावर संन्यासमार्गीय सांप्रदायिक असें म्हणतील कीं, ज्ञानोत्तर कर्म होऊंच शकत नाहीं, आणि निष्काम कर्म शक्यच नाहीं, हे आमचे दोनहि आक्षेप कदाचित् चुकीचे असतील; पण ज्ञान्यानें कर्म केलेंच पाहिजे असा तुमचा आग्रह कां ? व ज्ञान्याला विधि-निषेध घालून देणारे तुम्ही कोण ? यावर उत्तर हेंच कीं, ज्ञानी माणसानें अज्ञान्यांचा बुद्धिभेद होऊं नये म्हणून आणि त्यांना शुद्ध वळण लागावें म्हणून कर्म करावीं असा आग्रह आमच्या पदरचा नसून गीतेचाच आहे आणि तो तृतीयाध्यायांत भगवंतांनींच स्पष्टपणें मांडलेला आहे. आतां विधिनिषेधाविषयीं एवढेंच सांगावयाचें आहे कीं, आम्ही कांहीं ज्ञान्यानें अमुक कर्म करावें किंवा अमुक करूं नये असा कायदा घालून देत नाहीं; कारण ज्ञान्यानें तसें आचरण न केले तरी त्यास कोणीहि कोणताहि दंड करूं शकत नाहीं, आणि ज्याला दंड किंवा प्रायश्चित्त सांगितलेलें नाहीं, किंवा सांगून देखील तें देतां येत नाहीं, ते सांगणें विधि निषेधांच्या कोटींत येत नाहीं. ती केवळ विज्ञप्ति, सदिच्छा किंवा फार तर प्रेमाची सक्ति म्हणतां येईल. ज्ञानी जसा एखादें कार्य करण्यास समर्थ असतो तसा अज्ञानी समर्थ होऊं शकत नाहीं म्हणूनच लोककल्याणाच्या इच्छेनें हा आग्रह आहे. ब्रह्मसिद्धान्तमालाकार म्हणतात कीं, 'स्वर्गाद्यानंदतृष्णास्ति राज्ञो नास्ति विवेकिनः । अतोधिको भवेद् ज्ञानी राज्ञो भावियादपि ॥ निवर्तते रसोप्यस्य परं दृष्ट्वेति गीयते । तस्मा न्न्यायविरुद्धं न वर्तनं ज्ञानिनो भवेत् ॥' म्हणजे राजा स्वर्गादि सुखाच्या इच्छेनें जितका चांगला राज्यकारभार करील त्यापेक्षां ज्ञानी मनुष्य विवेकाच्या जोरावर अधिक चांगला राज्यकारभार करील आणि ज्याअर्थी ज्ञान्याला विषयेच्छा राहिलेली नसते त्याअर्थी तो केव्हांहि न्यायविरुद्ध आचरण करणार नाहीं. या करितांच ज्ञानी माणसानें कर्मयोगी होऊन हीं कार्यें करावीं असा लोकहिताच्या

दृष्टीनें कर्मयोगाचा आग्रह आहे. Kings must be philosophers or philosophers must be kings' असें जें प्लेटोनें म्हटले आहे त्यांतला तरी अर्थ हाच आहे.

## संन्यासमार्गीयांचा कर्माचरणावर एवढा कटाक्ष कां ?

सर्व कर्मांचा संन्यास होणें शक्य नाहीं आणि जीवन्मुक्तसुद्धां प्रारब्धानुरूप राज्योपभोगादि कर्में करीत असतात, तर मग कर्मांचा त्यागच करावा असा संन्यासमार्गीयांचा तरी आग्रह कां व तो मानला जाणें शक्य आहे असें तरी त्यांस कसें वाटतें ? या शंकेचे उत्तर आचार्यकालीन परिस्थिति व कल्पना असेंच द्यावें लागतें. संहिताकालांतील यज्ञादि काम्य कर्मांची उत्क्रान्ति होत होत उपनिषत्कालांतील तत्त्वज्ञानाचा उदय झाला. त्या तत्त्वज्ञानांतहि प्रारंभीं कर्मत्यागावर कटाक्ष नव्हताच; पण पुढें बौद्धकालांतील तत्त्वज्ञान प्रबल होऊन प्रसार पावूं लागल्यानें वैदिक यज्ञादिक क्रिया मागें पडल्या. त्यांचा पुनरुद्धार मीमांसकांनीं केला. पण त्या उत्साहभरांत मीमांसकांनीं कर्माला प्रत्यक्ष परब्रह्माच्याच कोटीला नेऊन भिडविलें ! या मीमांसकांच्या कर्मकांडाचा अतिरेक झाला असतां भगवान् श्रीशंकराचार्यांचा अवतार झाला. त्यांच्यापुढें त्यांचे प्रतिपक्षी म्हणून मीमांसकच त्यांना दिसत होते. इतर प्रतिस्पर्ध्यांचें खंडन आचार्यांनीं सहजासहजीं केलें. मीमांसकांच्या यज्ञादिकर्मांचा मात्र जनतेवर एवढा पगडा बसला होता कीं, तो दूर करून भक्तिमार्गाचें व ज्ञानमार्गाचें बीजारोपण करण्याकरितां त्यांना जबरदस्त परिश्रम करावे लागले व त्यांत मीमांसकावर निष्ठुरपणें हत्यार चालवावें लागलें. कर्म म्हणजे काम्यकर्म याच्याशिवाय कर्म शब्दाला आचार्यांच्या वेळीं अर्थच उरला नव्हता. आणि अशा व्रतवैकल्यादि क्षुद्र काम्यकर्मांविषयींची आसक्ति सर्वस्वीं घालविल्यावांचून निष्काम कर्मयोग किंवा भक्तिमार्ग किंवा ज्ञानमार्ग यांचें आचरण आदरपूर्वक होऊं लागणें संभवनीय नव्हतें. यास्तव कर्म म्हटलें कीं, तें त्याज्यच, असें म्हणून कर्मावर आचार्यांनीं झोड उठविली ! पण त्यांत त्यांचा कटाक्ष सकाम-कर्मावर होता, निष्काम व लोकोपकारक कर्मावर नव्हता, हें त्यांच्या स्वतःच्या आचरणावरून आणि त्यांनीं केलेल्या धर्माच्या व्याख्येवरून दिसून येतें. धर्माचीं साक्षात् अभ्युदय व निःश्रेयस हीं दोन अंगें आहेत. धर्म प्रवृत्तिलक्षण व निवृत्तिलक्षण असा दुहेरी स्वरूपाचा आहे हें सांगणारे आचार्य यच्चावत् कर्मांचा त्याग केलाच पाहिजे असें कसें सांगतील?

आणि स्वतः तरी ज्ञानोत्तर कालांत प्रस्थानत्रयींचें लेखन, परमतखंडन, दिग्विजय आणि मठस्थापना इत्यादि कार्यें कां करतील? अर्थात्च हीं सर्व कर्में ज्ञानी माणसाकडून होणें शक्य, अवश्य व इष्टहि आहे असेंच त्यांस देखील वाटत असावें.

## कर्मयोग व कर्मसंन्यास यांत तत्त्वतः भेद नाहीं.

मग आचार्यांच्या कर्मत्यागाचा किंवा कर्मसंन्यासाचा अर्थ काय मानावयाचा? तर तो अर्थ गीतेच्या 'कर्मण्यकर्म यः पश्येत्' या श्लोकांत जसा दर्शविला आहे तसाच मानला पाहिजे. वर उल्लेखिलेल्या व स्वतः आचरिलेल्या सर्व कर्मांना आचार्य हे गीतेच्याच तात्त्विक दृष्टीनें 'अकर्म' मानीत होते. कारण हीं सर्व कामें त्यांनी आसक्ति न धरितां चालविलेलीं होतीं. त्यांचा संन्यास हा गीतेंतच वर्णिल्याप्रमाणें 'काम्यांना कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः' अशाच स्वरूपाचा होता. आणि 'नैव किंचित्करोमीति युक्तो मन्येत तत्त्ववित्' यांत सांगितल्याप्रमाणें आचार्य हे स्वतः आपण कोणतेंहि कर्म करीत नाहीं असेंच मानीत होते. ती त्यांची समजूत योग्यच होती; पण यांत समजुतीचा घोटाळा होण्याला संदिग्ध शब्दयोजना कारणीभूत झाली. 'कर्मण्यकर्म यः पश्येत्' हा नियम स्वतः श्रीकृष्णानेंच सांगितलेला आहे व कर्म करूनहि 'लिप्यते न स पापेन पद्मपत्रमिवांभसा' अशी निर्लेपवृत्ति राखणें हा आचरणाचा उत्तम मार्ग होय असेंहि श्रीकृष्णानें सांगितलें आहे. पण त्यांत कर्म घडतच नाहीं असें नसून कर्मांचे जीवात्म्यावर परिणाम घडत नाहींत. म्हणून अशा कर्माला 'अकर्म समजावें' पण त्यास अकर्म म्हणूं नये! गीतेंत तरी 'कर्मण्यकर्म यः पश्येत्' असें म्हटलें आहे. 'कर्मकृत्वा तदकर्म वदेत्' असें म्हटलेलें नाहीं. पण कर्म करून तें अकर्मासारखेंच आहे असें मानतां मानतां ती भाषा बदलून ज्ञान्यानें केलेलें कर्म हें 'अकर्मच' आहे असें म्हणतां म्हणतां ज्ञानी 'कर्मच करीत नाहीं' अशी भाषा दृढ होऊं लागली आणि ज्ञानी व कर्मत्याग या शब्दांचें साहचर्य इतकें दृढ झालें कीं, ज्ञान्याच्या हातून कर्म होऊं शकतच नाहींत अशी कल्पना रूढ झाली आणि मग तिच्याहिपुढें एक पायरी जाऊन ज्ञान्याचे हातून कर्म घडतें, असें म्हणणें हें 'तमः प्रकाशवत्' विरोधात्मक वाटूं लागलें! ज्याला कर्मयोगी 'निष्काम कर्म' म्हणतात व जें ज्ञान्यांच्या हातून घडतें व घडणें इष्ट व आवश्यक आहे असें ते मानतात तेंच कर्म तशाच निष्काम वृत्तीनें संन्यासमार्गीहि करीत असतात; पण त्यांची भाषा मात्र

कर्मयोग्याहून निराळी, म्हणजे 'ज्ञानी कर्मच करीत नाहीं' अशी असते ! एकादशी-च्या दिवशीं कांहींच न खाणें हें उक्त; पण कित्येकांचा देहधर्म चालत नाहीं असें ओळखून शास्त्रकारांनीं कांहीं विशिष्ट पदार्थ खाण्यास परवानगी दिली आहे. अर्थातच हे पदार्थ भक्षण करूनहि एक जण मीं 'निरशन केलें' असें म्हणेल, तर दुसरा एखादा त्याच स्थितींत मीं 'फलाहार' केला असें सरळ सांगेल. दोघांनाहि एकादशीचें व्रत सारखेंच मान्य आणि दोघांचा आचारहि सारखाच; पण भाषा मात्र वेगळी. तसाच फरक संन्यासमार्गी व कर्मयोगी यांच्या भाषेंत दिसून येतो. नहून तत्त्वांत फरक मुळींच नाहीं. लोकमान्य ज्याला 'कर्मयोग' म्हणतात त्याच कर्मयोगाला 'कर्मसंन्यास' असें म्हणून आचार्यांनीं तसेंच आचरण स्वतः केलें.

## कोणताहि वर्णधर्म घेतला तरी त्यांत कर्मयोग कायमच.

अर्जुन क्षत्रिय म्हणून कर्मयोगाचा उपदेश त्याच्यापुरताच लागू आहे; पण इतरांना तो लागू नसून त्यांच्याकरितां गीतेनें संन्यासमार्ग सांगितला आहे, असें मानणारे टीकाकार गीतेंतील स्वधर्म, सहजकर्म, नियतकर्म, वर्णधर्म इत्यादि शब्दांकडे दुर्लक्ष करितात. श्रीकृष्णाने जो कर्मयोग सांगितला तो चारहि वर्णांना एकत्र सारखाच सांगितला आहे. ज्यानें त्यानें आपलें 'स्वभावनियत' कर्म करावें असें म्हटल्यानें अर्जुनाला जसा युद्धाचा उपदेश त्यात येतो, तसाच ब्राह्मण, वैश्य, शूद्र यांनाहि त्यांचे त्यांचे वर्णाश्रमाला अनुसरून असलेलें कर्म त्यांनीं करावें असाच त्यांतून अर्थ निष्पन्न होतो. अर्जुन क्षत्रिय होता म्हणून त्याला युद्ध करावयास सांगितलें हें खरें; पण त्याबरोबरच अर्जुनाचे जागीं जो कोणी गीतेचा वाचक आपण स्वतः श्रीकृष्णाचा उपदेश ऐकत आहों असें मानील त्यालाहि आपल्या स्वतःच्या वर्णाला अनुरूप असें कर्म आपण केलें पाहिजे हेंच रहस्य त्यांतून घ्यावें लागेल. अर्थातच कर्म करणें ही गोष्ट सर्वच वर्णांना सामान्य अशीच राहाणार. त्यांत कांहीं क्षत्रियाला केलेल्या उपदेशांत कर्म-योग आणि ब्राह्मणाला केलेल्या उपदेशांत संन्यासयोग असा भेद सांपडणार नाहीं. त्यामुळें अर्जुन क्षत्रिय होता म्हणून त्याला कर्मयोग सांगितला आहे असली कोटि निराधार ठरते.

## वानप्रस्थाश्रमाची श्रेष्ठता

संन्यासमार्गाच्या उपदेशामुळें कर्मयोग मागें पडून देशाची जी हानि झाली, तिचें बीज वानप्रस्थाश्रमाच्या लोपांत आहे. संन्यास व वानप्रस्थ या दोहोंपैकीं

संन्यासाश्रम श्रेष्ठ मानला आहे असें स्मृतिग्रंथावरून दिसतें; तथापि उपनिषद् ग्रंथांनीं संन्यासाश्रमापेक्षां वानप्रस्थालाच प्राधान्य दिलें आहे. वैदिक धर्मांत जी आश्रमव्यवस्था करण्यांत आली तींत प्रथमतः तीनच आश्रम स्थापन करण्यांत आले होते. पुढें वानप्रस्थाचा पोटभेद म्हणून शिखासूत्ररहित असा चतुर्थ संन्यासाश्रम रूढ होत गेला. छांदोग्य उपनिषदांत 'त्रयो धर्मस्कंदाः' असें म्हटलें आहे (छां०. २।२३।१). हे धर्मस्कंद म्हणजे आश्रमच होत. वानप्रस्थ हा मनानें व वैयक्तिक आचरणानें संन्यासी, वेषानें गृहस्थ व व्यवहारानें समाजाचा स्थितप्रज्ञ असा नेता असतो. वानप्रस्थाश्रमाची ही तिहेरी रचना पाहिली म्हणजे लोकनायकाच्या भूमिकेची खरी कल्पना कोणाच्याहि सहज लक्षांत येण्याजोगी आहे. गीतेत सांगितलेली ब्राह्मीस्थिति व लोकसंग्रह ह्या दोहोंचा मेळ या वानप्रस्थाच्या उच्चतम भूमिकेवर उत्कृष्ट बसतो. असे स्थितप्रज्ञ पुढारी समाजाला लाभणें हे समाजाचे भाग्यच समजलें पाहिजे, परंतु भरतखंडांत बुद्धसंप्रदायाची भरमसाट भरभराट झाल्यामुळें संन्यासमार्गाला अवास्तव महत्त्व येऊन सामाजिक श्रेष्ठता देखील त्याच मार्गाकडे गेली. बहुजनसमाजाच्या दृष्टीनें संन्यासाश्रम जो एकदां श्रेष्ठ ठरला तो बुद्धधर्म अस्तंगत झाला तरी खालीं उतरला नाहीं. त्यामुळेंच श्रीमत् शंकराचार्यांना हिंदुसमाजांत संन्यास संप्रदायाची आवश्यकता अधिक वाटली असल्यास त्यांत फारसें नवल नाहीं. कोणत्याहि कारणानें कां होईना, वानप्रस्थाची उच्च पदवी जी एकदां संन्यासाश्रमाला मिळाली ती आतांपर्यंत कायम राहिली आहे. पण या योगानें समाजाचें दुर्दैवच ओढवलें; कारण समाजाचे खरे नेते नाहींसे झाले. संन्यासपर वेदान्ताची वाढ होत गेली, त्या मानानेंच संन्यासाची महती वाढत जाऊन समाजाची हानिच होत गेली. अशी हानि होऊं नये म्हणून आचार्यांनीं मठाची व्यवस्था करून पर्यायानें वानप्रस्थाचें कार्य संन्यासाश्रमास जोडलें. पण दुर्दैवानें आचार्य लवकरच निजधामास गेल्यामुळें म्हणा अगर आचार्यांचे पश्चात् ही वानप्रस्थाची जबाबदारी संन्याशांना झेपली नाहीं म्हणून म्हणा, आचार्यांची ही मठव्यवस्था राष्ट्राच्या इतिहासांत फारशी कार्यकर्ती झाल्याचें दिसून येत नाहीं. या सर्व कारणांचा विचार करतां समाजांत वानप्रस्थाचे योग्य प्रकारें पुनरुज्जीवन केल्यावांचून खऱ्या लोकनायकांचा हिंदुसमाजास लाभ होणार नाहीं. वानप्रस्थाश्रमाचें पुनरुज्जीवन झाल्यास अज्ञानी मनुष्य समाजाचा पुढारी व ज्ञानी मनुष्य समाजाविषयीं पूर्ण उदासीन, असली हानिकारक विषमस्थिति नाहींशी होऊन समाजाचें खरें कल्याण होईल.

ज्ञान्यांचा हा उदासीनपणा नाहींसा करण्याचा अप्रत्यक्ष प्रयत्न आचार्यांच्या पश्चात् कित्येक विद्वान् ग्रंथकारांनीं व साधुसंतांनीं केला आहे. त्यांत स्वामी विद्यारण्य, मुकुंदराज, नामदेव इत्यादि सत्पुरुषांची प्रमुखपणें गणना करण्यास हरकत नाहीं. तथापि त्या प्रयत्नांचा परिणाम फारसा आशाजनक दिसून आला नाहीं. या संन्यास-मार्गीय औदासीन्याच्या विरुद्ध समर्थ रामदासस्वामींचा प्रयत्न मात्र फार जोरदार व परिणामकारक झाला. यावरून आचार्यांनंतर कर्मयोगाला खरें चालन समर्थांनींच दिलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. आणि सद्यःकालीन परिस्थितिहि तशीच असल्यामुळें लोकमान्यांनाहि कर्मयोगाचा आदर्श जनतेपुढें ठेवावा लागला. या तिघांहि विभूतींच्या तत्त्वज्ञानांत विरोध कोठेंच नाहीं, आणि समाजाच्या उत्कर्षाची तळमळहि सर्वांस सारखीच आहे. मात्र आचार्यांच्या वेळीं संन्यासमार्गाची भावना उद्दीपित करणें अवश्य होतें म्हणून त्यांनीं आवश्यक कराव्या लागणाऱ्या कर्मांचा समावेश 'अकर्मांत' करून कर्मत्यागाचा उपदेश केला. उलटपक्षीं श्रीसमर्थ व लोकमान्य यांना आवश्यक कर्मांचेंच महत्त्व पटवून देणें इष्ट वाटून ज्ञानोत्तरहि कर्म करावें अशा कर्मयोगाच्या उपदेशावर त्यांनीं अधिक भर दिला. दोन्हि सांप्रदायांचा उद्देश व उपदेश एकच पण भाषेंत मात्र भेद.

## गीतेंतील भाषा कोणत्या पद्धतीची आहे ?

पण गीतेची भाषा या दोहोंतून कोणत्या स्वरूपाची आहे, याचा विचार केल्यास ती आचार्यांच्या भाषासरणीस अनुकूल नसून समर्थ व लोकमान्य यांच्या भाषापद्धतीसच अनुकूल आहे हें गीतेच्या सूक्ष्म निरीक्षणानें लक्षांत येण्यासारखें आहे. कारण गीतेच्या वेळच्या परिस्थितीचें आचार्यकालीन परिस्थितीशीं साम्य नसून समर्थकालीन अथवा सद्यःकालीन परिस्थितीशीच तिचें सादृश्य अधिक जुळतें आणि म्हणूनच गीतेंत 'कर्मण्यकर्म यः पश्येत्' याच्यावर जितका जोर दिला आहे त्यापेक्षां 'अकर्मणि च कर्म यः' यावर अधिक जोर दिला आहे आणि जेथें तेथें 'सर्वथा वर्तमानोऽपि कर्मभिर्न स बद्ध्यते' असें आश्वासन देऊन कर्मयोगाची प्रवृत्ति जागृत व उद्दीपित केली आहे. प्रवृत्ति व निवृत्ति या दोहोंतून केवळ निवृत्तीचाच गीतेला उपदेश करावयाचा असता तर दैवासुरसंपत्तीच्या वर्णनांत आसुरी लोक केवळ प्रवृत्तीच्या मार्गें लागतात असें स्पष्ट म्हटलें असतें; पण तसें न म्हणतां त्यांना कोणत्या कार्याविषयीं प्रवृत्ति व कोणत्या कार्यापासून निवृत्ति

असावी हें समजत नाहीं असें म्हटलें आहे. म्हणजे कांहीं कर्माविषयींची प्रवृत्ति ही निवृत्तीइतकीच गीतेस इष्ट वाटते हें उघड आहे.

कर्मयोगी अनासक्त बुद्धीनें कर्माचरण करीत असतां त्याला सम्यक्सिद्धि म्हणजे मोक्ष प्राप्त होतो याविषयीं गीतेंत 'कर्मणैव हि संसिद्धिमास्थिताः जनकादयः' 'स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः।' 'असक्तबुद्धिः सर्वत्र जितात्मा विगतस्पृहः। नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति।' 'कर्मजं बुद्धियुक्ता हि फलं त्यक्त्वा मनीषिणः। जन्मबंधविनिर्मुक्ताः पदं गच्छन्त्यनामयम्।' 'तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर। असक्तो ह्याचरन्कर्म परमाप्नोति पुरुषः।' 'सर्वकर्माण्यपि सदा कुर्वाणो मद्व्यपाश्रयः। मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम्।' 'त्यागी सत्त्वसमाविष्टो मेधावी छिन्नसंशयः' (१८-२०) 'हत्वाऽपि स इमांल्लोकान्नहन्ति न निबध्यते' (१८-१७). इत्यादि वचनांतून कर्मयोग्यांना कर्म संन्यास न करतां मोक्ष प्राप्त होतो असें गीतेंत वारंवार सांगितलेलें आहे. वर दिलेल्या कोणत्याहि वचनांत स्वरूपतः संन्यासाचा तिळमात्रहि संबंध येत नाहीं. उलट, प्रत्येक ठिकाणीं कर्में करीत असतांनाच किंवा कर्में करून देखील मोक्ष मिळतो असेंच सांगितले आहे. या वचनांत संन्यासाचा जर कोठेंहि संबंध असेल तर तो संन्यासमार्गीयांनीं दाखवून द्यावा.

गीता हें कर्मयोगशास्त्र असल्यानें त्यांत 'कुरु कर्मैव तस्मात्त्वं' यासारखीं अनेक विधिवाक्यें ठिकठिकाणीं आलीं आहेत. गीतेला जर संन्यास-धर्माचें प्रतिपादन करावयाचें असतें तर एखादे ठिकाणीं तरी 'त्यज कर्म च तस्मात्त्वं' असें वाक्य आलें असतें. पण सबंध गीतेंत असें वाक्य एकहि आढळत नाहीं. मग त्यावरून अनुमान कोणतें काढावयाचें? 'त्यज कर्म च तस्मात्त्वं' असें ठासून सांगणारें एकहि वाक्य आढळत नसून उलटपक्षीं 'कार्यं कर्म समाचर' यासारखीं अनेक वाक्यें जागोजाग आढळत असतां गीतेनें कर्मयोग न सांगतां कर्मत्याग सांगितला आहे असें कोणी मानूं लागल्यास त्याच्या तर्कशास्त्राला दुरूनच नमस्कार करणें हेंच बरें!

कर्मयोगाची जितक्या प्रकारानें प्रशंसा करतां येईल तितकी करून कर्मयोग आचरण्याविषयीं जितक्या प्रकारांनीं सांगतां येईल तितक्या सगळ्या प्रकारांनीं गीतेंत कर्माचरण करण्याविषयीं सांगितलें आहे; तसेंच कर्माचरण टाकल्यानें

घडणाऱ्या दोषांचेंहि वर्णन केलें आहे हें पुढील कांहीं उदाहरणांवरून लक्षांत येईल. या गीतेंतील विधानांचें वर्गीकरण केल्यास तें पुढील स्वरूपाचें दिसून येतें:

[१] कर्मसंन्यासापेक्षां कर्मयोग श्रेष्ठ आहे (५–२),(३–७),(६–४६),(३-८).
[२] कर्मत्याग अशक्य आहे (३–५), (३–३३), (१८–५९), (१८–६०). (१८–११), (१८–७).
[३] नियत कर्माचा त्याग करूं नये (१८–४८).
[४] यज्ञादिकर्म टाकल्यानें अघायुत्वाचा दोष येतो (३-१६) (३-१२).
[५] श्रेष्ठ पुरुषांनीं कर्म टाकल्यानें अज्ञ लोकांचा बुद्धिभेद होतो व वर्णसंकरादि आपत्ति ओढवते (३-२१-२९).
[६] कर्मे टाकल्यानें मिथ्याचाराची प्रवृत्ति होते (३-६).
[७] कर्मे न केल्यानें नैष्कर्म्य साधतेंच असें नाहीं; (३–४) कारण कित्येक वेळां अकर्मांतहि कर्म असतें (४-१८).
[८] कर्माचरणानें लोकसंग्रह साध्य होतो (३-२१).
[९] कर्मसंन्यासापेक्षां कर्मयोग सुलभ आहे (५-६).

इतक्या वेगवेगळ्या प्रकारांनीं **कर्मयोगाची आवश्यकता व श्रेष्ठता** आणि **कर्मत्यागाची असंभवनीयता व सदोषता** गीतेंत वर्णिली असून त्याकडे दुर्लक्ष करून संन्यासमार्गीयांनीं गीतेला संन्यासपर बनविलें आहे,हे महदाश्चर्य होय. जर भगवंतांना कर्मत्यागच सांगावयाचा होता तर तसा स्पष्ट निर्देश करण्यास काय हरकत होती; पण तसा निर्देश करण्याचा प्रसंग आला असतां तसा उल्लेख टाळून कर्मत्यागाच्या ऐवजीं कर्माची आसक्ति टाकावी असाच उपदेश गीतेंत जागोजाग करण्यांत आला आहे. उदाहरणार्थ, पंधरावा अध्याय पाहा. हा अध्याय सगळ्या गीतेचा सारभूत असा अध्याय आहे व त्यांत संसारवृक्षाचें काव्यमय वर्णन आहे. पण तेथेंहि त्या वृक्षाचें छेदन 'अकर्मशस्त्रेण' करावें असें न सांगतां 'असंगशस्त्रेण' करावें असेंच सांगितलें आहे व त्याच अध्यायांत पुढें 'निर्मानमोहा जितसंग-दोषाः' या वाक्यांतहि कर्मसंन्यास करणाऱ्यांचें वर्णन नसून 'जितसंगदोष' अशा कर्मयोग्यांचेंच वर्णन आहे व असे कर्मयोगी मोक्षाप्रत जातात असेंहि स्पष्ट म्हटलें आहे.

अशा प्रकारें कर्मयोगाचा पुरस्कार गीतेंत जितक्या उत्कटत्वानें केला आहे तितका गीतारहस्यांतहि केलेला नाहीं. कारण लोकमान्यांना या नव्याच भासणा-

ऱ्या कर्मयोगाचा पुरस्कार संन्यासमार्गाच्या सांप्रदायांत आजपर्यंत नांदावलेल्या जनतेस एकदम कितपत पटेल याविषयीं शंकाच वाटत असावी. नाहीं तर विष्णु-पुराणांतल्याप्रमाणें 'अपहाय निजं कर्म कृष्ण कृष्णेति वादिनः । ते हरेर्द्वेषिणः पापा धर्मार्थं जन्म यद्धरेः ॥' असा स्पष्ट शेरा लोकमान्यांनींहि मारला असता. ज्ञानेश्वरांनींहि कर्माची खंति करणाऱ्यांना 'गांवढे' असें विशेषण लावून त्यांना टोमणाच मारला आहे. लोकमान्यांनीं इतकी स्पष्टोक्ति वापरलेली नाहीं. तरी पण आधुनिक संन्यासमार्गीयांचा विष्णुपुराणावर किंवा ज्ञानेश्वरीवर रोष नसून लोकमान्यांच्या मताबद्दल मात्र त्यांनी काहूर करावें याचें आश्चर्य वाटतें !

## कर्म करून मोक्ष संपादण्याची युक्ति

"कर्माचा विंचू कधींच ठार मरत नाहीं; याराठीं तो जेणेंकरून निर्विष होईल अशी युक्ति म्हणजे कर्माच्या ठिकाणीं असलेली आपली आसक्ति सोडणें ही होय असा गीतेचा सिद्धान्त आहे." —गीतारहस्य, पृष्ठ ६४'*

हातून घडणारें कर्म चांगलें असो वा वाईट असो, न्याय्य असो वा अन्याय्य असो, ज्याच्या हातून जें जें कर्म घडलें त्याचें त्याचें फल कर्त्याला भोगावेंच लागतें. या जन्मीं केलेलें कर्म पुढील जन्मांत कर्त्याला शोधीत येतें व त्याला फल भोगावयाला लावतें आणि अशा रीतीनें पूर्वीच्या कर्माचें फल भोगीत असतांना नित्य नवीं कर्में हातून घडतच असतात व त्यांचें फल भोगण्याकरितां पुनः जन्म घ्यावा लागतो ! अशा रीतीनें या कर्मामुळेंच जन्म मरणाचा फेरा पाठीस लागतो. तेव्हां हा जन्ममरणाचा फेरा चुकविण्यासाठीं कर्माचा त्याग केला पाहिजे. अर्थातच कर्म हें मोक्षाच्या आड येत असल्यामुळें कर्मत्याग हीच मुमुक्षूची पहिली पायरी होय, अशीच सामान्य समजूत आहे, व तीस अनुसरून अर्जुनानें मी हें युद्धरूपी कर्मच टाकून देतों आणि मोक्षाच्या मार्गाला लागतों असें म्हटलें. श्रीकृष्णाला जर संन्यासमार्गाचा उपदेश करावयाचा असता तर त्यानें अर्जुनाच्या या विचाराला दुजोरा देऊन तुझा विचार योग्य आहे, चल, मीहि तुझ्याबरोबर येतों असें म्हटलें असतें ! पण श्रीकृष्णाचा अवतार 'परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् । धर्मसंस्थापनार्थाय' अशा या त्रिविध कार्याकरितां असल्यानें त्याला हा कर्मसंन्यासाचा विचार कसा पटावा ? जो ईश्वर आपलें अव्यक्त व निर्गुण स्वरूप सोडून

व्यक्त व सगुण होतो तो अवतारकार्य पूर्ण होण्यापूर्वी कर्मसंन्यास कसा स्वीकारील व आपल्या जोडीदाराला तरी तो मार्ग कसा स्वीकारूं देईल ! अशा रीतीनें श्रीकृष्णानें कर्मत्यागाला संमति देणें शक्यच नव्हतें; व तशी संमति अर्जुनाला दिलीहि नाहीं. पण तेवढ्यावरून श्रीकृष्णाला अर्जुनानें सतत बद्ध स्थितींतच रहावें व मुक्त केव्हांच होऊं नये, असें वाटत होतें असे मात्र समजावयाचें नाहीं. प्राप्तकर्म तर टाळावयाचें नाहीं आणि मोक्षहि हातचा दवडावयाचा नाहीं; हा तर गीतेचा दंडक. हे दोन्ही हेतु साधले तर ते कोणास नको असतात असे नाहीं, पण एकाच वेळीं दोन्ही कशीं साधावीं, ही दुहेरी शिकार कशी करावी, याची युक्ति सामान्य जनाना माहीत नसल्यामुळें ते गोंधळून जातात व या दोहोंतून कोणती तरी एक गोष्ट स्वीकारून दुसरीचा ते त्याग करतात. परंतु श्रीकृष्णाला कर्म करून मोक्ष संपादण्याची युक्ति माहीत असल्यामुळें त्यानें आपल्या भक्ताला गीतेंत ती युक्ति सांगितली आणि त्याच्या हातून आपलें अवतारकार्य घडवून आणलें.

कर्म टाकून मोक्ष संपादणें किंवा मोक्ष टाकून कर्म करणें हे कोणासहि करतां येईल. परंतु कर्म करून त्याबरोबर मोक्षहि संपादन करण्याचा उपाय फारच थोड्यांना माहीत असतो. व त्यांतूनहि फारच थोड्यांना तो साधतो. हा उपाय म्हणजेच गीतेंत सांगितलेला कर्मयोग होय. '**बुद्ध्या युक्तो यया पार्थ कर्म—बंधं प्रहास्यसि**' (२ ३९) ही ती युक्ति होय. पूर्वी श्रीकृष्णानेंच हा कर्मयोग विवस्वानाला सांगितला होता; विवस्वानानें तो मनूला सांगितला; मनूनें तो इक्ष्वाकूला सांगितला, अशी त्याची पूर्वपरंपरा असून ती परंपरा राजर्षीत चालू होती. पण कालांतरानें ती सांखळी तुटल्यामुळे आता श्रीकृष्णास अर्जुनाला तोच उपदेश पुनः करावा लागला. अशा रीतीनें गीतेंतील उपदेश हा नवा नसून तो जुनाच आहे व तो ब्रह्मर्षीकरितां नव्हे तर राजर्षीकरितां आहे, आणि राजर्षींच्या उपदेशांत संन्यासमार्ग प्रतिपादन केला जाणें सुसंगत दिसत नाहीं. अर्थातच गीतेंतील उपदेश कर्मसंन्यासपर नसून कर्मप्रवृत्तिपर असला पाहिजे हें या परंपरेवरूनहि सिद्ध होतें.

## कर्मयोगाची चतुःसूत्री

कर्मसंन्यासाचा अव्हेर करून कर्मयोगाचें प्रतिपादन करण्याला प्रारंभ केल्यावर प्रथमच श्रीकृष्णांनीं या कर्मयोगाची चतुःसूत्री सांगितली आहे. अध्याय २, श्लोक

४५ ते ४८ हे चार श्लोक चतुःसूत्रींत समाविष्ट होतात. त्यांत पहिल्या श्लोकांत कर्मयोगाचे तात्त्विक स्वरूप, दुसऱ्यांत कृतार्थता हें कर्मयोगाचें साध्य आणि पुढील दोन श्लोकांत कर्मयोगाचे स्वरूप सांगितलें आहे. या चार श्लोकांत मिळून कर्मयोगाचा प्रधान सिद्धान्त पुरा होतो. त्यांत बोट शिर करण्यासुद्धा संन्यासमार्गाला जागा मिळावयाची नाही. वस्तुतः संन्यास व कर्मयोग यांत तात्त्विक भेद नाहीं. पण संन्यासमार्गाला कर्माचीच काय ती अडचण वाटते. आणि तें कर्म तर या चतुःसूत्रींत इतकें पक्कें बसविलें आहे कीं. तें किंचित् इकडे तिकडे केल्यास सिद्धान्ताची हानि आल्यावांचून राहात नाही. दुसऱ्या अध्यायांतील ३९ व्या श्लोकापासून योगनिष्ठेच्या उपदेशास सुरवात झाली असून हा सूत्रमय उपदेश ५४ व्या श्लोकापर्यंत पुरा झाला आहे. या प्रकरणांत वर दिलेले चतुःसूत्रीचे चार श्लोक मुख्य आहेत. म्हणूनच या चार श्लोकांत सांगितलेला सिद्धान्त हा कर्मयोगाचा बीजभूत सिद्धान्त होय असे ठरतें. शिवाय या १०–१२ श्लोकांच्या प्रकरणांतहि संन्यासमार्गाला कोठेच वाव मिळत नाही. ४६व्या श्लोकांतील 'ब्राह्मणस्य विजानतः' या पदांत संन्यासमार्ग बसविण्याचा प्रयत्न संन्यासमार्गीय टीकाकारांनी केला आहे; परंतु हा प्रयत्न अगदींच निष्फळ होय असे म्हणणें प्राप्त आहे. कारण, ब्राह्मण हें सामान्यनाम व विजानन् हें धातुसाधित या दोहोंपैकी एकहि शब्द संन्यासाचा वाचक नाही. लक्षणेची ओढाताण केल्यास लाक्षणिक अर्थास जें प्रमाण असावें लागतें तेंहि या प्रकरणांत कोठेच मिळणें शक्य नाही. यावरून या ३९–५३ श्लोकांच्या प्रकरणांत जें प्रतिपादन आहे तें कर्मयोगाचेंच होय आणि त्यांतील ४५ ते ४८ पर्यंतच्या चार श्लोकांत आलेल्या मुख्य सिद्धान्तास कर्मयोगाची चतुःसूत्री असे म्हणण्यास हरकत नाही. गीतेचें रहस्य म्हणजे कर्मयोगरहस्य ज्याला शोधावयाचें असेल त्यानें तें या चतुःसूत्रींत शोधून पाहावें. अशा रीतीनें या चतुःसूत्रीची कल्पना वसवून तिचें विवरण भिडेशास्त्री यांनी फारच मार्मिकतेनें केलें आहे.

## कर्म करूनहि अकर्ता

अशा रीतीनें या चतुःसूत्रींत कर्मयोगाचे मूलभूत सिद्धान्त सांगून त्यांचाच विस्तार पुढील १६ अध्यायांत केलेला आहे. अर्थातच तो सर्व विस्तार कर्मयोगपर किंवा कर्मयोगाला अनुकूल असाच असला पाहिजे व तसाच तो आहे. असें असतां या चतुःसूत्रीच्या पुढें 'दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनंजय ।

बुद्धौ शरणमन्विच्छ कृपणाः फलहेतवः ॥' असा जो श्लोक आला आहे त्यांतील 'दूरेण ह्यवरं कर्म' एवढा एकच चरण वेगळा तोडून घेऊन व त्याचा संदर्भरहित असा कांहीं तरी अर्थ करून, कर्मयोग हा सांख्ययोगापेक्षां म्हणजे संन्यासमार्गापेक्षां फारच कमी प्रतीचा आहे असें म्हणून, श्रीकृष्णानें कर्ममार्गाचें त्याज्यत्व दाखाविलें आहे असें संन्यासमार्गी म्हणतात ! पण त्यांची ही गैरसमजूत आहे. या श्लोकांत कर्मयोगापेक्षां कर्मसंन्यास श्रेष्ठ असें मुळींच सांगितलेलें नाहीं. कर्मसंन्यास हा शब्द किंवा त्या अर्थाचा शब्द या श्लोकांत कोठेंहि नाही. बुद्धियोगापेक्षां प्रत्यक्ष कर्म म्हणजे कर्माचें बाह्यस्वरूप हे कमी प्रतीचें आणि म्हणूनच त्या कर्माच्या फलावर आसक्ति ठेवणारे कृपण होत असे यांत म्हटले आहे. बाह्य कर्माला यांत गौणत्व दिलें तें कर्माचा स्वरूपतः संन्यास सांगण्याकरितां दिलेलें नसून बुद्धीचें म्हणजे त्या कर्माच्या पाठीमागें असलेल्या हेतूचें श्रेष्ठत्व सिद्ध करण्याकरितां होय. 'बुद्धौ शरणमन्विच्छ' या वाक्यांत बुद्धीचा आश्रय कर असें सांगण्यांत आलें आहे. आश्रय करावयाचा तो एखादें संकट निवारण्याकरितां करावयाचा असतो. कर्म करण्यांत असें कोणतें संकट येणार, कीं ज्या संकटाचा परिहार करण्याकरितां बुद्धीची ढाल पुढें करावी लागणार आहे ? अर्थातच या ठिकाणीं कर्मापासून पाप किंवा पुण्य कांहींहि घडलें तरी तें बंधनकारकच आहे, ही अर्जुनाची भीति लक्षांत घेऊन त्या भीतींतून सुटका होण्याकरितां बुद्धियोगाचें साधन सांगितलें आहे आणि हें साधन ज्यांच्या हातीं नसतें असे जे केवळ फलावर नजर ठेवणारे—सकाम कर्म करणारे—त्यांची बंधनांतून सुटका होत नाहीं हें 'कृपणाः फलहेतवः' या पदानें सुचविलें आहे. आणि याच्या उलट जो कर्मयोगी समत्वबुद्धीनें कर्म करितो तो पाप व पुण्य या दोहोंपासून मुक्त असतो हें त्याच्याच पुढील 'बुद्धियुक्तो जहातीह उभे सुकृतदुष्कृते ।' या श्लोकार्धांत सांगितलें आहे. सारांश, 'दूरेण ह्यवरं कर्म' हा जो श्लोक संन्यासमार्गीयांचा सर्वांत मोठा आधार त्या श्लोकांत कर्मयोगाचें गौणत्व किंवा कर्मसंन्यासाचें श्रेष्ठत्व सांगितलेलें नसून कर्म केलें असतां त्यापासून प्राप्त होणारें जे बंधनरूप फल तें कर्मयोग्याला शुद्धबुद्धीनें टाळतां येतें, कारण बुद्धियोगापुढें केवळ बाह्येंद्रियांनीं आचरिलेल्या कर्माची मातब्बरी नाहीं हेंच या श्लोकांत सांगितलें असून तो श्लोक कर्मयोगाला पुष्टिकारक असाच आहे. यानंतर याच अध्यायांत 'त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन ।' 'श्रुतिविप्रतिपन्ना ते यदा स्थास्यति

निश्चला' इत्यादि श्लोकांत कर्मयोग्याला जें कर्म करण्याला आपण सांगतों तें श्रुति-प्रतिपादित सकाम कर्म नव्हे असा खुलासा श्रीकृष्णांनीं केला आहे. आणि हा खुलासा केल्यावरच स्थितप्रज्ञाचीं लक्षणे सांगण्यात आलीं आहेत. स्थितप्रज्ञ हा साधकावस्थेत नसून सिद्धावस्थेस पोंचलेला असतो. अशा स्थितप्रज्ञाच्या वर्णनांत तरी कर्मसंन्यासाचें महत्त्व वर्णिलें असेल असें म्हणावें तर तें त्यांतहि आढळत नसून 'विहाय कामान्यः सर्वान् पुमांश्चरति निस्पृहः ।'' 'रागद्वेषवियुक्तैस्तु विषयानिंद्रियैश्चरन् । आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति ।' इत्यादि श्लोकात कर्मसंन्यास वर्णिला नसून 'इंद्रियनिग्रह करून निष्काम व निरहंकार अशा बुद्धीनें कोणतेंहि कर्म करणाऱ्यास शाश्वत शान्ति मिळते' असे म्हटले आहे.

या सर्व वर्णनांत कर्माच्या सामर्थ्यापेक्षा बुद्धीचे सामर्थ्य श्रेष्ठ होय, असें भगवंतांनीं सांगितल्यावरून तेवढाच काडीचा आधार घेऊन, कर्म जर बुद्धीपेक्षां गौण आहे, तर या युद्धरूपी घोर कर्माची आवश्यकता तरी काय असा अर्जुनाने प्रश्न केला व त्यावरून श्रीकृष्णांना तिसऱ्या अध्यायांत कर्माची महती सांगण्यास व कर्मयोगाचें खरें स्वरूप व त्याचीं साधने सांगण्यास प्रारंभ केला आहे. अर्जुनाची प्रारंभींची शंका अशी होती कीं, कर्म केलें कीं, त्याचें बंधन आपल्या मानगुटीवर कायमचें बसणार, त्यांतून सुटका होणारच नाहीं, याकरितां कर्म न करणे हाच सुटकेचा उपाय होय! ही समजूत चुकीची आहे व कर्माच्या अंगीं एवढें सामर्थ्य नसून बुद्धि ही त्याच्यापेक्षां श्रेष्ठ असल्यानें कर्माचें फल प्राप्त होणें किंवा न होणें त्या त्या कर्माला प्रेरक होणाऱ्या बुद्धीवर अवलंबून आहे. ती बुद्धि योगयुक्त असल्यास कर्म बंधनकारक होऊं शकत नाहीं अशा दृष्टीने कर्म क्षुद्र ठरविलें आहे. पण बंधनकारकत्वाच्या दृष्टीनें बाह्य कर्माला बुद्धीपेक्षां गौणत्व दिलें तरी व्यवहाराच्या दृष्टीनें या कर्माचें महत्त्व आत्यंतिक आहे. म्हणून जगातील व्यवहार योग्य रीतीनें चालण्यासाठीं ज्याने त्याने आपले कर्म केलेंच पाहिजे,तें टाकून चालणार नाहीं व तें टाकल्यास जगाची घडी बिघडेल, असे सांगून श्रीकृष्णाने निरनिराळ्या दृष्टींनें कर्माचें महत्त्व वर्णिले आहे. अर्थातच कर्मयोग्याच्या हातून होणारें कर्म हे त्याच्या स्वतःच्या उच्च भूमिकेवरून क्षुद्र वाटत असलें तरी लोकसंग्रहादि कार्याच्या दृष्टीने त्याचा सर्वस्वी त्याग करणें हें समाजास श्रेयस्कर ठरत नाहीं. यास्तव **कर्म करूनहि अकर्ता होणें** हाच खरा श्रेष्ठ मार्ग होय असें प्रतिपादन अर्जुनाच्या प्रश्नावरून तिसऱ्या अध्यायांत करण्यांत आलें आहे.

लोकसंग्रहादिक जगत्कल्याणकारक उद्दिष्ट साधण्यासाठीं कर्म केलेंच पाहिजे हें व्यावहारिक दाखल्यांनीं श्रीकृष्णानें अर्जुनास पटवून दिलें. पण कर्म करून अकर्ता होणें हा जो कर्मयोगांतला दुसरा भाग तो कसा साधावयाचा हा विचार तात्त्विक व सहजासहजीं लक्षांत न येण्याजोगा असल्यामुळें त्याचें सविस्तर वर्णन करण्याचें मनांत योजून श्रीकृष्णानें त्या विषयाचा उपक्रम 'मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्याध्यात्मचेतसा। निराशीर्निर्ममो भूत्वा युद्ध्यस्व विगतज्वरः' (अ. ३, श्लोक ३०.) या श्लोकानें केला. कर्म करून अकर्ता होण्याला साधनें कोणतीं लागतात त्याचें बीजरूपानें वर्णन या श्लोकांत असून त्याचाच पुढें विस्तार करण्यांत आला आहे. यांत ईश्वरार्पणबुद्धि, आत्मज्ञान, अनासक्ति व निरहंकारत्व हीं साधनें कर्मयोग्याला आवश्यक सांगितलीं आहेत. चौथ्या अध्यायांतील 'योगसंन्यस्तकर्माणं ज्ञानसंछिन्नसंशयम् । आत्मवंतं न कर्माणि निबध्नंति धनंजय ॥' या श्लोकांतहि हींच साधनें निराळ्या शब्दांनीं सांगितलेलीं आहेत. 'मयि सर्वाणि कर्माणि' ह्या तिसऱ्या अध्यायाच्या ३०व्या श्लोकापासून तो १८ व्या अध्यायांतील 'चेतसा सर्व कर्माणि मयिसंन्यस्य मत्परः । बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भवन् ॥' या ५७ व्या श्लोकापर्यंत हाच कर्मयोग पुनःपुनः थोड्या फार शब्दभेदानें पण अर्थतः एकाच स्वरूपानें वर्णिलेला आहे. आणि त्या सर्व वर्णनांतील साम्यावरून आणि इतक्या अनेक ठिकाणीं त्याचीच पुनरुक्ति करण्यात आली आहे तीवरून श्रीकृष्णाला कर्मयोगाचा हाच उपाय अर्जुनाच्या मनावर मुख्यत्वेंकरून ठसवावयाचा होता हें स्पष्ट सिद्ध होतें.

## कर्मयोगानें आत्मज्ञानप्राप्ति

" तुम्ही आपल्या कर्माचा पडदा जर स्वच्छ कांचेसारखा कराल तर त्यांतून परमेश्वर दिसेल."
—टि. मू. सं., पृष्ठ ५२.

कर्माचें आचरण कोणत्या युक्तीनें केलें असतां त्याचें बंधकत्व नाहींसें होतें एवढंच अर्जुनास पटवून दिलें असतें तरी तेवढ्यानें देखील अर्जुनाचा मोह दूर होऊन त्यास आसक्तिरहित कर्माचरणास प्रवृत्त करतां आलें असतें. पण कर्मरूपी विंचू निर्विष कसा करतां येतो एवढेंच नुसतें श्रीकृष्णास सांगावयाचें नसून कर्मयोगांत मोक्षप्राप्ति करून देण्याचें सामर्थ्यहि आहे आणि म्हणूनच तो मार्ग संन्यासमार्गापेक्षां श्रेष्ठ होय असें त्यास दाखवावयाचें होतें. आणि अशा रीतीनें

कर्माचें साक्षात् मोक्षप्रदत्व गीतेंत सिद्ध केलें नसतें तर 'संन्यासः कर्मयोगश्च निःश्रेयसकरावुभौ । तयोस्तु कर्मसंन्यासात् कर्मयोगो विशिष्यते॥' या वचनाची पूर्तता न होऊन गीतेंत तो मोठा दोष राहिला असता; पण तशी शंका घेण्यासहि भगवानांनीं गीतेंत जागा ठेवलेली नाहीं.

संन्यासमार्गीयांच्या मतानें कर्माचा उपयोग फक्त चित्तशुद्धीपुरताच आहे. कर्मयोगानें भक्ति अगर ज्ञान यांचा उदय अंतःकरणांत होतो असें ते मानीत नाहींत. म्हणून ज्या ज्या ठिकाणीं कर्मानें सिद्धि प्राप्त होते, कर्मानें पुरुष ब्रह्म-पदाला पोंचतो, कर्मानें मोक्ष मिळतो, अशा अर्थाचीं वचनें गीतेंत आलीं आहेत त्या त्या ठिकाणीं संन्यासमार्गीय टीकाकार 'चित्तशुद्धिद्वारा' असें एक आपल्या पदरचेंच शेंपूट त्यास जोडून देतात ! पण हा प्रकार अगदीं अनधिकृत होय. भगवानांना सांख्ययोगाप्रमाणे कर्मयोग साक्षात् मोक्षप्रद वाटला नसता तर कर्म-मार्ग हा केवळ चित्तशुद्धीपुरता आहे त्यानंतर संन्यास ग्रहण करून ज्ञान प्राप्ती झाल्यानंतर मोक्ष मिळतो असें गीतेंत सांगितले असतें गीतेतील स्पष्ट वाक्यरचना झुगारून देऊन हे सांप्रदायिक टीकाकार आपल्या पक्षाच्या समर्थनार्थ भलतेच शब्द मध्येंच घुसडून देतात. 'सांख्ययोगौ पृथग्बालाः प्रवदन्ति न पण्डिताः । एकं सांख्यं च योग च यः पश्यति स पश्यति ॥ सन्यासः कर्मयोगश्च निश्रेयसकरावुभौ॥'' इत्यादि श्लोकांत सांख्ययोग व कर्मयोग हे सारख्या तोलाचे आणि मोक्षरूपी फल सारखेंच देणारे असे म्हटलें आहे. मग यांत कर्मयोगालाच तेवढी चित्त-शुद्धीच्या टप्प्यापुढे जाण्याला बंदी कां असावी ? दोन्ही मार्ग जर सारखेच म्हटले तर आपण जी अट एकाला लागूं करूं तीच दुसऱ्याला लागूं होईल, नाही तर कोणालाच ती लागू पडणार नाही. एकाला मात्र ती लागू व दुसऱ्याला ती लागू नाही असला पक्षपात भगवंतांनी केलेला नाही. टीकाकारांनीं तो आपणच केला हे त्यांचे धाष्टर्यच होय.

'कर्मणव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः ।' या वाक्यांत तर चकारपूर्वक स्पष्ट शब्दांनीं कर्मानेंच जनकादिकांना सिद्धि मिळाली असें म्हटले आहे. चित्त शुद्धीपुरतें कर्म आणि मग मात्र मोक्ष देण्याला संन्यास आवश्यक असें सांगण्याचा जर श्रीकृष्णांचा अभिप्राय असता तर त्यांस तशी वाक्यरचना करतां आली नसती असें नाहीं. आणि मग कर्मानेंच जनकादिकांना सिद्धि मिळाली असें त्यांनीं ठांसून सांगितलेंहि नसतें. पण ज्याअर्थी तसा स्पष्ट निर्देश केला आहे, त्याअर्थी

कर्मयोगाला मोक्षप्रद होण्याला संन्यास-ग्रहणादि दुसऱ्या कशाच्याहि साहाय्याची अपेक्षा नसते हे श्रीकृष्णांचें मत उघड आहे.

यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम्।
स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः॥ १८–४६
असक्तो ह्याचरन्कर्म परमाप्नोति पुरुषः। ३–१९

इत्यादि वचनांतूनहि कर्मयोगानेच आत्मज्ञान होऊन मोक्ष मिळतो असे सांगितलें आहे व त्या ठिकाणीं 'चित्तशुद्धिद्वारा' असले पालुपद जोडण्याचे सदर्भावरून तरी कारण दिसत नाही

चेतसा सर्वकर्माणि मयि संन्यस्य मत्परः।
बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव॥ १८–५७
मच्चित्तः सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि। १८–५८

या श्लोकात कर्मयोगाचे आचरण ईश्वरार्पणबुद्धीने केल्यास त्यापासून प्राप्त होणारा ईश्वरी प्रसाद व त्यापासून होणारी मोक्षप्राप्ति या सर्व पायऱ्या क्रमाक्रमाने सांगितल्या असून त्यात कर्माचा त्याग आणि संन्यासाचा स्वीकार करून सांगितला नाही!

पण यापेक्षाहि अधिक स्पष्ट आधार पाहिजे असेल तर तो—

ध्यानेनात्मनि पश्यंति केचिदात्मानमात्मना।
अन्ये सांख्येन योगेन कर्मयोगेण चापरे॥
अन्ये त्वेवमजानन्तः श्रुत्वान्येभ्य उपासते
तेपिचातितरंत्येव मृत्युंश्रुति-परायणाः॥ १३–२४ व २५

यात ध्यानमार्ग, सांख्यमार्ग, कर्मयोगमार्ग आणि भक्तिमार्ग असे आत्मज्ञानाचे चार वेगवेगळे रस्ते सांगून त्यातील प्रत्येक मार्गाचे पर्यवसान आत्मज्ञानात व आत्मानुभवात होते असें निर्दिष्ट केले आहे. यात जर कर्मयोगाला प्रत्यक्ष मोक्षप्राप्ति होत नसती व जर त्याला सांख्यमार्गाचा स्वीकार करणे अवश्यक असतें तर असे तुल्यबल म्हणून चार वेगवेगळे मार्ग एकामागून एक सांगण्यात आलेच नसते. अर्थातच हे चारहि मार्ग पृथक् पृथक् आहेत आणि त्यांतला प्रत्येक मार्ग स्वसामर्थ्यानें मोक्षप्राप्ति करून देण्यास समर्थ असून त्या कामात त्याला दुसऱ्या कोणत्या मार्गाचे पाय धरावे लागत नाहीत असे या श्लोकातील शब्द-योजनेवरून व वाक्यरचनेवरून निःसंदिग्धपणे ठरते. संन्यासमार्गीय सांप्रदायिक

-टीकाकारांनीं येथें हातच टेकले असून अखेरीस 'येन केन प्रकारेण' कर्मयोगावर-चा आपला राग व्यक्त करण्याकरितां या श्लोकाच्या स्पष्टीकरणांत ध्यानयोग हा उत्तम मार्ग, सांख्ययोग हा मध्यम मार्ग आणि कर्मयोग हा अधम मार्ग होय अशी आपल्या पदरचीच वर्गवारी त्यांनीं येथें घुसडून दिली आहे ! पण अधम म्हणा किंवा अधमाधम म्हणा, कर्मयोग हा स्वतंत्रपणें मोक्षप्रद आहे ही कबुली कांहीं तेवढ्या 'अधम'शब्दानें नाहींशी होऊं शकत नाहीं.

यावरून गीतेंत कर्मयोग ही निष्ठा केवळ चित्तशुद्धीपुरती म्हणून सांगितली नसून ती मोक्षदायक निष्ठा म्हणूनच वर्णिली आहे. आणि या निष्ठेंत जसा लोकसंग्रह आणि मोक्षसिद्धि असा दुहेरी लाभ घडतो तसा तो सांख्यनिष्ठेंत घडत नाहीं, म्हणूनच 'तयोस्तु कर्मसंन्यासात् कर्मयोगो विशिष्यते ।' असें गीतेंत निःसंदेहत्वानें सिद्धान्तमत म्हणून सांगितलें आहे. आणि इतर ठिकाणच्या संदर्भावरून तो केवळ अर्थवाद आहे असें म्हणण्याला तेथें जागाच नाहीं.

अशा रीतीनें कर्मयोग हा साक्षात् मोक्षप्रद आहे असें गीताग्रंथच प्रत्यक्ष कंठरवानें सांगत असल्यामुळें गीतेंतील उपदेश अभ्युदय व निःश्रेयस् या दोहोंचीहि योग्य रीतीनें सांगड घालून देणारा आहे आणि म्हणूनच केवळ वैयक्तिक कल्याण साधून देणाऱ्या संन्यासमार्गापेक्षां तो श्रेष्ठ आहे हें भगवंतांचें वचन केवळ अर्थवादा-त्मक नव्हे हें उघड सिद्ध होतें. लोकमान्यांनीं गीतारहस्यांत हाच सिद्धान्त अनेक बाह्य प्रमाणें देऊन व तर्कशुद्ध युक्तिवाद लढवून सिद्ध केला आहे. भिडेशास्त्री यांनीं रहस्यदीपिकेंत अवांतर ग्रंथांतील प्रमाणांचा आधार न घेतां केवळ गीताग्रंथांतील सातशें श्लोकांतूनच तो अर्थ कसा निघतो आणि कर्मयोगाचें वैशिष्ट्य गीतेंतील सर्व अध्यायांत कसें अनुस्यूत आहे तें मार्मिकपणें दाखविलें आहे. या दृष्टीनें रहस्यदीपिकेंतील **'गीताध्यायसंगति'** आणि **'भगवद्गीतेचा उपसंहार'** हीं दोन अखेरचीं प्रकरणें अवश्य अभ्यसनीय अशीं आहेत. गीतेंतील विचारसरणी विस्कळित किंवा ढिली नसून ती तर्कशास्त्राला साजेशीच कशी आहे हें 'गीताध्यायसंगति' या प्रकरणांत शास्त्रीबुवांनीं दाखविलें असून शेवटच्या उपसंहारात्मक प्रकरणांत गीतेंतील विचारांचे दुवे एकांत एक कसे बिनतोड बसविले गेले आहेत हें सिंहावलोकनपद्धतीनें दाखविलें आहे. त्यांतल्या त्यांत कुलधर्म व वर्णधर्म, वर्णाश्रमधर्माचा विचार, वर्णधर्म हीच ईश्वराची उपासना आणि समाज हेंच ईश्वराचें प्रतीक इत्यादि परिच्छेदांतील विवेचन

फारच मार्मिक व बोधप्रद असें झालें आहे. आणि "व्यक्तिधर्मापेक्षां राष्ट्रधर्म श्रेष्ठ आहे हें तत्त्व बुद्धीस पूर्णपणें पटल्यामुळेंच अर्जुन राष्ट्रधर्माचें आचरण करण्यास सिद्ध झाला; यावरून पूर्ण बुद्धियोग व कर्तव्यतत्परता यांची जोडी म्हणजेच कृष्णार्जुनांची जोडी होय; ही जोडी ज्या राष्ट्रामध्यें वास करिते तें राष्ट्र स्वातंत्र्य, शुद्धनीति, यशस्विता व वैभव यांनीं सुसंपन्न होतें" असा संजयाच्या फलश्रुतीस अनुसरून जो व्यापक निष्कर्ष भिडेशास्त्री यांनीं आपल्या उपसंहारांत शेवटीं दिला आहे तो तर सर्व गीताभक्तांनीं आपल्या हृदयांत सतत कोरून ठेवण्यासारखा आहे. सारांश, श्रीमद्भगवद्गीतेचें, गीतारहस्याचें किंवा रहस्यदीपिकेचें कितीहि गुणवर्णन केलें तरी तें अपुरेंच होणार आहे. पण हें गुणवर्णन कोठें तरी संपविलेंच पाहिजे म्हणून येथेंच लेखणीला विराम पावण्यास आज्ञा देत आहें. पण कविकुलगुरु कालिदासानें म्हटल्याप्रमाणें हा विराम 'श्रमेण तदशक्त्या वा न गुणानामियत्तया' असाच आहे हें वाचकांनीं विसरूं नये अशी त्यांस प्रार्थना आहे.

श्रीमार्तंडभुवन, पुणें.
मिति आश्विन कृष्ण ११
शके १८५०.

ज. स. करंदीकर
अध्यक्ष, गीता-चर्चा-मंडळ

# गीतार्थ-रहस्यदीपिका

## उपोद्घात

**कामात्मता न प्रशस्ता न चैवेहास्त्यकामता ॥**
**काम्यो हि वेदाधिगमः कर्मयोगश्च वैदिकः ॥१॥ ***

**—मनु.**

परमेश्वरानें हें विश्व उत्पन्न करून त्याबरोबरच त्याच्या धारणपोषणाकरितां धर्मही उत्पन्न केला आहे.

**प्राणिनां साक्षादभ्युदयनिःश्रेयसहेतुर्यः स धर्मः ॥**

म्हणजे प्राणिमात्रांना साक्षात् अभ्युदय (उत्कर्ष) व निःश्रेयस (मोक्ष) प्राप्त होण्यास जो साधन होतो तोच धर्म होय. हें धर्माचें लक्षण सर्वमान्य झालेलें आहे. भक्तिज्ञानयुक्त व शुद्धबुद्धिनियत अशा कर्मयोगानें सहज उत्पन्न होणारें चिरकालीन वैभव, स्थिर यशस्विता, स्वाधीनसत्ता व शुद्धनीति हें अभ्युदयाचें स्पष्ट स्वरूप भगवान् व्यासांनीं गीतेच्या शेवटीं संजयाच्या मुखानें वर्णिलें आहे. त्याचप्रमाणें मोक्ष म्हणजे सच्चिदानंदस्वरूप अद्वैत ब्रह्मसाक्षात्कार (ब्राह्मी स्थिति) असें गीतेंत भगवंतांनीं अनेक ठिकाणीं सांगितलें आहे.

एकाच धर्माचीं अभ्युदय व निःश्रेयस हीं दोन फलें निर्दिष्ट आहेत. अर्थात् हीं दोन्ही फलें परस्परविरुद्ध नसून एकाच ब्राह्मी स्थितीचीं

---

* अर्थः—येथें उपभोगपरायणता चांगली नव्हे आणि इच्छेचा अभाव म्हणजे सर्व बाबतींत उदासीनताही चांगली नव्हे. कारण मनुष्यांनीं वेद व सर्व विद्या संपादन करण्याची व वेदसंमत अशा कर्मयोगाची इच्छा धरणें अवश्य आहे.

व्यावहारिक व तात्त्विक स्वरूपें होत. तथापि, "अभ्युदय व निःश्रेयस हीं दोन फलें परस्परांशीं अत्यंत विरोधी आहेत व तीं प्राप्त करून देणारे एकाच धर्माचे दोन प्रकारही परस्पर-विरुद्ध आहेत, म्हणजे ज्या मार्गानें अभ्युदय प्राप्त होणार, त्या मार्गानें निःश्रेयस केव्हांही प्राप्त होणें शक्य नाहीं, किंवा निःश्रेयसप्राप्तीचा मार्ग अभ्युदयप्राप्तीस केव्हांही उपयोगी पडणार नाहीं" असें कित्येक वेदांती प्रतिपादन करितात. हे मतवादी अभ्युदय म्हणजे विषयोपभोगाची (विलासाची) परमावधि, असा अर्थ करितात. कल्पवृक्ष, कामधेनु, अप्सरा, नंदनवन इत्यादि विलाससाधनांनीं खचून भरलेला स्वर्गलोक हीच अभ्युदयाची पराकाष्ठा होय असें गृहीत धरून, त्यांत कामात्मता म्हणजे उपभोगतृष्णा पूर्णपणें जागृत असल्यामुळें, तो अभ्युदय निःश्रेयसास अत्यंत विघातक आहे, अर्थात् त्याचा मार्ग म्हणजे प्रवृत्तिमार्ग हा मोक्षमार्गाला म्हणजे निवृत्तिमार्गाला विरुद्ध असला पाहिजे असें ते सिद्ध करितात. त्यांच्या मतें व्यवहार व परमार्थ हेही अंधकार व प्रकाश यांच्यासारखे एकमेकांच्या अगदीं उलट आहेत असें ठरतें.

परंतु थोडासा सूक्ष्म विचार केला असतां हें मत सयुक्तिक ठरणार नाहीं. कारण अभ्युदय व निःश्रेयस हे जर इतके अत्यंत विरोधी असतील तर त्यांचे परस्पर-विरोधी मार्गही एकाच धर्माचे दोन प्रकार आहेत असें म्हणतां येणार नाहीं. 'अभ्युदय व निःश्रेयस ह्या दोहोंस-ही साधनीभूत होईल तो धर्म, हें धर्माचें लक्षण सर्वमान्य असल्या-मुळें, एकच कारण दोन परस्परविरुद्ध कार्यांचें उत्पादक केव्हांही होऊं शकत नाहीं, हें उघड आहे. अभ्युदय व निःश्रेयस यांचीं साधनें, म्हणजे प्रवृत्तिमार्ग व निवृत्तिमार्ग, हीं एकाच धर्माचीं दोन अंगें आहेत, असें मानिल्यास वरील लक्षण धर्माचें नसून या दोन

मार्गाचें आहे असें म्हणावें लागेल. परंतु 'साक्षादभ्युदयनिःश्रेयसहेतुर्यः स धर्मः' हें मार्गाचें लक्षण नसून प्रत्यक्ष धर्माचेंच लक्षण आहे. ही गोष्ट सूत्रकारांप्रमाणेंच भगवान् भाष्यकारांसही मान्य आहे. ह्यावरून अभ्युदय व निःश्रेयस ह्या दोन फलांमध्यें विरोध मानितां येत नाहीं असें ठरतें.

ह्यावर अशी एक कोटि करण्यांत येते कीं, 'अभ्युदयफलदायक प्रवृत्तिमार्ग हा चित्तशुद्धीलाही उपयोगी पडत असल्यामुळें व चित्तशुद्धि ही ज्ञानप्राप्तीपूर्वी अवश्य असल्यामुळें, प्रवृत्तिमार्ग हा परंपरेनें मोक्षास साधनीभूत आहे व ह्याप्रमाणें धर्माच्या दोन विरुद्ध प्रकारांची संगती लागते'. परंतु हा कोटिक्रमही फारसा टिकण्यासारखा नाहीं. कारण अभ्युदय व चित्तशुद्धि अशीं प्रवृत्तिमार्गाचीं दोन फलें मानिल्यास त्यांपैकीं एक मुख्य व दुसरें अवांतर म्हणावें लागतें. तथापि अभ्युदय व निःश्रेयस यांत जर विरोध असेल तर तो अभ्युदय व चित्तशुद्धि यांतही कायम राहणारच. अर्थात् वरील कार्यकारणभावांतील दोष येथेंही जशाचा तसाच शिल्लक राहतो. कारण उपभोगात्मक अभ्युदयास साधन असणारा प्रवृत्तिमार्ग उपभोगवासनारहित चित्तशुद्धीस कसा उपयोगी पडणार ? सकाम-प्रवृत्तिमार्गानें अभ्युदय व निष्काम-प्रवृत्तिमार्गानें चित्तशुद्धीही होईल असें मानतां येणार नाहीं. कारण अभ्युदय व निःश्रेयस या फलांवरूनच धर्माचें लक्षण शास्त्रकारांनीं केलें असल्यामुळें अभ्युदयफलदायक मार्गासच प्रवृत्तिमार्ग म्हणणें प्राप्त आहे; अर्थात् चितशुद्धिकारक मार्गास प्रवृत्तिमार्ग म्हणतां येणार नाहीं. चित्तशुद्धिदायक मार्ग हा तिसराच एक मार्ग ठरल्यास, **'लोकेऽस्मिन् द्विविधा निष्ठा'** इत्यादि भगवदुक्तीस किंवा **'द्वाविमावथ पंथानौ'** इत्यादि व्यासोक्तीसच नव्हे तर **'साशनानशने अभि'** (अभि=उभे) या श्रुतिवचनास देखील विरोध

येईल. सारांश, एकाच धर्माच्या अभ्युदय व निःश्रेयस या दोन फलांमध्यें कोणत्याही रीतीनें विरोध मानितां येणें शक्य नाहीं. तसेंच हीं दोन फलें स्वतंत्र किंवा परस्परसंबंधहीन नाहींत, हेंही वरील विचारसरणीनेंच सिद्ध होण्यासारखें आहे. अभ्युदय व निःश्रेयस हीं एकाच धर्माचीं फलें असल्यामुळें त्यांचा परस्परांशीं अनुकूल संबंध आहे असें म्हणणें भाग आहे.

धर्माच्या या दोन फलांपैकीं अभ्युदय हें अवांतर फल असून निःश्रेयस हें मुख्य फल होय. कारण अभ्युदय हें दृश्यफल ह्या दृश्य विश्वाप्रमाणेंच विनाशी असून निःश्रेयस हें तात्त्विक फल ब्रह्माप्रमाणें अविनाशी असतें. निःश्रेयसार्थी पुरुषानें प्रवृत्ति-मार्गाचें अवलंबन केल्यास त्याला अभ्युदयपूर्वक मोक्षप्राप्ति होते. हा धर्म म्हणजेच गीताप्रतिपादित कर्मयोग होय. तोच मोक्षार्थी पुरुष जर निवृत्तिमार्गाचें अवलंबन करील तर त्याला अभ्युदयरहित मोक्ष प्राप्त होईल. हाच सांख्य किंवा संन्यासमार्ग होय. मोक्ष हें प्रधान फल दोन्ही मार्गांत एकच असल्यामुळें हे दोन्ही मार्ग परस्परविरुद्ध नाहींत. कर्मयोगमार्गांत ज्ञानोत्तरकालीं लोकसंग्रहार्थ कर्म अवश्य असतें; पण संन्यासमार्गांत ज्ञानोत्तरकालीं स्वरूपतः कर्मत्याग अवश्य असतो. हाच ह्या दोन मार्गांच्या बाह्य स्वरूपांतील भेद होय.

कर्म म्हणजे चलन किंवा हालचाल. मूलप्रकृति चैतन्यप्रकाशयुक्त झाल्यावर तिच्या चलनापासूनच विश्वाची उत्पत्ति झालेली असल्या-मुळें प्रकृतीसुद्धां सर्व विश्वाचा कर्म हा स्वभावच असतो. ह्यावरून सूक्ष्म प्रकृतीपासून पाषाणादि जड पदार्थांपर्यंत कोणतीही वस्तु कर्मा-वांचून क्षणभरही असणें शक्य नाहीं. ह्या सृष्टींतील सर्व स्थूल पदार्थ प्रकृतिजन्य पंचमहाभूतांपासून उत्पन्न झाले आहेत. त्याचप्रमाणें मानवी शरीरही पंचमहाभूतात्मकच आहे. सर्व सृष्टपदार्थांस संवेदना

आहेत असें आतां निर्विवाद सिद्ध झालेलें आहे. तथापि मानवी शरीरांत ह्या संवेदना विशेष उद्भूत स्वरूपांत असतात. ह्या संवेदना-प्रमाणेंच इच्छा, सदसद्विवेक इत्यादि शक्तीही इतर पदार्थांत किंवा प्राणिमात्रांत सामान्यतः दिसत असल्या, तथापि मानवी प्राण्यामध्यें त्याही उत्कट स्वरूपांत असून त्यांना स्मरणशक्तीची जोड मिळालेली असते. ह्या सर्व अंतःशक्तींच्या समुच्चयासच अंतःकरण असें नांव आहे.

अंतःकरणाच्या कार्यावरून त्याचे मुख्य दोन प्रकार होतात. संकल्प-विकल्पात्मक म्हणजे अनिश्चितस्वरूप अंतःकरणवृत्तीला मन असें म्हणतात व स्मृति व सदसद्विवेकशक्ति म्हणजे निश्चितस्वरूप अंतःकरणवृत्तीस बुद्धि अशी संज्ञा आहे. तात्पर्य, अंतःकरणाची अनिश्चित-वृत्ति हें मन व निश्चित-वृत्ति ही बुद्धि होय.

त्रिगुणात्मक प्रकृतीच्या सत्त्वांशापासून अंतःकरण व पांच ज्ञानेंद्रियें (श्रोत्र, त्वक्, जिव्हा, घ्राण, नेत्र), रजोंऽशापासून प्राण व पांच कर्मेंद्रियें (वाक्, पाणी, पाद, पायु, उपस्थ) आणि तमोंऽशापासून पंचमहाभूतें व स्थूल शरीर उत्पन्न झालें आहे, असें वेदान्तशास्त्रांत सांगितलें आहे.

बुद्धि, मन, इंद्रियें, प्राण व शरीर ह्या सर्वांस मिळून क्षेत्र अशी संज्ञा आहे. ह्या क्षेत्राचा प्रकाशक आत्मा आहे. बुद्धि ही मन व इंद्रियें यांची नियामक आहे. मन हें इंद्रियांचें प्रेरक आहे व इंद्रियें हीं देहाचीं प्रवर्तक आहेत. ही रचना रूपकात्मक शब्दांनीं सांगावयाची झाल्यास, आत्मा ही राष्ट्रसभा, बुद्धि हें कार्यकारी-मंत्रि-मंडळ, मन हा चिटणीस, इंद्रियें हीं कामगार व शरीर हें राष्ट्र असून ब्रह्मांड हें साम्राज्य होय. म्हणजे क्षेत्र हें सुव्यवस्थित स्वराज्य आहे असें म्हणतां येईल. ह्या क्षेत्रांतील आत्मा हा प्रकाशक किंवा सत्तादायक असला तरी प्रत्यक्ष कर्तृत्व बुद्धीकडेच आहे. त्यामुळें

तिच्या शुद्धाशुद्धतेवर किंवा बरेवाईटपणावरच सर्व कर्मांचा बरेवाईट-पणा अवलंबून असतो हें उघड आहे. आत्म्याचें पूर्ण ज्ञान बुद्धींत उदित होणें हीच तिची शुद्धता होय. अशा शुद्ध बुद्धींतच सदिच्छा, निश्चय, समाधान व समत्व, ह्या सद्गुणांचा पूर्ण विकास होतो, व हेंच कर्मयोगांतील कर्माकर्मनिर्णयाचें मूलतत्त्व किंवा कसोटी आहे. योगयुक्त बुद्धीनें घडणारीं कर्में हाच कर्मयोग किंवा शुद्ध नीति होय. हा कर्मयोग आत्मज्ञानद्वारा मोक्षदायक व आचरण-द्वारा लोकसंग्रहकारक असल्यामुळें साधक व सिद्ध ह्या दोन्ही अवस्थांमध्यें सारखाच अवश्य आहे असें गीताशास्त्रांत प्रतिपादन केलें आहे.

ह्या कर्मयोगमार्गांत इच्छेचा पूर्ण अभाव म्हणजे अकामता अभि-प्रेत नसून, सद्वासना किंवा उपासनामय हेतु अवश्य असतो. अशा शुद्ध हेतूनें आचरिलेलें कर्म हें उपासनारूपच होत असल्यामुळें, तें बंधक होत नाहीं. परंतु संन्यासमार्गांत इच्छेचा सर्वथैव त्याग सांगितला असल्यामुळें, शुद्ध किंवा अशुद्ध कोणत्याही इच्छेनें केलेलें कर्म स्वरूपत: बंधक अतएव त्याज्य होय, असें मानण्यांत येतें. ज्ञानप्राप्तीनंतर केवळ ध्यानयोगांतच निमग्न राहून, बुद्धिपूर्वक सर्व कर्मांचा त्याग करणें व प्रारब्धाधीन देहयात्रा प्रारब्ध कर्मानुसार चालू देणें हें संन्यासमार्गाचें स्वरूप होय.

ज्ञान व कर्म ह्यांचा परस्परांशीं अत्यंत विरोध असल्यामुळें ज्ञानोत्तरकालीं बुद्धिपूर्वक कर्म घडणेंच शक्य नाहीं असें संन्यासमार्गी-यांचें मत आहे; परंतु कर्मांचा विरोध ज्ञानाशीं नसून, ध्यानाशीं आहे असें पंचदशीकारांनीं [ पं. ध्या. दी. श्लो. ८७ ] स्पष्ट ठरविलें आहे. त्याचप्रमाणें ब्रह्मसूत्रांतही ज्ञानोत्तरकालीं कर्म संभवनीय असल्याचें सांगितलें आहे. [ ब्र. सू. अ. ४ पाद १ सूत्र ११ ] व उप-

निषदांत देखील कर्माच्या पूर्णतेस ब्रह्मज्ञानाची जोड अवश्य आहे असें सांगितलें आहे. [ बृ. उ. ३।८।१० ] गीताशास्त्रांत तर यज्ञ, दान, तप इत्यादि कर्मे केव्हांही त्याज्य नसून सर्वकाळ अवश्यकर्तव्य आहेत असें स्पष्ट मत दिलें आहे. तथापि 'ज्ञानादेव तु कैवल्यं' हें तत्त्व गीताशास्त्रानें अमान्य केलेलें नाहीं. जिज्ञासायुक्त श्रद्धा व अंतःकरणाचा सरळपणा, हे दोन गुण प्रथम कोणत्याही निष्ठेस अवश्य असतातच. कर्मयोग व कर्मसंन्यास या दोन निष्ठांचा क्रम पुढीलप्रमाणें ठरतो:—

### जिज्ञासायुक्त श्रद्धापूर्वक सरलता

| कर्मयोगनिष्ठा | कर्मसंन्यासनिष्ठा |
|---|---|
| १ यज्ञार्थ कर्म. | १ चित्तशुद्धीकरितां निष्काम-कर्माचरण. |
| २ बुद्धियोग. | २ चित्तशुद्धिपूर्वक परोक्षज्ञान. |
| ३ ज्ञानपरिपाकार्थ कर्मयोग. | ३ ज्ञानपरिपाकार्थ कर्मसंन्यास-पूर्वक ध्यानधारणा. |
| ४ अपरोक्ष साक्षात्कार. | ४ अपरोक्ष साक्षात्कार. |
| ५ सिद्धावस्थेंतील लोकसंग्रहार्थ कर्मयोग. | ५ सिद्धावस्थेंतील सर्वकर्मसंन्यास. |

### मोक्ष

ह्यावरून कर्मयोग व कर्मसंन्यास हे दोन्हीही मार्ग मोक्ष हें एकच फल देणारे आहेत; तथापि सुलभता, शीघ्रफलदायकत्व, लोकसंग्रह व अभ्युदय ह्या दृष्टीनें कर्मसंन्यासापेक्षां कर्मयोगच श्रेष्ठ आहे, असा गीताशास्त्राचा स्पष्ट सिद्धान्त आहे. कर्मयोगनिष्ठा ही भाष्यकारांनीं खंडित केलेल्या प्राचीन समुच्चयवादाचीच पुनरावृत्ति आहे, अशीही

कित्येकांची समजूत आहे. परंतु वरील क्रमांचा सूक्ष्म विचार केल्यास अशी शंका येण्याचें कारणच उरत नाहीं. 'ज्ञान व कर्म यांचा समुच्चय हेंच मोक्षाचें प्रधान व प्रत्यक्ष साधन होय, केवळ कर्मानेंच मोक्ष प्राप्त होणें शक्य नाहीं, तसाच केवळ ज्ञानानेंही मोक्ष मिळूं शकत नाहीं', असें समुच्चयवाद्यांचें मत आहे. परंतु कर्मयोगमार्गांत कर्म हें मोक्षास साधन असलेल्या ज्ञानाच्या परिपाकास उपयोगी पडणारें असल्यामुळें ह्या मार्गांत कर्मास स्वतंत्र मोक्षसाधनता येत नाहीं. त्यामुळें 'ज्ञानादेव तु कैवल्यं' ह्या सिद्धान्तास बाध येत नाहीं.

वैदिक धर्मतत्त्वांचें प्रतिपादन करणाऱ्या शास्त्रांस दर्शनें अशी संज्ञा आहे. हीं दर्शनें सहा आहेत. १ पूर्वमीमांसादर्शन; ( यज्ञादिकर्मप्रतिपादक शास्त्र ); २ सांख्यदर्शन ( प्रकृतिपुरुषरूप, जडचैतन्यात्मक, द्वैततत्त्वप्रतिपादक शास्त्र ); ३ न्यायदर्शन ( षोडशपदार्थतत्त्वप्रतिपादक शास्त्र ); ४ वैशेषिकदर्शन ( सप्तपदार्थतत्त्वप्रतिपादक शास्त्र ); ५ योग ( अनेकपुरुषतत्त्वप्रतिपादक शास्त्र ); ६ उत्तरमीमांसा किंवा वेदांतदर्शन ( अद्वैतब्रह्मप्रतिपादक शास्त्र ); ह्या सर्व शास्त्रांत विश्वाची उभारणी व संहारणी आणि जीवाची इतिकर्तव्यता ज्या त्या दर्शनकारांनीं आपापल्या सरणीनें प्रतिपादन केली आहे. ह्यांपैकीं वेदान्तदर्शनांत इतर सर्व दर्शनांतील तत्त्वांचा विचार करून अद्वैत सिद्धान्त सिद्ध केला आहे. आर्यधर्मास प्रमाणभूत वेदाचे मंत्र व ब्राह्मण असे दोन भाग आहेत. त्यांपैकीं ब्राह्मणान्तर्गत आरण्यकांत प्राय: ज्ञानकांडाचें प्रतिपादन असून बाकीच्या वेदभागांत, बहुधा कर्मकांडाचें वर्णन आहे. कर्मकांडांत स्वर्गादि इष्टफलप्राप्त्यर्थ यज्ञयागादि अनेक कर्में करावयास सांगितलीं आहेत. ज्ञानकांडांत मोक्षप्राप्त्यर्थ उपासनापूर्वक आत्मज्ञान संपादन करावयास सांगितलें आहे. ह्याप्रमाणें ह्या दोन मार्गांत परस्परविरोध

दिसतो. हा विरोध नष्ट करण्याकरितां कर्ममार्गांतील उपभोगफलेच्छा व ज्ञानमार्गांतलि स्वरूपत: कर्मत्याग हे दोन्ही परस्परविरोधी अंश टाकून आणि निष्काम कर्तव्यनिष्ठा व आत्मज्ञान ह्या दोन परस्परानुकूल अंशांचा स्वीकार करून प्रवृत्ति-निवृत्तिरूप संपूर्ण वेदान्त प्रतिपादन केलेल्या सनातन आर्यधर्माचें रहस्य असा एकच कर्मयोगमार्ग गीता-शास्त्रांत भगवंतांनीं उपदेशिला आहे. म्हणून भगवद्गीताशास्त्र हें कर्मतत्त्वप्रतिपादक सातवें कर्मयोगदर्शन होय, असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. वेदान्तदर्शनांत कर्मयोग व कर्मसंन्यास यांचा विकल्प मान्य केला आहे [ वे. सू. ३-४-८ ]. आणि गीतादर्शनांत कर्मसंन्यासापेक्षां कर्मयोगाचें श्रेष्ठत्व दाखवून कर्मयोगाची आवश्यकता प्रतिपादन केली आहे. हाच इतर सर्व दर्शनांहून गीतादर्शनाचा विशेष होय.

जिज्ञासु, कर्तव्यतत्पर व भक्तिमान् असा प्रत्येक मनुष्य ह्या गीताशास्त्राध्ययनास अधिकारी आहे [ गीता, अ. १८ श्लो. ६७ ]. कर्मयोग हा ह्या शास्त्राचा प्रतिपाद्य विषय आहे. मंत्र-ब्राह्मणरूप सर्व वेदांशीं ह्या शास्त्राचा प्रतिपाद्य-प्रतिपादक संबंध आहे. आणि स्वत:चें नि:श्रेयस व राष्ट्राला अभ्युदयकारक लोकसंग्रह हें ह्या शास्त्राचें प्रयोजन आहे [ गीता, अ. १८ श्लो. ७८ ]. ह्याप्रमाणें गीताशास्त्राचें अनुबंध चतुष्टय सिद्ध होतें.

सर्व शास्त्रार्थाचा उपदेश झाल्यानंतर, ह्या सर्व ज्ञानविज्ञानाचा विचार करून तुझ्या इच्छेस येईल त्याप्रमाणें आचरण कर. अशी भगवंतांनीं अर्जुनास सदर परवानगी दिली असतां, प्रथम कर्मसंन्यास करण्यास तयार झालेल्या अर्जुनानें मी आपल्या उपदेशाप्रमाणें प्राप्त कर्म करण्यास, म्हणजे कर्मयोगाचरणास सिद्ध आहें, असें उत्तर दिलें. यावरून गीताशास्त्राचा प्रतिपाद्य विषय कर्मयोग हाच आहे हें उघड सिद्ध आहे. सनातन आर्यधर्मांतील तत्त्वज्ञान, जगांतील

इतर कोणत्याही तत्त्वज्ञानापेक्षां श्रेष्ठ आहे. धर्म व व्यवहार यांची परस्परसंगति आर्यधर्मांत जशी सोपपत्तिक लावली आहे, तशी तीं इतर कोणत्याही धर्मांत नाहीं. तत्त्वज्ञानमूलक धर्म व धर्ममूलक व्यवहार या विषयावर भगवद्गीतेच्या तोडीचा सयुक्तिक व सुबोध असा ग्रंथ संस्कृत वाङ्मयांत दुसरा नाहीं. म्हणूनच पूर्वाचार्यांनीं प्रस्थानत्रयींत गीतेचा समावेश करून तिची योग्यता वेदाच्या बरोबरीची ठरविली आहे. उपनिषदें, ब्रह्मसूत्रें व भगवद्गीता यांस प्रस्थानत्रयी अशी संज्ञा आहे. ह्या तीन ग्रंथांमध्यें देखील वेदान्तमूलक कर्माकर्मविचाराच्या म्हणजे नीतिशास्त्राच्या दृष्टीनें पहिल्या दोन ग्रंथांपेक्षां भगवद्गीतेचें महत्त्व अधिक आहे. ह्यावरून आर्यधर्माचें सांगोपांग रहस्य प्रतिपादन करणारा भगवद्गीता हाच अद्वितीय ग्रंथ आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. म्हणून प्रचलित शिक्षणांत धर्मशिक्षण या नात्यानें ह्या ग्रंथाचें पद्धतशीर अध्यापन सुरू ठेवणें अत्यंत अवश्य आहे.

तत्त्वज्ञान हें निवृत्तिपर म्हणजे संन्यासपरच आहे असें भाष्यकारांपासून सर्व टीकाकारांचें धोरण असल्यामुळें वेदान्ताचा व्यवहारनीतीशीं कांहीं संबंध नाहीं अशी सर्वसाधारण समजूत होऊन राहिली होती. संस्कृत व मराठी भाषेंतील वेदान्तपर अर्वाचीन ग्रंथही प्रायः ह्याच धोरणाचे आहेत. ह्यामुळें वेदान्त हा आर्यधर्माचा पाया आहे, हें तत्त्व सर्वमान्य असलें, तरी व्यवहाराविषयीं औदासीन्य उत्पन्न करणारा संन्यासपर वेदान्त विद्यार्थिदशेंतील होतकरू तरुणांना शिकविणें श्रेयस्कर होणार नाहीं असेंच बहुतेक विचारी लोकांस वाटत होतें. परंतु भगवद्गीतेच्या बाबतींत तरी हे आक्षेप निर्मूलक आहेत. इतकेंच नव्हे तर भगवद्गीता हा नैतिक व्यवहारास वेदान्ताची आवश्यकता दाखविणारा आणि व्यक्तीच्या व राष्ट्राच्या अभ्युदयास अवश्य असलेल्या धैर्य, उत्साह, स्वार्थत्याग, कर्तव्य-

निष्ठा इत्यादि सर्व बौद्धिक सद्गुणांचा विकास करणारा ग्रंथ आहे, असें विद्वद्वर्य **लोकमान्य बाळ गंगाधर टिळक** यांनीं आपल्या **गीतारहस्य** नामक सुप्रसिद्ध ग्रंथांत सप्रमाण सिद्ध केलें आहे. ह्यामुळें वेदान्ताविषयींचा जुना गैरसमज बराच दूर झाला आहे. सनातन तत्त्वज्ञानासंबंधानें गेल्या दोन हजार वर्षांपासून प्रचलित असलेल्या मतांत **गीतारहस्यकारांनीं** ही उत्क्रान्ति घडवून आणून कर्तव्यपराङ्मुख झालेल्या आमच्या राष्ट्रांत पुन्हा कर्तव्यजागृति उत्पन्न केली आहे. हें राष्ट्राच्या भावी उदयाचें प्रसादचिन्हच होय. ह्या अमूल्य कामगिरीबद्दल रहस्यकारांचें यथायोग्य अभिनंदन करतां येणें अशक्य आहे. भगवद्गीतेवरील शांकरभाष्य व इतर सर्व प्राचीन टीका संस्कृत भाषेंत असून, संन्यासपर व बऱ्याच दुर्बोध आहेत. मराठी भाषेंतील ज्ञानेश्वरी, यथार्थदीपिका इत्यादि टीका फारच विस्तृत असूनही वाक्यार्थबोधक नाहींत. ह्याकरितां, शास्त्रीय वाक्यार्थपद्धतीनें कर्मयोगपर गीतेचें अध्ययन करण्यास सुलभ व सोईचें साधन व्हावें म्हणून आम्हीं भगवद्गीता ह्या ग्रंथावर " गीतार्थ–रहस्यदीपिका " या नांवाची मराठी टीका लिहिली आहे.

रहस्यकारांच्या गीतेवरील टीकेस अनुलक्षून आजपर्यंत अनेकांनीं अनेक आक्षेप काढिले आहेत. परंतु तसले आक्षेप गीतेच्या श्लोकार्थावरूनच निराधार ठरतात, असें दाखविण्याचा आम्हीं प्रयत्न केला आहे. त्यामुळें कित्येक स्थळीं आमचे अर्थ रहस्यकारांच्या अर्थाहून भिन्न झाले आहेत. आम्हीं गीतेचा वाक्यार्थ शक्य तितका गीतेंतीलच प्रमाणांनीं सिद्ध केला आहे. म्हणून ह्या टीकेवरून गीतेचें अध्ययन करणारांस इतर ग्रंथ पहात बसण्याची गरज लागणार नाहीं, अशी आमची समजूत आहे.

गीतेंतील महत्त्वाच्या प्रकरणांस 'अधिकरणें' हें नांव दिलें असून

त्यांची मांडणी साधारणत: न्यायपद्धतीस अनुसरून केली आहे. प्रत्येक अधिकरणांत प्रतिज्ञा अथवा विधान म्हणजे उपक्रम व शेवटीं निगमन म्हणजे प्रथमच्या विधानांचा सिद्धान्त स्पष्ट दाखविला आहे. विशेष दुर्बोधता येऊं नये व महत्त्वाच्या प्रतिपाद्य प्रकरणांकडे विशेष लक्ष पोंचावें म्हणून अवांतर प्रकरणांस अधिकरणांचें स्वरूप दिलेलें नाहीं. प्रत्येक अध्यायाचे उपक्रम व उपसंहार स्वतंत्र लिहिले असून प्रत्येक श्लोकाची मागील श्लोकाशीं संगति दाखविण्याकरितां अवतरण आणि श्लोकांतील तात्पर्य दाखविण्याकरितां अन्वयार्थ व नंतर विवरणही जोडिलें आहे. ह्याप्रमाणें वाचकांस गीतेंतील तत्त्वांचा सरळ व शास्त्रीयपद्धतीस अनुसरून बोध होईल असा प्रयत्न केला आहे.

गीतेचा अर्थ लावितांना भाष्यापासून तों रहस्यापर्यंत सर्व टीकांचा उपयोग केला आहे. तथापि, अमुकच एका ग्रंथाप्रमाणें अर्थाचें धोरण ठेविलेलें नाहीं. कारण गीतार्थाचें विवेचन करतांना जी एक अर्थ-सरणी आम्हांस दिसून आली ती अगदीं नवीन पण सरळ व सुबोध असल्यानें इतर कोणचेंही विवक्षित धोरण अगर सांप्रदाय आम्हांस अनुसरावा लागला नाहीं, हा त्या भगवान् गोपालकृष्णाचा प्रसादच होय, असें म्हणण्यास हरकत नाहीं. आम्हांस आढळून आलेल्या अर्थसरणीवरून गीतेचें तात्पर्य कोणतें, सर्व अध्यायांची संगति कशी बसते व एकंदर गीतेचा विस्तार कां व कसा होत गेला वगैरे प्रश्न फारच मार्मिक रीतीनें सहज सोडवितां येतात. अलीकडे तर गीतेवर लहानमोठ्या पुष्कळच टीका प्रसिद्ध झाल्या आहेत; तथापि आम्हीं वर सांगितलेल्या अर्थसरणीमुळें या ग्रंथांत अभिनवता भरली आहे असेंच वाचकांच्या प्रत्ययास येईल.

ही अर्थपद्धति कोणती या प्रश्नाचा विस्तार आतांच करणें

अप्रस्तुत होय. कारण गीतेचा अर्थ वाचतांना तिचा वाचकांना परिचय होईलच.

गीताशास्त्र संवादात्मक असल्यामुळें त्यांतलि विवेचनपद्धति ढिली आहे असें कित्येकजण म्हणतात, पण तें बरोबर नाहीं. संवाद-पद्धतीनें गीतेस मनोरंजकता आली आहे हें खरें. तथापि गीतेंतलि ७०० श्लोक सांखळींतील दुव्यांप्रमाणें अगदीं सुसंबद्ध आहेत. रहस्यदीपिकेवरून गीतेचा अभ्यास करणाऱ्यास असें आढळून येईल कीं, गीतेंतलि कोणताही श्लोक अप्रासंगिक किंवा अनावश्यक विस्ताराचा नाहीं. कित्येक आधुनिक सुशिक्षित लोक म्हणतात त्याप्रमाणें गीतेंत विसंगतपणा किंवा एकसूत्रीपणाचा अभाव त्यांना मुळींच आढळून येणार नाहीं. आम्ही रहस्यदीपिकेमध्यें इतर टीकाकारांच्या शंका घेऊन त्यांचें समाधान करण्याची उठाठेव केली नाहीं. विवेचनामध्यें उपस्थित होणाऱ्या प्रश्नांचीं उत्तरें देऊन एकंदर अर्थ सुबोध व सुसंघटित करण्याचा प्रयत्न केला आहे. आमच्या टीकेंत गीतेच्या कित्येक श्लोकांचे वाक्यार्थ गीतारहस्यांतील श्लोकार्थापेक्षां पुष्कळच निराळे आहेत. हीं सर्व स्थळें रहस्यकारांना समक्ष दाखवून त्याविषयीं त्यांचेबरोबर ८–१० दिवस चर्चाही केली होती आणि आमचे सर्व अर्थ रहस्यकारांनीं मान्य करून त्याबद्दल आपला संतोषही व्यक्त केला होता. शेवटीं ज्याच्या सत्तेनें आम्हांस वाटत असलेलें गीतेचें तात्पर्य सांगण्याचें धैर्य उत्पन्न झालें त्या परमेश्वरास प्रणाम करून हा उपोद्घात पुरा करितों.

---

# गीतार्थ-रहस्यदीपिका

नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम्
देवीं सरस्वतीं व्यासं ततो जयमुदीरयेत् १
अरुणकिरणजालै रंजिताशावकाशा
विधृतजपवटीका पुस्तकाऽभीतिहस्ता
इतरकरवराढ्या फुल्लकल्हारसंस्था
निवसतु हृदि बाला नित्यकल्याणशीला १

## प्रथमोऽध्यायः

धृतराष्ट्र उवाच—

धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः
मामकाः पांडवाश्चैव किमकुर्वत संजय १

संजय, धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे युयुत्सवः समवेताः
मामकाः पांडवाः एव च किम् अकुर्वत ?

राजा धृतराष्ट्र (संजयास) म्हणाला, हे संजया, धर्मक्षेत्र (धर्माचरणास योग्य ठिकाण) म्हणून प्रसिद्ध असलेल्या कुरुक्षेत्र नांवाच्या मैदानावर युद्धाच्या इच्छेनें जमलेले माझे पुत्र (कौरव) आणि (पांडूचे पुत्र) पांडव काय करिते झाले ?

[ पांडवांचा पक्ष न्याय्य आहे, असें लोक म्हणतात, त्याप्रमाणेंच कौरवांचाही युद्धाचा हेतु न्याय्य असल्यामुळें, आमचेंही धर्मयुद्धच आहे असें भासविण्याकरितां धर्मक्षेत्र हें विशेषण धृतराष्ट्रानें मुद्दाम योजिलें आहे. कोणत्याही ग्रंथाच्या पहिल्या श्लोकांत ग्रंथांतील तात्पर्य गोविलें आहे, असें दाखविण्याचा प्राचीन टीकाकारांचा बराच सांप्रदाय आहे; तदनुसार याही श्लोकांत गीते-

या अभिप्राय रूपकानें दाखविण्याचा कांहीं टीकाकारांनीं प्रयत्न केला आहे. धर्मक्षेत्र, म्हणजे धर्माला वाढविणारें, कुरुक्षेत्र म्हणजे कर्माचें स्थान अशा शरीरामध्यें परस्परांचा पराभव करण्याच्या इच्छेनें एकत्र झालेले मामक म्हणजे अहंकार व तन्मूलक काम, क्रोध वगैरे विकार, आणि पांडव म्हणजे, पांडु=शुद्ध सात्त्विक विवेक, तन्मूलक सुविचार यांनीं पुढें काय केलें म्हणजे विचार व विकार यांपैकीं कोणाचा विजय झाला असें धृतराष्ट्र म्हणजे जीवात्मा, संजयास म्हणजे बुद्धीस विचारीत आहे.

मनुष्याच्या अंतःकरणांत विकार व विचार यांचें नेहमींच युद्ध सुरू असतें. त्यांत विकारांचा पूर्ण पराभव होऊन विचारांचा म्हणजे शुद्ध सात्त्विक विवेकाचा पूर्ण विजय होतो, हाच गीतेचा अभिप्राय आहे. हा अर्थ मूळ श्लोकांतील पदांची फारशी ओढाताण न करितां बसतो, तरी पण तो उद्दिष्ट आहे असें मात्र म्हणतां येणार नाहीं.]

संजय उवाच—

**दृष्ट्वा तु पांडवानीकं व्यूढं दुर्योधनस्तदा**
**आचार्यमुपसंगम्य राजा वचनमब्रवीत्** २

तदा पांडवानीकम् व्यूढम् दृष्ट्वा तु राजा दुर्योधनः
आचार्यम् उपसंगम्य वचनम् अब्रवीत् ।

संजय (धृतराष्ट्रास) म्हणाला:—त्या वेळीं पांडवांचें सैन्य व्यूह-रचनेनें उभें राहिलेलें पाहतांच, राजा दुर्योधन, गुरु द्रोणाचार्यांजवळ जाऊन म्हणाला:—

**पश्यैतां पांडुपुत्राणामाचार्य महतीं चमूम्**
**व्यूढां द्रुपदपुत्रेण तव शिष्येण धीमता** ३

आचार्य, तव धीमता शिष्येण द्रुपद पुत्रेण व्यूढाम्
एताम् पांडुपुत्राणाम् महतीम् चमूम् पश्य ।

अहो आचार्य, तुमचा बुद्धिमान् शिष्य, द्रुपद राजाचा पुत्र (धृष्टद्युम्न) यानें व्यूहरचनेनें उभी केलेली ही पांडवांची मोठी सेना पहा.

[ आपल्या अकरा अक्षौहिणी सैन्यापेक्षां पांडवांचें सात अक्षौहिणी सैन्य फार कमी आहे, हें उघड दिसत असतां दुर्योधनानें पांडवांच्या थोड्या सेनेस मोठी ( महती ) हें विशेषण कुचेष्टेनें लाविलें आहे. त्याचप्रमाणें धृष्टद्युम्न व पांडव जाणून बुजून गुरुद्रोह करीत आहेत असें दाखवून त्यांच्याविषयीं द्रोणाचार्यांच्या मनांत तिरस्कार उत्पन्न करण्याकरितां " तुमच्याच बुद्धिमान् शिष्यानें " ( तव शिष्येण धीमता ) असें खोंचून म्हटलें आहे.]

**अत्र शूरा महेष्वासा भीमार्जुनसमा युधि**
**युयुधानो विराटश्च द्रुपदश्च महारथः ४**
**धृष्टकेतुश्चेकितानः काशिराजश्च वीर्यवान्**
**पुरुजित्कुंतिभोजश्च शैब्यश्च नरपुंगवः ५**
**युधामन्युश्च विक्रान्त उत्तमौजाश्च वीर्यवान्**
**सौभद्रो द्रौपदेयाश्च सर्व एव महारथाः ६**

**अत्र, युधि भीमार्जुनसमाः शूराः, महेष्वासाः, युयुधानः, विराटः च, महारथः द्रुपदः च, धृष्टकेतुः, चेकितानः, वीर्यवान् काशिराजः च, पुरुजित् कुंतिभोजः च, नरपुंगवः शैब्यः च, विक्रांतः युधामन्युः च, वीर्यवान् उत्तमौजाः च, सौभद्रः द्रौपदेयाः च, सर्वे एव महारथाः ( संति )।**

येथें (पांडवांच्या सैन्यांत) युद्धविद्येंत भीमार्जुनांच्या तोडीचे शूर, महाधनुर्धारी असे युयुधान (सात्यकी), विराट, महारथी द्रुपद, धृष्टकेतु, चेकितान व बलवान् काशीराजा, पुरुजित् नांवाचा कुंतिभोज वंशांतील राजा, पुरुषश्रेष्ठ शिबी देशाचा राजा, पराक्रमी युधामन्यु, वीर्यशाली उत्तमौजा, सुभद्रेचा पुत्र अभिमन्यु आणि द्रौपदीचे पुत्र हे सगळेच महारथी (दहा हजार योध्द्यांबरोबर एकएकटे युद्ध करणारे) आहेत.

**अस्माकं तु विशिष्टा ये तान्निबोध द्विजोत्तम**
**नायका मम सैन्यस्य संज्ञार्थं तान्ब्रवीमि ते ७**

**द्विजोत्तम, तु, अस्माकम् ये विशिष्टाः मम सैन्यस्य नायकाः, तान् ते संज्ञार्थं ब्रवीमि, तान् निबोध।**

अहो द्विजश्रेष्ठ (द्रोणाचार्य), आतां आमच्याकडील मुख्य मुख्य, जे माझ्या सैन्याचे अधिकारी ते तुम्हांला उदाहरणार्थ सांगतों. ते आपण ऐकून घ्यावे.

['विशिष्ट' आणि 'संज्ञार्थ' या शब्दांनीं दुर्योधनानें आपल्या सैन्यबलाची प्रौढी अभिमानपूर्वक वर्णन केली आहे.]

**भवान् भीष्मश्च कर्णश्च कृपश्च समितिंजयः**
**अश्वत्थामा विकर्णश्च सौमदत्तिस्तथैव च** ८

**भवान्, भीष्मः च, कर्णः च, समितिंजयः कृपः च, अश्वत्थामा च, विकर्णः च, तथा एव सौमदत्तिः च।**

आपण, भीष्म, कर्ण, युद्धांत विजयी होणारा कृपाचार्य, अश्वत्थामा, विकर्ण आणि सोमदत्ताचा मुलगा (भूरिश्रवा).

[विकर्ण जसा उदार तसाच शूरही होता हें दुर्योधनानें केलेल्या त्याच्या नांवाच्या उल्लेखावरून दिसून येतें.]

**अन्ये च बहवः शूरा मदर्थे त्यक्तजीविताः**
**नानाशस्त्रप्रहरणाः सर्वे युद्धविशारदाः** ९

**अन्ये, च मदर्थे त्यक्तजीविताः, नानाशस्त्रप्रहरणाः सर्वे युद्धविशारदाः, शूराः बहवः (सन्ति)।**

ह्याशिवाय माझ्याकरितां जिवावर उदार झालेले, अनेक प्रकारच्या शस्त्रास्त्रांनीं सज्ज व सर्व युद्धकलेंत निष्णात आणि शूर असे आणखीही पुष्कळ योद्धे आहेत.

**अपर्याप्तं तदस्माकं बलं भीष्माभिरक्षितं**
**पर्याप्तंत्विदमेतेषां बलं भीमाभिरक्षितं** १०

**तत् अस्माकम् अपर्याप्तम् बलम् भीष्माभिरक्षितम्।**
**तु एतेषाम् इदम् पर्याप्तम् बलम् भीमाभिरक्षितम्।**

तें (हें) आमचें अपरिमित सैन्य भीष्माकडून संरक्षिलें जात आहे. आणि ह्यांचें (पांडवांचें) हें परिमित (थोडें) सैन्य भीमाकडून संरक्षिलें जात आहे.

[ दुर्योधनानें केलेल्या या उभयसैन्याच्या वर्णनावरून त्याचेकडे संख्या व सामग्री जास्त तर पांडवांकडे अधिकारविभागणी व शिस्त जास्त असें दिसून येतें. कारण अर्जुन, धृष्टद्युम्न व भीमसेन या तिघांची सेनापति म्हणून नेमणूक झाली होती. पैकीं शेवटल्या दोघांचीं नांवें आलींच आहेत. सेनापति म्हणून अर्जुनाचें नांव आलें नाहीं तरी तें पुढील एकंदर संदर्भावरून कोणाच्याही लक्षांत येण्याजोगें आहे.]

**अयनेषु च सर्वेषु यथाभागमवस्थिताः**
**भीष्ममेवाभिरक्षन्तु भवन्तः सर्व एव हि ११**

**हि, सर्वेषु अयनेषु यथाभागम् अवस्थिताः च, भवंतः सर्वे एव भीष्मम् एव अभिरक्षंतु ।**

म्हणून सर्व प्रवेशमार्गांवर, आपआपल्या योजनेप्रमाणें, उभ्या असलेल्या आपण सर्वांनींही भीष्माचेंच रक्षण करावें.

**तस्य संजनयन् हर्षं कुरुवृद्धः पितामहः**
**सिंहनादं विनद्योच्चैः शखं दध्मौ प्रतापवान् १२**

**तस्य हर्षं संजनयन् कुरुवृद्धः, प्रतापवान् पितामहः, सिंहनादम् उच्चैः विनद्य, शंखम् दध्मौ ।**

त्याला (दुर्योधनाला) हर्ष उत्पन्न करणारे, सर्व कौरवांत वडील, पराक्रमी, आजोबा (भीष्म) मोठ्यानें सिंहनाद (सिंहासारखी गर्जना) करून शंख वाजविते झाले.

[ प्रारंभापासून युद्धाचे बाबतींत भीष्माचार्यांनीं दुर्योधनाला जरी विरोधच केला होता तरी आतां ऐन युद्धाचे वेळीं सेनापति या नात्यानें राजास उत्साहकारक असें आपलें वर्तन कसें ठेविलें हें पाहिलें असतां आचार्यांचें प्रसंगावधान व कर्तव्यतत्परता हे गुण दिसून येतात. आणि धनी व सेवक यांतील नातेंही लक्षांत येतें.]

**ततः शंखाश्च भेर्यश्च पणवानकगोमुखाः**
**सहसैवाभ्यहन्यन्त सशब्दस्तुमुलोभवत् १३**

**ततः शंखाः, भेर्यः, पणवानकगोमुखाः च सहसा एव अभ्यहन्यंत । सः शब्द तुमुलः अभवत् ।**

तदनंतर शंख, भेरी, पणव, आनक, गोमुख ( हीं रणवाद्यें ) एकदम वाजूं लागलीं. तो आवाज फारच मोठा झाला.

**ततः श्वेतैर्हयैर्युक्ते महति स्यंदने स्थितौ**
**माधवः पांडवश्चैव दिव्यौ शंखौ प्रदध्मतुः १४**

ततः श्वेतैः हयैः युक्ते महति स्यंदने स्थितौ, माधवः पांडवः च, एव दिव्यौ शंखौ प्रदध्मतुः।

नंतर शुभ्र घोडे जोडलेल्या मोठ्या रथांत बसलेले. श्रीकृष्ण व अर्जुन दिव्य शंख वाजविते झाले.

**पांचजन्यं हृषीकेशो देवदत्तं धनंजयः**
**पौंड्रं दध्मौ महाशंखं भीमकर्मा वृकोदरः १५**
**अनंतविजयं राजा कुंतीपुत्रो युधिष्ठिरः**
**नकुलः सहदेवश्च सुघोपमणिपुष्पकौ १६**

हृषीकेशः पांचजन्यम्, धनंजयः देवदत्तम्, भीमकर्मा वृकोदरः पौंड्रम् महाशंखम्(च) दध्मौ। कुंतीपुत्रः राजा युधिष्ठिरः अनंतविजयम्, नकुलः सहदेव च सुघोपमणिपुष्पकौ।

श्रीकृष्ण पांचजन्य नांवाचा शंख वाजविता झाला. अर्जुनानें देवदत्त व भयोत्पादक पराक्रम करणाऱ्या भीमानें पौंड्र नांवाचा मोठा शंख वाजविला. कुंतीचा ज्येष्ठ पुत्र राजा युधिष्ठिर (धर्मराज) यानें अनंतविजय आणि नकुल व सहदेव यांनीं सुघोप व मणिपुष्पक या नांवांचे शंख वाजविले.

**काश्यश्च परमेष्वासः शिखंडी च महारथः**
**धृष्टद्युम्नो विराटश्च सात्यकिश्चापराजितः १७**
**द्रुपदो द्रौपदेयाश्च सर्वशः पृथिवीपते**
**सौभद्रश्च महाबाहुः शंखान् दध्मुः पृथक् पृथक् १८**

पृथिवीपते, परमेष्वासः काश्यः, महारथः शिखंडी च, धृष्टद्युम्नः, विराटः च, अपराजितः सात्यकिः च, द्रुपदः, द्रौपदेयाः च, महाबाहुः सौभद्रः च, सर्वशः पृथक् पृथक् शंखान् दध्मुः।

हे राजा, (धृतराष्ट्रा) महाधनुर्धारी काश्य (काशिराजा), महारथी शिखंडी, धृष्टद्युम्न व विराट, विजयी सात्यकी, द्रुपद व द्रौपदीचे पुत्र, महाबलवान् सुभद्रेचा पुत्र (अभिमन्यु) हेही चोहों-कडून अनुक्रमानें आपआपले शंख वाजविते झाले.

**स घोषो धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयत्**
**नभश्च पृथिवीं चैव तुमुलो व्यनुनादयन्**　　१९

**नभः च पृथिवीम् एव च व्यनुनादयन् सः तुमुलः घोषः धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयत् ।**

आकाश आणि पृथ्वी यांना दुमदुमून टाकणारा असा तो तुंबळ ध्वनि, कौरवांचीं हृदयें विदीर्ण करिता झाला.

[ कौरव अपराधी म्हणून मनांतून भीत होते, हें दर्शविण्याकरितां, त्यांच्या छातींत भीतीनें धडकी भरली, असें " हृदयानि व्यदारयत् " या शब्दांनीं संजयानें सुचविलें आहे.]

**अथ व्यवस्थितान् दृष्ट्वा धार्तराष्ट्रान् कपिध्वजः**
**प्रवृत्ते शस्त्रसंपाते धनुरुद्यम्य पांडवः**　　२०
**हृषीकेशं तदा वाक्यमिदमाह महीपते**

**महीपते, अथ धार्तराष्ट्रान् व्यवस्थितान् दृष्ट्वा, कपिध्वजः पांडवः शस्त्रसंपाते प्रवृत्ते, तदा धनुः उद्यम्य हृषीकेशम् इदम् वाक्यम् आह ।**

हे राजा धृतराष्ट्रा, तदनंतर धृतराष्ट्राचे पुत्र (कौरव) व्यवस्थेनें उभे असलेले पाहून, कपिध्वज (ज्याच्या ध्वजावर मारुती आहे असा) पांडव (अर्जुन) शस्त्रास्त्रांचा वर्षाव सुरू होण्याचे वेळीं (आपलें) धनुष्य सज्ज करून, श्रीकृष्णाला (हें पुढील वाक्य) बोलला.

**अर्जुन उवाच**

**सेनयोरुभयोर्मध्ये रथं स्थापय मेऽच्युत**　　२१

**अच्युत, उभयोः सेनयोः मध्ये मे रथं स्थापय ।**

अर्जुन म्हणाला, हे अच्युता (श्रीकृष्णा) दोन्ही सैन्यांच्या मध्यभागीं माझा रथ (नेऊन) उभा कर.

**यावदेतान्निरीक्षेऽहं योद्धुकामानवस्थितान्**
**कैर्मयासह योद्धव्यमस्मिन् रणसमुद्यमे** २२

**अस्मिन् रणसमुद्यमे, मया कैः सह योद्धव्यं, एतान् योद्धुकामान् अवस्थितान् अहं यावत् निरीक्षे।**

(म्हणजे) या युद्धाच्या खटपटींत ज्यांच्याशीं मला युद्ध करावयाचें आहे, त्या युद्ध करण्याच्या इच्छेनें उभे असलेल्या (योद्ध्यांना) मी पाहीन.

**योत्स्यमानानवेक्षेऽहं य एतेऽत्र समागताः**
**धार्तराष्ट्रस्य दुर्बुद्धेर्युद्धे प्रियचिकीर्षवः** २३

**दुर्बुद्धेः धार्तराष्ट्रस्य युद्धे प्रियचिकीर्षवः, ये एते अत्र समागताः, (तान्) योत्स्यमानान् अहम् अवेक्षे।**

दुष्टबुद्धि दुर्योधनाला युद्धामध्यें खुष करण्याच्या इच्छेनें जे येथें जमले आहेत, त्या युद्ध करणाऱ्या योद्ध्यांना (देखील) मी पाहणार आहें.

[ दुर्योधनाकडे आलेलें सगळेच राजे कांहीं न्यायान्याय पाहणारे नाहींत; बहुतेक सार्वभौम सत्ताधीशाची खुषामत करणारेच आहेत असें 'प्रियचिकीर्षवः' या शब्दानें अर्जुनानें सुचविलें आहे.]

**संजय उवाच**

**एवमुक्तो हृषीकेशो गुडाकेशेन भारत**
**सेनयोरुभयोर्मध्ये स्थापयित्वा रथोत्तमम्** २४
**भीष्मद्रोणप्रमुखतः सर्वेषां च महीक्षिताम्**
**उवाच पार्थ पश्यैतान्समवेतान्कुरूनिति** २५

**भारत, एवं गुडाकेशेन उक्तः हृषीकेशः, भीष्मद्रोणप्रमुखतः सर्वेषां महीक्षितां च, उभयोः सेनयोः मध्ये रथोत्तमं स्थापयित्वा, "पार्थ, एतान् समवेतान् कुरून् पश्य," इति उवाच।**

संजय म्हणाला:—हे भरतकुलोत्पन्ना (धृतराष्ट्रा) याप्रमाणें ज्याला अर्जुनानें सांगितलें आहे असा श्रीकृष्ण, भीष्म-द्रोण आणि सर्व राजे, यांच्यासमोर, दोन्ही सैन्यांच्या मध्यभागीं (तो) उत्तम रथ उभा करून, "हे अर्जुना, ह्या जमलेल्या कौरवांना पहा" असें म्हणाला.

**तत्रापश्यत्स्थितान्पार्थः पितॄनथ पितामहान्**
**आचार्यान्मातुलान्भ्रातॄन् पुत्रान्पौत्रान्सखींस्तथा २६**
**श्वशुरान्सुहृदश्चैव सेनयोरुभयोरपि**

**तत्र, उभयोः सेनयोः अपि स्थितान् पितॄन्, अथ पितामहान् आचार्यान्, मातुलान् भ्रातॄन्, पुत्रान्, पौत्रान्, सखीन् तथा एव, श्वशुरान् सुहृदः च, पार्थः अपश्यत्।**

तेथें दोन्हींही सैन्यांमध्यें उभे असलेले, पितर (वडील), आजे, गुरु, मामे, भाऊ, मुलगे, नातू, सखे, सासरे आणि मित्र इत्यादि (आप्तइष्टांना) अर्जुन पाहता झाला.

[स्वपक्षांतील व शत्रुपक्षांतील सर्व प्रमुख योद्धे आपले आप्त-इष्टच आहेत; परकीय कोणीच नाहींत, असें अर्जुनास आढळून आलें.]

**तान्समीक्ष्य स कौंतेयः सर्वान्बंधूनवस्थितान् २७**
**कृपया परयाऽविष्टो विषीदन्निदमब्रवीत्**

**अवस्थितान् तान् सर्वान् बंधून् समीक्ष्य, परया कृपया आविष्टः, विषीदन्, सः कौंतेयः इदम् अब्रवीत्।**

(युद्धार्थ) उभे असलेले ते सर्व बांधव (आप्त) आहेत, असें पाहून, अत्यंत (कळवळ्यानें) व्याप्त झाल्यामुळें, विषाद (खेद) पावणारा तो अर्जुन हें (असें) म्हणाला.

**अर्जुन उवाच**

**दृष्ट्वेमं स्वजनं कृष्ण युयुत्सुं समुपस्थितम्** २८
**सीदंति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति**
**वेपथुश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते** २९
**गांडीवं स्रंसते हस्तात्त्वक्चैव परिदह्यते**
**न च शक्नोम्यवस्थातुं भ्रमतीव च मे मनः** ३०

**कृष्ण, युयुत्सुं समुपस्थितं इमं स्वजनं दृष्ट्वा, मम गात्राणि सीदंति, मुखं परिशुष्यति च, मे शरीरे वेपथुः च, रोमहर्षः च जायते, हस्तात् गांडीवं स्रंसते, एवं च त्वक् परिदह्यते च मे मनः भ्रमति इव, अवस्थातुं न शक्नोमि च।**

अर्जुन म्हणाला:—हे कृष्णा, युद्धाच्या इच्छेनें एकत्र जमलेल्या ह्या आप्तजनांना पाहून, माझीं गात्रें (अवयव) शिथिल झालीं आहेत. आणि तोंडाला कोरड पडली आहे, मला कंप सुटला आहे, आंगावर रोमांच उभे राहिले आहेत. हातांतून गांडीव (धनुष्य) गळूं लागलें आहे. त्याचप्रमाणें आंगाचा दाह होत आहे आणि माझें मन भ्रमल्या-सारखें होत आहे. (म्हणून) माझ्यानें उभें देखील राहवत नाहीं.

**निमित्तानि च पश्यामि विपरीतानि केशव**
**न च श्रेयोऽनु पश्यामि हत्वा स्वजनमाहवे** ३१

**केशव, आहवे निमित्तानि विपरीतानि पश्यामि।**
**नु, स्वजनं हत्वा, श्रेयः न पश्यामि च।**

शिवाय (च) हे श्रीकृष्णा, (प्रस्तुत) युद्धाविषयींचीं निमित्तें म्हणजे हेतु मला विपरीत (श्रेयाच्या उलट) दिसत आहेत. आणि दुसरी गोष्ट (नु इति विकल्पे) स्वजनांना ठार मारून, (स्वर्गादि फल-दायक) पुण्य (लागेल असें) दिसत नाहीं.

[ आतांपर्यंतच्या बहुतेक टीकाकारांनीं या श्लोकांतील निमित्त, या शब्दाचा अर्थ, 'विपरीत शकुन' किंवा 'अपशकुन' असाच केला आहे.

परंतु तसा अर्थ केल्यानें श्लोकांतील दोन्हीही वाक्यार्थांची संगती लागत नाहीं. त्यापेक्षां प्रवृत्ति निमित्त ( हेतु ) असा अर्थ करणेंच अधिक सयुक्तिक व निर्दोष आहे. प्राचीन टीकाकारांपैकीं श्रीशंकरानंद या टीकाकारांनीं या वरील शब्दाचा, 'प्रवृत्ति निमित्त' असाच अर्थ केला आहे व तोच ग्राह्य आहे. प्राचीन संस्कृत वाङ्मयांत उद्देश या अर्थानें निमित्त या शब्दाचा प्रयोग अनेक ठिकाणीं आढळतो. हेतु म्हणजे निमित्तें राजभोगादि ऐहिक सुखप्राप्तीचे उद्देश आणि पुण्य ( श्रेय ) म्हणजे स्वर्गादि पारलौकिक सुख-प्राप्ति ह्या दोन्हीही गोष्टी प्रस्तुत युद्धापासून साध्य होणें अशक्य आहे, अशी अर्जुनानें आपली प्रतिज्ञा म्हणजे विधान या श्लोकांत दर्शविलें आहे.]

वरील विधानांतील पहिली गोष्ट म्हणजे निमित्तें कोणतीं ? व तीं विपरीत कां वाटत आहेत, याचा खुलासा अर्जुन पुढील श्लोकांत करीत आहे.

**न कांक्षे विजयं कृष्ण न च राज्यं सुखानि च**
**किं नो राज्येन गोविंद किं भोगैर्जीवितेन वा　　३२**

**कृष्ण, विजयं न कांक्षे, राज्यं च सुखानि च, न कांक्षे। गोविंद, नः राज्येन, भोगैः, जीवितेन वा, किम् ।**

हे कृष्णा, विजय, राज्य आणि सुख यांची मला (आतां) इच्छा नाहीं. हे गोविंदा, राज्य, भोग (सुखोपभोग) किंवा जीवित (जगणें) यांचा आम्हांला काय उपयोग ?

[ अर्जुनाच्या समजुतीप्रमाणें विजय, राज्य व सुखोपभोग हीं प्रस्तुत युद्धाचीं निमित्तें म्हणजे हेतु आहेत.]

ह्या हेतूनें आपण युद्धास प्रवृत्त झालों, हे हेतु आतां आपणांस विपरीत कां वाटतात, याचें कारण अर्जुन पुढील श्लोकांत सांगत आहे.

**येषामर्थे कांक्षितं नो राज्यं भोगाः सुखानि च**
**त इमेऽवस्थिता युद्धे प्राणांस्त्यक्त्वा धनानि च　३३**

**येषां अर्थे नः राज्यं कांक्षितं, भोगाः सुखानि च ( कांक्षितानि ) ते इमे, प्राणान् धनानि च त्यक्त्वा, युद्धे अवस्थिताः ।**

(कारण) ज्यांच्याकरितां आम्ही राज्य, भोग व (तज्जन्य) सुख

यांची इच्छा करीत होतों, ते हे (स्वजन) जीवित व संपत्ति यांची पर्वा न करितां, युद्धाविषयीं सिद्ध झाले आहेत. (मरणास तयार झाले आहेत.)

हे स्वजन कोणते, याचें पुढील श्लोकांत दिग्दर्शन केलें आहे.

**आचार्याः पितरः पुत्रास्तथैव च पितामहाः**
**मातुलाः श्वशुराः पौत्राः श्यालाः संबंधिनस्तथा ३४**

**आचार्याः, पितरः, पुत्राः तथा एव पितामहाः च, मातुलाः, श्वशुराः, पौत्राः श्यालाः तथा संबंधिनः।**

गुरु, वडील, मुलगे, त्याचप्रमाणें आजे, मामे, सासरे, नातु, मेहुणे व त्याचप्रमाणें (इतर) नातलग येथें आहेत.

[ ज्या स्वजनांकरितां राज्यभोगादि ऐहिक सुखाच्या हेतूनें आम्ही युद्धास प्रवृत्त झालो होतों; त्यांनाच मारावे लागत आहे. याप्रमाणें हेतु व कर्म यांमध्यें विरोध येत आहे.] म्हणून —

**एतान्न हंतुमिच्छामि घ्नतोऽपि मधुसूदन**
**अपि त्रैलोक्यराज्यस्य हेतोः किं नु महीकृते ३५**

**मधुसूदन, एतान् घ्नतः अपि, महीकृते किं नु, त्रैलोक्यराज्यस्य हेतोः अपि, हंतुं न इच्छामि।**

हे मधुसूदना, हे (स्वजन) जरी मला मारावयास सिद्ध झाले आहेत, तथापि (केवळ) पृथ्वीच्या राज्याकरितांच काय; (पण) त्रैलोक्याच्या राज्याच्या हेतूनें देखील मी ह्यांना मारूं इच्छित नाहीं.

[ ३१ व्या श्लोकातील विधानांपैकीं पहिल्या गोष्टीचा म्हणजे निमित्ताच्या विपरीतपणाचा सिद्धान्त या श्लोकांत अर्जुनानें केला आहे. यालाच अनुमानपद्धतींत निगमन असें म्हणतात.]

आतां ३१व्या श्लोकांतील विधानाचा दुसरा भाग म्हणजे पुण्य (श्रेय), याबद्दल अर्जुन पुढील श्लोकांत विवेचन करीत आहे.

**निहत्य धार्तराष्ट्रान्नः का प्रीतिः स्याज्जनार्दन**
**पापमेवाश्रयेदस्मान्हत्वैतानाततायिनः** ३६

**जनार्दन, धार्तराष्ट्रान् निहत्य, नः का प्रीतिः स्यात्? एतान् आततायिनः हत्वा अस्मान् पापम् एव आश्रयेत्।**

हे जनार्दना, धृतराष्ट्राच्या पुत्रांना (कौरवांना) ठार मारून, आम्हांला कोणतें सुख मिळणार? (ऐहिक सुख नाहीं हें वर दाखविलेंच आहे. व स्वर्गादि पारलौकिक सुखही नाहीं.) हे आततायी असले तरी (ते आमच्या अंगावर चालून आले नसल्यामुळें) त्यांना ठार मारिल्यानें आम्हांला पापच लागेल.

[ 'स्वर्गशब्दः प्रीतेरभिधाता' ह्या शबरस्वामीच्या वाक्यावरून, ह्या श्लोकांतील प्रीति शब्दाचा अर्थ स्वर्ग किंवा पुण्य असा करण्यास हरकत नाहीं. शिवाय दुसऱ्या ओळींतील पाप हा शब्द प्रीति शब्दाच्या अर्थाची दुसरी म्हणजे विरुद्ध बाजू दर्शविणारा आहे. त्यावरून स्वर्ग किंवा स्वर्ग-फलदायक पुण्य असाच प्रीति शब्दाचा अर्थ करणें सयुक्तिक दिसतें. 'आततायिनमायान्तं हन्यादेवाविचारयन्' (मनु, अ. ८, श्लोक ३५०) असें शास्त्र आहे. व 'अग्निदो गरदश्चैव०' इत्यादि वचनांवरून कौरव हे आततायी ठरतात. तथापि असे आततायी (आयान्त) चालून येतील, तेव्हांच त्यांना विचार न करितां मारण्याचा अधिकार धर्मशास्त्रानें दिलेला आहे. प्रस्तुत प्रसंगीं कौरवांनीं अन्यायानें राज्यभाग नाकारल्यामुळें, पांडवांना-च प्रथम युद्धास प्रवृत्त व्हावें लागलें आहे. यावरून कौरव प्रथम चालून आलेले (आयान्त) होत नाहींत. अर्थात् त्यांना विचार न करितां ठार मारावयास धर्मशास्त्राचा वरील आधार उपयोगी पडत नाहीं. ह्या श्लोकांत अर्जुनानें ३१ व्या श्लोकांतील विधानाच्या दुसऱ्या भागाचें-श्रेयाचें निगमन (सिद्धान्त) केलें आहे.]

**तस्मान्नार्हा वयं हन्तुं धार्तराष्ट्रान्स्वबांधवान्**
**स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव** ३७

**माधव, हि स्वजनं हत्वा सुखिनः कथं स्याम? तस्मात् धार्तराष्ट्रान् स्वबांधवान् हंतुं वयं न अर्हाः।**

हे माधवा, ज्या अर्थीं हे स्वजन (आप्त) आहेत, त्या अर्थीं ह्यांना मारून आम्ही सुखी कसे होऊं? (सुखी होणार नाहीं.) (आणि) धृतराष्ट्राचे पुत्र कौरव झाले तरी आमचे बंधु आहेत, म्हणून ह्यांना ठार मारणें आम्हांस मुळींच योग्य नाहीं.

[ ३१ व्या श्लोकांतील विधानांच्या दोन्ही भागांचें वेगवेगळें निगमन करून, अर्जुनानें आपल्या संपूर्ण विधानाचा उपसंहाररूप सिद्धान्त या श्लोकांत सांगितला आहे.]

ह्याप्रमाणें प्रस्तुत युद्ध पापकारक आहे, असें ठरत असल्यामुळें, आमचे प्रतिपक्षी पापाचरणास प्रवृत्त झाले म्हणून, आम्हींही तसेंच करावें; असें सिद्ध होत नाहीं. कारणः —

**यद्यप्येते न पश्यन्ति लोभोपहतचेतसः**
**कुलक्षयकृतं दोषं मित्रद्रोहे च पातकं** ३८
**कथं न ज्ञेयमस्माभिः पापादस्मान्निवर्तितुम्**
**कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिर्जनार्दन** ३९

**जनार्दन! एते लोभोपहतचेतसः, कुलक्षयकृतं दोषं, मित्रद्रोहे पातकं च यद्यपि न पश्यंति, कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिः अस्माभिः, अस्मात् पापात् निवर्तितुं कथं न ज्ञेयम्?।**

हे जनार्दना, ह्यांचें (कौरवांचें मन लोभाविष्ट झालें असल्यामुळें (त्यांना) कुलक्षयानें घडणारा दोष व मित्रद्रोह केला असतां लागणारें पातक जरी दिसत नाहीं, (तथापि) कुलक्षयानें घडणारा दोष प्रत्यक्ष पाहणाऱ्या आम्हीं, ह्या पापापासून परावृत्त होण्याचा कां विचार करूं नये? (हा विचार करणें आम्हांस भाग आहे.)

[ह्या युद्धापासून पुण्य तर नाहींच पण उलट पाप मात्र लागणार असा अर्जुनानें ३६ व्या श्लोकांत सिद्धान्त केला आहे. त्यांतील पापाचें स्वरूप कुलक्षय व मित्रद्रोह ह्या शब्दांनीं ह्या ठिकाणीं दाखविलें आहे. शिवाय अज्ञानानें घडलेल्या पातकापेक्षां समजून उमजून केलेलें पातक अधिक घोर आहे, असेंही सुचविलें आहे.]

हें दाखविण्याकरितां त्याचे परिणाम अनुक्रमानें सांगितले आहेतः—

**कुलक्षये प्रणश्यन्ति कुलधर्माः सनातनाः**
**धर्मे नष्टे कुलं कृत्स्नमधर्मोऽभिभवत्युत**　　४०

**कुलक्षये सनातनाः कुलधर्माः प्रणश्यंति। उत, धर्मे नष्टे, अधर्मः कृत्स्नं कुलं अभिभवति।**

कुलक्षय झाला असतां, प्राचीन कालापासून चालत आलेले (परंपरागत) कुलधर्म नष्ट होतात आणि धर्म नष्ट झाला म्हणजे अधर्म सर्व कुलाला ग्रासून टाकतो.

**अधर्माभिभवात्कृष्ण प्रदुष्यन्ति कुलस्त्रियः**
**स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसंकरः**　　४१

**कृष्ण, अधर्माभिभवात् कुलस्त्रियः प्रदुष्यंति। वार्ष्णेय, स्त्रीषु दुष्टासु वर्णसंकरः जायते।**

हे कृष्णा, (कुल) अधर्मानें ग्रासिलें म्हणजे कुलस्त्रिया पातकी होतात. हे वृष्णिकुलोत्पन्ना (कृष्णा) कुलस्त्रिया पापाचरणी झाल्या असतां, वर्णसंकर होतो.

[ अधर्मानें पुरुष व स्त्रिया सारख्याच दूषित होतात, परंतु कुलस्त्रियांचें दुराचरण पिढयान्‌पिढया भोंवण्यासारखें आहे. याच हेतूनें या श्लोकांत फक्त कुलस्त्रियांचा उल्लेख केला आहे. अशा कुलस्त्रियांच्या पापाचरणानें जी संतति निर्माण होते, ती बहुधा ज्ञातिविघातक असते. या प्रकारालाच अर्जुनानें वर्णसंकर म्हटलें आहे. हा वर्णसंकर म्हणजे, अर्जुनाच्या मतानें जातिसंकरच होय. अर्जुन येथें जातीलाच वर्ण समजत आहे, हें लक्षांत ठेविलें पाहिजे.]

**संकरो नरकायैव कुलघ्नानां कुलस्य च**
**पतंति पितरो ह्येषां लुप्तपिंडोदकक्रियाः**　　४२

**संकरः कुलघ्नानां, कुलस्य च नरकाय एव (भवति) हि लुप्तपिंडोदकक्रियाः एषां पितरः पतंति।**

वर्णसंकर हा कुलक्षय करणारांना, व (सर्व) कुलाला नरकप्रद

होतो कारण श्राद्धतर्पणादि कर्मांचा लोप झाल्यामुळें त्यांचे (कुलक्षय करणारांचे) पितर (पूर्वज) अधोगतीला जातात.

**दोषैरेतैः कुलघ्नानां वर्णसंकरकारकैः**
**उत्साद्यंते जातिधर्माः कुलधर्माश्च शाश्वताः ४३**

**कुलघ्नानां एतैः वर्णसंकरकारकैः दोषैः, शाश्वताः जातिधर्माः कुलधर्माः च उत्साद्यंते।**

कुलक्षय करणारांच्या ह्या वर्णसंकरकारक दोषांनीं सनातन ज्ञातिधर्म व कुलधर्म उध्वस्त होतात.

**उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां जनार्दन**
**नरके नियतं वासो भवतीत्यनुशुश्रुम ४४**

**जनार्दन, उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां, नियतं नरके वासः भवति इति अनुशुश्रुम।**

हे जनार्दना, ज्यांचे कुलधर्म नष्ट झाले आहेत, अशा मनुष्यांना खचित नरकवास प्राप्त होतो, असें आम्ही ऐकत आलों आहों.

[कुलक्षयाचे हे दुष्परिणाम भारतकालाप्रमाणेंच साप्रतकाळीं देखील कोणाही समंजस मनुष्यास पटण्यासारखे आहेत.]

कुलक्षयामुळें होणाऱ्या ह्या घोर परिणामांवरून, प्रस्तुत युद्ध हें महापाप आहे असें सिद्ध करून अर्जुन म्हणतो—

**अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम्**
**यद्राज्यसुखलोभेन हंतुं स्वजनमुद्यताः ४५**

**बत ! यत् राज्यसुखलोभेन स्वजनं हंतुं उद्यताः, वयं महापापं कर्तुं व्यवसिताः अहो !।**

अरेरे ! राज्यसुखाच्या लोभानें आम्ही स्वजनांना ठार मारण्यास तयार झालों. हें महापाप करण्यास आम्ही सिद्ध झालों आहों, हें केवढें आश्चर्य !

[ ३१ व्या श्लोकांतील निमित्त शब्दाचा संबंध ह्या ४५ व्या श्लोकापर्यंत एकसारखा येऊन पोहोंचला आहे. हें १५ श्लोकांचें प्रकरण सुसंगत बसण्यास

निमित्त शब्दाचा हेतु हा अर्थ किती उपयोगी पडतो हें कोणाच्याही सहज लक्षांत येईल. पण याच शब्दाचा अर्थ अपशकुन असा केल्यास, या प्रकरणास त्याचा मुळींच उपयोग होत नाहीं. शिवाय ३५ व्या श्लोकांतील हेतु हा पंचम्यन्त शब्द, आणि ४५ व्या श्लोकांतील राज्यसुखलोभेन, हा तृतीयान्त शब्द, हे दोन्हीही अधांत्रीच राहतात. म्हणून निमित्त शब्दाचा उद्देश असाच अर्थ करणें, अत्यंत आवश्यक ठरतें. राज्याच्या व सुखाच्या लोभामुळें आम्ही हें युद्ध करण्यास तयार झालों, अशा या अर्जुनाच्या म्हणण्यावरून ३२ व्या श्लोकांत विजय, राज्य इ० सांगितलेलीं निमित्तेंच या युद्धास कारणीभूत झालीं आहेत, असा अर्जुनाचा ठाम सिद्धान्त आहे. या सर्व गोष्टींचा विचार केल्यास निमित्त शब्दाचा 'अपशकुन' असा अर्थ करणें, अगदीं निरर्थक आहे.]

ह्या विचारसरणीचा पूर्ण परिणाम अर्जुनाच्या मनावर झाल्यामुळें तो निराश व उद्विग्न होऊन शेवटीं म्हणतो:—

**यदि मामप्रतीकारमशस्त्रं शस्त्रपाणयः**
**धार्तराष्ट्रा रणे हन्युस्तन्मे क्षेमतरं भवेत्** ४६

**यदि शस्त्रपाणयः धार्तराष्ट्राः, अशस्त्रं अप्रतीकारं मां रणे हन्युः, तत् मे क्षेमतरं भवेत् ।**

जरी शस्त्र धारण करणाऱ्या कौरवांनीं निःशस्त्र व प्रतिकारपराङ्मुख अशा मला (ह्या) रणभूमीवर ठार मारिलें, तरी तें मला (या युद्धापेक्षां) अधिक श्रेयस्कर होईल.

[मी आतां युद्ध करणार नाहीं, इतकेंच नव्हे; तर हातांत शस्त्रही धरणार नाहीं, किंवा कोणाचा प्रतिकारही करणार नाहीं, असें अर्जुन म्हणत आहे. यावरून प्रतिकार करणें देखील पातकच आहे, अशी अर्जुनाची समजूत झाली आहे.]

**संजय उवाच**

**एवमुक्त्वाऽर्जुनः संख्ये रथोपस्थ उपाविशत्**
**विसृज्य सशरं चापं शोकसंविग्नमानसः** ४७

**शोकसंविग्नमानसः अर्जुनः संख्ये एवं उक्त्वा सशरं चापं विसृज्य, रथोपस्थे उपाविशत् ।**

संजय म्हणाला:—शोकानें ज्याचें अंतःकरण व्याप्त झालें आहे असा अर्जुन युद्धाविषयीं असें बोलून, बाणासह धनुष्य टाकून देऊन रथांतील आपल्या आसनावर बसला.

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुन-संवादे अर्जुनविषादयोगो नाम प्रथमोऽध्यायः ।**

याप्रमाणें श्रीकृष्णांनीं गाइलेल्या उपनिषदांतील ब्रह्मविद्यांतर्गत (कर्म) योगशास्त्रांतील अर्जुनविषाद प्रकरण या नांवाचा पहिला अध्याय समाप्त झाला.

---

## प्रथमाध्यायाचा उपसंहार

या पहिल्या अध्यायांत धृतराष्ट्राचा एक, संजयाचे पंचवीस व अर्जुनाचे एकवीस असे एकंदर मिळून सत्तेचाळीस श्लोक आहेत. रणभूमीवर दोन्ही पक्षांकडील सैन्यें सिद्ध झाल्यानंतर, युद्धाची सुरवात होण्याचे पूर्वी कांहीं विशेष गोष्टी घडल्या कीं काय, व युद्धास सुरवात कोणाकडून व कशी झाली याविषयींच्या जिज्ञासेचाच धृतराष्ट्राचा प्रश्न दिसतो. कारण, प्राचीनकाळीं मोठमोठ्या युद्धांचे प्रारंभीं कांहीं कांहीं शिष्टाचार अवश्य म्हणून समजले जात असत व त्याप्रमाणें पुढें भगवान् व्यासमहर्षींनीं वर्णनही केलें आहे. धृतराष्ट्राचा प्रश्न ऐकून संजयानें सांगितलेला कृष्णार्जुनांचा संवाद हा भारतीय युद्धाचे प्रारंभीं सहज योगायोगानें घडून आलेला एक प्रसंग होय. या प्रसंगाच्या कार्यकारणाचा विचार करावयाचा झाल्यास इतकेंच सांगतां येईल कीं, विद्वान्, कर्तृत्वशाली, शीलसंपन्न व चौकसबुद्धीच्या अर्जुनास उत्पन्न झालेल्या शंकेचें किंवा जिज्ञासेचें सर्वज्ञ अशा योगेश्वर भगवान् श्रीकृष्णानें वैदिकधर्माचें रहस्य सांगून उत्कृष्ट समाधान केलें आहे.

भारतीय युद्धाच्या प्रारंभापासून सर्वच हकीकत साद्यंत सांगावयाची असल्यामुळें संजयानें कृष्णार्जुनांचा संवादही सविस्तरपणें वर्णन केला आहे. म्हणून

धृतराष्ट्राच्या प्रश्नासुद्धां या सर्व संवादरूप प्रसंगास गीता असें म्हणण्याची वहिवाट आहे. वास्तविक धृतराष्ट्राच्या प्रश्नाचा गीतेतील प्रतिपाद्य विषयाशीं प्रत्यक्ष संबंध येत नाहीं, असें असतां त्याच्या प्रश्नाचा समावेश या ग्रंथामध्यें कां करण्यांत आला आहे, असा प्रश्न साहजिक उत्पन्न होतो. याचें उत्तर असें देतां येईल कीं, गीतारूपी कृष्णार्जुनांच्या संवादास जसें युद्ध कारणीभूत झालें आहे, त्याप्रमाणेच या युद्धाला धृतराष्ट्र देखील कारणीभूत झाला आहे. इतकेंच काय, पण प्रस्तुत युद्ध होणें अगर न होणें हे सर्वस्वीं धृतराष्ट्राच्या आज्ञेवर अवलंबून होतें, असें म्हटलें तरी चालेल. यावरून धृतराष्ट्र हा कौरवपक्षाचा सूत्रधार होता व त्याच्याच आज्ञेनें प्रस्तुत युद्ध सुरू झालें होतें, हे लक्षांत येण्याचे कामीं प्रस्तुत श्लोकाचा उपयोग होईल. आणि म्हणूनच ग्रन्थाच्या प्रारंभापासून पांडवपक्षाची उलट बाजू वाचकांच्या लक्षांत येऊं लागते व संवादाच्या प्रस्तावनेचीं सर्व अंगें पूर्ण होतात. गीतेच्या या अध्यायामध्यें विषयांचें वर्गीकरण पुढीलप्रमाणें आहेः—

१ धृतराष्ट्राचा प्रश्न.
२ दुर्योधनाचें भाषण.
३ रणवाद्यांचें वर्णन.
४ अर्जुनास दोन्ही सैन्यांतील मुख्य मुख्य अधिकारी एकदम पाहण्याविषयीं झालेली इच्छा.
५ स्वजन-मरणाच्या कल्पनेनें अर्जुनाची विचारक्रान्ति.
६ कुलक्षयापासून होणारी अनर्थपरंपरा.
७ अर्जुनाचा निश्चय.

यांपैकीं धृतराष्ट्राचा प्रश्न स्वाभाविक असला तथापि ग्रन्थसंदर्भाच्या दृष्टीनें त्याचा कसा उपयोग आहे हें वर दाखविलेंच आहे.

दुर्योधनाच्या भाषणावरून बऱ्याच गोष्टी लक्षांत येण्याजोग्या आहेत. दुर्योधनाचें स्वतःच द्रोणाचार्यांकडे येणें, त्यांना प्रसन्न करण्याचा प्रयत्न करणें, धृष्टद्युम्नाविषयीं उपरोधिकपणानें बोलून पांडवांविरुद्ध त्यांना द्वेष उत्पन्न करणें व स्वपक्षाकडील सैन्याची अधिक संख्या व साधनसामुग्रीची रेलचेल वगैरे गोष्टींचा डौलानें निर्देश करणें इत्यादि गोष्टींवरून त्याची आर्जवशक्ति,

प्रसंगावधान, मनोदौर्बल्य व आत्मविश्वासाचा अभाव वगैरे गुणदोष उघड होत आहेत.

दुर्योधनाचें समग्र चरित्र पाहिल्यास तो कृष्णकारस्थानांत निष्णात असून फाजील महत्त्वाकांक्षी होता हें सहजच दिसून येतें. एखाद्या कपटी मनुष्यानें आपल्या कृष्णकृत्यास शाब्दिक नीतीची सफेती फासून वरून कितीही झगझगीतपणा आणला तरी त्याचें अंतःकरण अत्यंत मलिन व पुरें भेकड कसें बनून जातें, हें दुर्योधनाच्या एकंदर चरित्रावरून चांगलेंच प्रत्ययास येतें. दुर्योधनाच्या भाषणाला लागूनच एका वाक्यांत भीष्माचार्यांचें वर्णन आलें आहे. दुर्योधनाच्या भाषणावरून ज्याप्रमाणें त्याच्या मानसिक अवनतीची कल्पना येते, त्याप्रमाणेंच भीष्माचार्यांस दिलेल्या अगदी अल्प पण निवडक विशेषणांनीं भीष्माचार्यांची उच्च भूमिका दिसून येते. हीं दोनही चित्रें दृष्टीसमोर उभीं राहिलीं म्हणजे एक अधोगतीच्या परमावधीस पोंचलेला आहे तर दुसरा उन्नतीच्या शिखरावर उभा आहे असें दिसून येतें. अकरा अक्षौहिणी सैन्याचा मालक, सार्वभौम सत्ता स्वतःच्या हातांत खेळविणारा व नवीन जोमाचा तरुण राजा दुर्योधन व मानवी आयुर्मर्यादेच्या पलीकडे गेलेला, असा पितामह भीष्म या दोहोंतील दिसून येणाऱ्या या जमीनअस्माना-इतक्या फरकाचें कारण कोणतें ? या प्रश्नाचें उत्तर हेंच कीं, एकाची धार्मिक नीतिमत्ता कुचकामाची व दुसऱ्याची धार्मिक नीतिमत्ता त्रिभुवनास वंद्य होण्याच्या योग्यतेची. या दोनही वर्णनांवरून आधिभौतिक सामर्थ्यापेक्षां आध्यात्मिक सामर्थ्य अत्यंत श्रेष्ठ आहे हें सहजच सिद्ध होतें. भीष्माचार्यांच्या एकंदर चरित्रावरून त्यांचें थोर व उदात्त शील मनास पटून प्रत्येकाचें अन्तः-करण त्यांच्याविषयींच्या आदरानें भरून येतें. हा आदराचा पूर किंचित् ओसरल्यावर असा जगद्वंद्य सत्पुरुष दुर्योधनासारख्या अत्यंत कनिष्ठ प्रतीच्या मनुष्याचा चाकर म्हणून रणभूमीवर कां उभा राहिला व त्याची चाकरी बजावीत असतांच अखेरीस त्यांना देह ठेवण्याचा प्रसंग कां आला ? म्हणजे भीष्माचार्यांनीं देह ठेविला तो सत्कार्याकरितां नसून दुर्योधनाच्या सेवेकरितां त्यांना कां ठेवावा लागला ? हे प्रश्न प्रत्येकाच्या मनाला बोचल्यावांचून रहात नाहींत. एखादा दुष्ट मनुष्य राजाच्या मर्जींतला झाल्यास तें एक मनः-शल्य होय, असें भर्तृहरीनें म्हटलें आहे. येथें त्याच्या उलट स्थिति दिसते.

एक साधु पुरुष एका अधमाचा चाकर झाला आहे, ही गोष्ट देखील प्रत्येकाच्या मनास उद्वेगजनक वाटते. पण हें असें कां व्हावें हें एक मोठें गूढच आहे. आजपर्यंत अनेक पंडितांनीं याची मीमांसा अनेक प्रकारांनीं थोडीफार केली आहे. परंतु या गूढाचा व्हावा तसा चांगलासा उलगडा अजून झालेला नाहीं. या प्रश्नावर थोडासा आणखी प्रकाश पडण्याकरितां वाचकांनीं या भीष्म-दुर्योधनाच्या वर्णनाला लागूनच व्यास महर्षींनीं कृष्णार्जुनाच्या जोडीचा निर्देश केला आहे, तिकडे लक्ष द्यावें. कृष्णार्जुनांमध्येंही कांहींसा असाच प्रकार दिसून येतो. भगवान् श्रीकृष्णाच्या मानानें अर्जुनाची भूमिका कनिष्ठ प्रकारची आहे, हें निराळें सांगावयास नकोच. असें असून देखील भगवान् श्रीकृष्ण सेवक व अर्जुन हा मालक असें हें दृश्य आहे. परंतु ज्याप्रमाणें भीष्म-दुर्योधनांतील हें अंतर उद्वेगकारक वाटतें, त्याप्रमाणें कृष्णार्जुनांतील अंतर उद्वेगजनक तर नाहींच; पण उलट अत्यंत आल्हादकारक वाटतें. हाहि एक चमत्कार नव्हे काय ? पण थोडासा विचार केल्यास या चमत्कारांचा उलगडा करतां येण्याजोगा आहे. भीष्माने दुर्योधनाची सेवा पत्करिली असली, तरी ती धृतराष्ट्राच्या आज्ञेनेंच पत्करिली होती, हें प्रथम लक्षांत ठेविलें पाहिजे. भीष्माचार्य स्वतःचें पोट भरण्याकरितांच दुसऱ्याचे आजन्म अंकित झाले होते, ही समजूत मुळांतच साफ चुकीची आहे. 'मी अर्थाचा दास आहें', असें आचार्यांनीं पुढें एक प्रसंगीं म्हटलें आहे हें खरें; परंतु त्यांनीं तारुण्यांतच स्वीकारलेलें व्रत हाच एका त्यांचा अर्थ होता व त्याचेंच ते आजन्म दास झाले होते. तात्पर्य, भीष्माचार्यांची व्रतनिष्ठा जाज्वल्य असल्यामुळें आपल्या मनाच्या विरुद्ध किंबहुना जगाच्या दृष्टीनें देखील विरुद्ध असें कार्य करण्याचा व त्या कार्यांतच देह अर्पण करण्याचा विषम प्रसंग त्यांच्या नशिबीं आला. फार झालें तर हा व्रतनिष्ठेचा परिणाम होय असें म्हणतां येईल. या कडक व्रतनिष्ठेकरितांच पूर्वीं भीष्माचार्यांनीं आपले गुरु परशुराम यांचेबरोबर युद्ध करण्यास देखील कमी केलें नाहीं. पण या योगानें भीष्माचार्यांच्या वैयक्तिक चारित्र्यास काडीइतका देखील कमीपणा येत नाहीं. इतकेंच काय, पण त्यांच्या या व्रतनिष्ठेनें प्रत्येक भारतीयाचें अंतःकरण त्यांच्याविषयींच्या सद्भावनेनें उचंबळून जाईल यांत संशय नाहीं. मात्र भीष्म-दुर्योधनांचें दृश्य वरवर पहातांना मनःशल्यासारखें भासेल.

हें खरें, पण आतांपर्यंत दिग्दर्शन केल्याप्रमाणें या मनःशल्याच्या कारणांची उपपत्ति योग्य तऱ्हेनें लावतां येण्याजोगी आहे, हें कोणाच्याहि लक्षांत येईल. याप्रमाणें कृष्णार्जुनाची जोडी सकृद्दर्शनीं विषम दिसली तरी उद्वेगकारक होत नाहीं. कारण, अर्जुनासारख्या धर्मनिष्ठ व पुण्यशील अशा पुरुषाचें सारथ्य भगवान् श्रीकृष्णानें पत्करलें, यांत अर्जुनाची धर्मभक्ति व श्रीकृष्णाचें भक्तवात्सल्यच मनावर पूर्णपणें ठसतें, आणि यामुळेंच हें दृश्य कोणाहि सद्‌भिरुचीच्या मनुष्याला आल्हादजनक वाटलें तर त्यांत फारसें नवल नाहीं. याप्रमाणें भीष्माचार्यांच्या व्रतनिष्ठेचा व भगवान् श्रीकृष्णाच्या तत्त्वनिष्ठेचा परिणाम वाचकांच्या लक्षांत येण्याकरितांच व्यास महर्षींनीं हीं दोन वर्णनें एकमेकांजवळ ठेविलीं असावींत असे मानण्याला जागा आहे. असो. भीष्मासारख्या धीरोदात्त पुरुषाच्या अंतःकरणांत भीतीचा लवलेशसुद्धां असणें शक्य नसल्यामुळे सर्वांच्या अगोदर रणवाद्याची गर्जना करून युद्धारंभ त्यांनीं जाहीर केला, व राजाची भीति दूर केली, हें भीष्माचार्यांसारख्या कसलेल्या अनुभवी रणपंडितांस योग्यच होतें.

शंख हें वाद्य भारतकालीं बरेंच प्रतिष्ठित समजलें जात होतें, म्हणून त्यांचीं नांवें व त्यांच्या उत्पत्तिबद्दलचीं वर्णनें देण्याची ग्रंथकाराची पद्धति प्रसिद्ध आहे. उभयपक्षांतील रणवाद्यांची गर्जना सुरू झाली व अशा ऐन युद्ध सुरू होण्याचे वेळीं दोन्ही सैन्यें एकदम पहावीं असें अर्जुनासारख्या कुशल सेनापतीस वाटणें अगदीं स्वाभाविकच होतें.

एखादी गोष्ट कल्पनासृष्टींतून मूर्तस्वरूपांत येते त्या वेळीं तिचा क्वचित् प्रसंगीं फारच विलक्षण परिणाम घडून येतो, याचीं अनेक उदाहरणें व्यवहारांत देखील दृष्टीस पडतात. विद्याभ्यासाकरितां मुलास दूरदेशीं पाठविणें अवश्य आहे असें वाटूनच पिता आपल्या मुलास दूरदेशीं पाठविण्यास तयार होतो. या सर्व गोष्टी विचारपूर्वक केल्या असल्या, तथापि ऐनवेळीं आपल्या मुलाचा विरह व प्रवासांत होणारे त्याचे हाल इत्यादि गोष्टी मनांत येऊन उत्पन्न झालेल्या दुःखावेगाच्या झटक्यामुळें कित्येक मातापितरें आपला बेत रहित करतात; तशीच अर्जुनाची ही स्थिति झाली. अर्जुनावरील प्रसंग फारच निर्वाणीचा होता. याच अध्यायामध्यें निरनिराळ्या कारणांनीं दोन वेळां राजांच्या नांवांच्या यादी आल्या आहेत. त्यांचा विचार केल्यास भारती

युद्धाचें स्वरूप किती व्यापक व जगड्व्याळ होतें याची बरोबर कल्पना होईल. भारतीयुद्धांत सामिल झाला नाहीं, असा नामांकित क्षत्रिय वीर सांपडणें जवळ जवळ अशक्यच होतें. शिवाय कुरुकुलाचा संबंधहि अतिशय विस्तृत होता हें देखील या अध्यायांतील नातेवाइकांच्या यादीवरून दिसून येते. असला कुलक्षय म्हणजे हा राष्ट्रक्षयच होय. अशा आणीबाणीच्या प्रसंगीं अर्जुनासारखा चतुर, पण सरलहृदयी पुरुष गांगरून गेला तर त्यांत फारसें नवल नाहीं. अर्जुन मुत्सद्दी असला तरी कृष्णकारस्थानी नव्हता. त्याचा स्वार्थ धर्माच्या मर्यादेच्या आंत असल्यामुळें, कुलक्षयाचे भेसुर चित्र पाहून मन गांगरल्यामुळें आपल्या हेतूविषयीं देखील त्याची कल्पना विपरीत झाली. अशा वेळीं कार्याकार्यव्यवस्थितीच्या निश्चयाचा वकूब अर्जुनाचे अंगीं राहिला नाहीं. त्यानें आपले म्हणणें सयुक्तिक रीतीनें श्रीकृष्णापुढें मांडलें आणि कुलक्षयापासून राष्ट्रावर कसकसे घोर परिणाम ओढवतील व त्यामुळें आपण आपल्या पूर्वजांसह कसे अधोगतीस जाऊं, हें सांगून प्रस्तुत युद्धांत आपण मुळींच संबंध ठेवणार नाहीं असा आपला निश्चय त्यानें श्रीकृष्णास निवेदन केला. आपण या युद्धापासून अलिप्त राहिलों तरी हें युद्ध होणार व आपले सर्व आप्तइष्ट मृत्युमुखीं पडणार असें वाटून अर्जुन विव्हल झाला व स्वभावतः गंभीर वृत्तीचा असतांहि शोकसागरांत बुडून गेला.

कर्तव्य कोणतें व अकर्तव्य कोणतें हें ठरविण्यास अर्जुन वस्तुतः असमर्थ झाला होता खरा; परंतु स्वतःची ही स्थिति अजून त्याच्या लक्षांत आली नव्हती, कारण आपले म्हणणें भगवान् श्रीकृष्ण निमुटपणे ऐकून घेत आहे यावरून त्यांत कोठें चूक आहे अशी त्याला शंका देखील आली नाहीं आणि म्हणूनच त्यानें अखेरीस आपला निश्चय देखील ठरवून टाकिला. ऐहिक किंवा पारमार्थिक दृष्टीनें हानिकारक अशा ह्या युद्धास आपण प्रवृत्त झालों याबद्दल त्याच्या मनास खेद वाटला; शिवाय प्रस्तुत युद्धांत आपले सर्व स्वजन ठार मरणार हें पाहून त्याच्या शोकास अनावर भरतें आलें. धर्मशास्त्राच्या भाषेनें अर्जुनाच्या विचारांचें परीक्षण केल्यास असें म्हणतां येईल कीं, अर्जुनाला स्वतःच्या क्षात्रधर्मापेक्षां स्वतःचा गृहस्थाश्रमधर्म अधिक श्रेष्ठ वाटला. क्षात्रधर्माचें आचरण करीत असतां आपल्याच हातानें स्वकुलाचा नाश झाल्यास तो क्षात्रधर्म आपणास पापकारकच होईल; याच्या उलट कुलक्षयांत

घडणारीं भयंकर पातकें टाळण्याकरितां क्षात्रधर्माचा त्याग करणेंच श्रेयस्कर होय, असें त्याला वाटलें. क्षात्रधर्माचा त्याग करण्यांत कांहीं पातक होत आहे, असें त्याच्या दृष्टीला दिसलेंच नाहीं आणि कांहीं थोडी शंका असली तर कुलक्षयासारख्या महापातकापेक्षां क्षात्रधर्म सोडण्याचा दोष अगदींच अल्प आहे, सबब तो टाकण्यास हरकत नाहीं, असें त्यानें मानिलें असल्यास त्यांत फारसें नवल नाहीं. कर्तव्याकर्तव्याविषयींच्या या सर्व विचाराच्या खळबळीबरोबरच, आपण स्वीकारलेला मार्ग अधिक श्रेयस्कर करण्याच्या हेतूनें अर्जुनानें प्रतिकारबुद्धीचा त्याग करून आपल्या त्यागास भरपूर संन्यासाचें स्वरूप दिलें आहे. गृहस्थधर्माच्या आड क्षात्रधर्म येतो सबब त्याचा त्याग करून, आपल्या कुलाचा विध्वंस होऊं द्यावयाचा नाहीं आणि तो झालाच तर त्याला आपण व्यक्तिशः कारणीभूत व्हावयाचें नाहीं असें अर्जुनानें ठरविलें. याप्रमाणें अर्जुनाचे विचार व त्याची मानसिक स्थिति वर्णन करून हा अध्याय समाप्त झाला आहे.

---

# द्वितीयोऽध्यायः

## द्वितीयाध्यायाचा उपक्रम

या अध्यायाच्या उपक्रमाचा विचार करतां प्रस्तुत अध्यायाच्या १० व्या श्लोकापर्यंत अर्जुनाचें भाषण सुरू असल्यामुळें हे श्लोक पहिल्या अध्यायांत जमा धरले असते तर बरें झालें असतें, असें वाटणें साहजिक आहे. परंतु थोडासा विचार केल्यास प्रथमाध्यायाची समाप्ति ज्या विभागानें झाली आहे, तोच विभाग अधिक सयुक्तिक आहे असें दिसून येईल. कारण, अर्जुनाच्या पहिल्या अध्यायांतील भाषणाचा अनुवाद दुसऱ्या अध्यायाच्या प्रारंभीं आहे. या दोन भाषणांत वरवर साम्य दिसत असलें तरी सूक्ष्म दृष्टीनें पाहिल्यास त्यांतील फरक चांगलाच लक्षांत येण्याजोगा आहे. पहिल्या अध्यायांतील अर्जुनाचें भाषण निश्चयात्मक स्वरूपाचें आहे व त्यालाच दुसऱ्या अध्यायाच्या प्रारंभींच्या दहा श्लोकांमध्यें शंकेचें स्वरूप आलें आहे. वस्तुतः अर्जुनाचा खरा पूर्वपक्ष पहिल्या अध्यायांतच आहे. तथापि त्याला शंकेचें स्वरूप नसल्यानें, त्याचें सर्व निश्चयात्मक भाषण पूर्ण झालें तेथेंच पहिल्या अध्यायाची समाप्ति केली. व त्याच्या म्हणण्याचा अनुवाद दुसऱ्या अध्यायांत समाविष्ट केला. भगवान् व्यास महर्षींनीं केलेली ही विभाग-व्यवस्था अत्यंत मार्मिक व अर्थपूर्ण आहे यांत शंका नाहीं. विषयाच्या दृष्टीनें विचार केल्यास अर्जुनाचा झालेला निश्चय वाद-विवादाच्या स्वरूपाचा नसल्यामुळें प्रश्नाखेरीज उत्तर देणें अनवश्यक होतें. 'मी युद्ध करूं कीं प्राप्तकर्माचा त्याग करूं ?' असें अर्जुन विचारीत नसल्यामुळें भगवंताच्या उत्तरास वावच राहिला नव्हता. आणि म्हणूनच अर्जुनाच्या निश्चयाप्रमाणें श्रीकृष्णाला देखील या त्याच्या स्थितीबद्दल काय वाटतें हें निर्भिडपणें सांगणें भाग होतें. यापेक्षां दुसऱ्या अध्यायांतील विषयाचें येथें अधिक विवेचन न करितां प्रत्यक्ष कृष्णार्जुनाच्या संवादाकडे वळणेंच बरें.

**संजय उवाच**

**तं तथा कृपयाऽविष्टमश्रुपूर्णाकुलेक्षणम्**
**विषीदंतमिदं वाक्यमुवाच मधुसूदनः** १

**तथा कृपया आविष्टम् विषीदंतम् अश्रुपूर्णाकुलेक्षणम् तम् मधु-सूदनः इदम् वाक्यम् उवाच।**

संजय म्हणाला–याप्रमाणें कृपेनें व्याप्त ( कळवळलेला ), शोक-ग्रस्त व ज्याचे नेत्र अश्रूंनी भरून आले असून कावरेबावरे झाले आहेत अशा त्या ( अर्जुनाला ) मधुसूदन ( कृष्ण ) असें म्हणाले.

[ अर्जुनानें ऐहिक व पारलौकिक सुखप्राप्तीच्या दृष्टीनें वर्णधर्माचें प्राप्त कर्म (युद्ध) हानिकारक ठरवून, त्याचा त्याग केला व प्रतिकारहि वर्ज्य केला.]

याप्रमाणें अर्जुनानें केलेला हा निष्प्रतिकार कर्मसंन्यास कसा हानिकारक आहे, हे स्पष्ट दाखविण्याकरितां भगवान् म्हणतात.

**श्रीभगवानुवाच**

**कुतस्त्वा कश्मलमिदं विषमे समुपस्थितम्**
**अनार्यजुष्टमस्वर्ग्यमकीर्तिकरमर्जुन** २

**अर्जुन ! इदं अनार्यजुष्टं, अस्वर्ग्यं, अकीर्तिकरं कश्मलं, त्वा विषमे कुतः समुपस्थितम्।**

भगवान् म्हणतात–हे अर्जुना, हा अनार्यांना आवडलेला, स्वर्ग-प्रद नव्हे असा. ( व ) अपकीर्तिकारक मोह, तुला ( ह्या ) भलत्या प्रसंगीं कोठून उत्पन्न झाला ?

**क्लैब्यं मा स्म गमः पार्थ नैतत्त्वय्युपपद्यते**
**क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परंतप** ३

**पार्थ ! क्लैब्यम मा स्म गमः। एतत् त्वयि न उपपद्यते। परंतप, क्षुद्रम हृदयदौर्बल्यम त्यक्त्वा, उत्तिष्ठ।**

हे पार्था, (असा) नामर्दपणा स्वीकारूं नको. हा तुला योग्य नाहीं. हे शत्रूंना भीति उत्पन्न करणाऱ्या अर्जुना, हें क्षुद्र मनोदौर्बल्य टाकून ऊठ ( युद्धाला तयार हो.)

[ मोहानें कर्तव्यपराङ्मुख झालेल्या अर्जुनाचा निष्प्रतिकार कर्मत्याग, व्यक्तीच्या व समाजाच्या धारणपोषणास अत्यंत विघातक असून, तो पार-लौकिकदृष्टयाही श्रेयस्कर नाहीं. आणि हा क्षुद्र व नामर्दपणाचा मार्ग,

मनाच्या दुर्बलतेचा द्योतक असल्यामुळें आर्यलोकांनीं तो कधींही स्वीकारलेला नाहीं. अडचणींना व संकटांना भिऊन कर्तव्याचा त्याग करणें, हा अयोग्य मार्ग, तितिक्षाहीन अनार्यांनीच काढलेला आहे. वैदिक मार्गांतील चतुर्थाश्रम हा वरील प्रकारचा संन्यास नव्हे, हें उघड आहे.]

श्रीकृष्णांनीं केलेला हा स्पष्ट व तीव्र निषेध ऐकून, आपण आपल्या कल्पनेप्रमाणें ऐहिक व पारलौकिक- दृष्टया विचार करून सशास्त्र व श्रेयस्कर म्हणून अंगीकारलेला मार्ग निर्दोष नसून त्यांत कांहीं तरी चूक असावी, अशी अर्जुनाला आतां शंका येऊं लागली. म्हणून आपलें म्हणणें तो पुनः प्रश्नरूपानें भगवंतापुढें मांडीत आहे.

**अर्जुन उवाच**

**कथं भीष्ममहं संख्ये द्रोणं च मधुसूदन**
**इषुभिः प्रतियोत्स्यामि पूजार्हावरिसूदन ४**

**अरिसूदन, मधुसूदन ! पूजार्हौ, भीष्मम् द्रोणम् च संख्ये इषुभिः कथम् प्रतियोत्स्यामि ।**

हे शत्रुनाशका मधुसूदना. ज्यांची पूजा (सेवा) करणें हेंच आम्हांला योग्य (कर्तव्य) त्या (पितृतुल्य) भीष्मांस व ( गुरु ) द्रोणाचार्यांस युद्धामध्यें बाणांनीं उलट प्रहार कसे करूं ?

[ ज्या भीष्मांनीं आम्हांला लहानाचे मोठे केले, व ज्या द्रोणाचार्यांनीं आम्हांला विद्या शिकवून या योग्यतेस आणिलें, त्यांची सेवाशुश्रूषा करणें, हेंच आतां आमचें कर्तव्य असतां त्याच्या उलट त्यांचा जीव घेण्यास तयार होणें, हें अत्यंत अनुचित होय, असें अर्जुनाचें म्हणणें आहे.]

आतां क्षात्रधर्माप्रमाणें जरी हे युद्ध प्राप्तकर्म असलें तथापि—

**गुरूनहत्वा हि महानुभावान्**
**श्रेयो भोक्तुं भैक्ष्यमपीह लोके**
**हत्वाऽर्थकामांस्तु गुरूनिहैव**
**भुंजीय भोगान्रुधिरप्रदिग्धान् ५**

**हि गुरून् हत्वा, रुधिरप्रदिग्धान् अर्थकामान् भोगान् इह एव भुंजीय, तु महानुभावान् गुरून् अहत्वा इह लोके भैक्ष्यम् अपि भोक्तुम् श्रेयः ।**

गुरूंना ठार मारून, त्यांच्या रक्तानें माखलेले, इहलोकीं मात्र मिळणारे, अर्थकामजन्य भोग ( द्रव्यद्वारा वासनातृप्तीनें प्राप्त होणारे सुखोपभोग ) भोगावे, त्यापेक्षां परमपूज्य महात्मे अशा गुरूंना ( गुरुजनांना ) न मारल्यामुळें इहलोकीं जरी भिक्षा मागावी लागली, तरी बरी !

[ गुरुजनांचा वध केल्यानें फार तर ऐहिक सुखोपभोग मिळण्याचा संभव असेल, पण पारलौकिक सुखाची तर मुळींच आशा करावयास नको. याकरितां निवळ ऐहिक सुखाच्या लालसेनें, पापपुण्याची पर्वा न करितां, असलें घोर कर्म करण्यापेक्षां, भिक्षावृत्ति हीन असली, तरी ती पुष्कळ बरी, असा अर्जुनाचा अभिप्राय आहे. येथें " अपि " शब्दानें भिक्षावृत्तीचें हीनत्व अर्जुन स्पष्टपणें मान्य करीत आहे.]

**न चैतद्विद्मः कतरन्नो गरीयो**
**यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः**
**यानेव हत्वा न जिजीविषाम–**
**स्तेऽवस्थिताः प्रमुखे धार्तराष्ट्राः** ६

**नः कतरत् गरीयः एतत् न विद्मः यान् हत्वा न एव जिजीविषामः**
**ते धार्तराष्ट्राः प्रमुखे अवस्थिताः यद्वा, जयेम, यदि वा नः जयेयुः ॥**

(प्राप्तकर्मानुष्ठान किंवा प्राप्तकर्मत्याग ह्या दोहोंपैकीं) आम्हांला कोणती गोष्ट श्रेष्ठ, हें समजत नाहीं. ज्यांना ठार मारून, आम्हीं जगण्याची इच्छा केव्हांही केली नाहीं, तेच धृतराष्ट्रपुत्र ( कौरव ) युद्धाला तयार होऊन, आमच्या समोर उभे आहेत. (शिवाय) आम्ही त्यांना (कौरवांना) जिंकूं, कीं ते आम्हांला जिंकतील, हेंही निश्चित नाहीं.

[ कौरवांना ठार मारणें हें आमचें ध्येय नसून, त्यांच्याकडून आपला हक्काचा राज्यभाग परत मिळवावा, एवढाच आमचा हेतु आहे. परंतु या कामीं आमचे बंधु ( कौरव ) यांना ठार मारण्याचा प्रसंग यावा, हें मला बरें वाटत नाहीं. शिवाय जयापजयाचा निश्चय आरंभींच करितां येणें शक्य

नसल्यामुळें, पापपुण्याचा विचार न करितां ज्या निवळ ऐहिक सुखाकरितां हें घोर कर्म पत्करावयाचें, तें सुख तरी निश्चयानें मिळलेच, असें कोणीं सांगावें ? अशा स्थितींत ( ५ व्या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें ) स्वधर्म म्हणून युद्धास तयार होऊन परमपूज्य जनांचा वध करावा, कीं हें घोर पातक टाळण्याकरितां स्वकर्मत्याग करावा, ह्या दोहांपैकीं श्रेयस्कर कोणतें हें आम्हांस कळेनासें झालें आहे.]

ह्याप्रमाणें एका बाजूला स्वजनहिंसायुक्त घोर क्षात्रधर्म, व दुसऱ्या बाजूला निरुपद्रवी कर्मत्याग, अशा दोन मार्गांपैकीं अर्जुनानें आपल्या समजुतीप्रमाणें श्रेयस्कर म्हणून, ठरविलेल्या मार्गाचा भगवतांनीं तीव्र निषेध केलेला पाहून, त्याला संशय उत्पन्न झाला व त्याचा निश्चय डळमळला. म्हणून आपली पूर्वोक्त विचारसरणी थोडक्यांत सकारण सांगून, त्याविषयीं उत्पन्न झालेल्या शंकेचें निरसन करून घेण्याकरितां, अर्जुन भगवंतास नम्रपणें प्रश्न करीत आहे.

**कार्पण्यदोषोपहतस्वभावः**
**पृच्छामि त्वां धर्मसंमूढचेताः**
**यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे**
**शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम्** ७

**कार्पण्यदोषोपहतस्वभावः, धर्मसंमूढचेताः त्वाम् पृच्छामि, यत् निश्चितम् श्रेयः स्यात् तत् मे ब्रूहि, अहम् ते शिष्यः, त्वाम् प्रपन्नम् मां शाधि।**

( हे श्रीकृष्णा ) दैन्यदोषानें ( दुर्बलपणामुळें ) माझें अंतःकरण ग्रस्त झाल्यामुळें धर्माविषयीं ( धर्माधर्मनिर्णयाविषयीं ) माझी बुद्धि मोहानें व्याप्त झाली आहे. म्हणून मी तुम्हांला विचारतों कीं, जें निःसंशय श्रेय ( कल्याण ) असेल, तें मला सांगा. मी तुमचा शिष्य ( आहें ). तुम्हांला शरण आलेल्या मला बोध करा.

[ अर्जुनाच्या या वरील म्हणण्यावरून त्याला धर्माधर्माचा पेच पडला होता, असें निःसंशय सिद्ध होतें. अर्जुनानें वर्णधर्म व कुलधर्म ( आश्रमधर्म ) यांपैकीं या वेळीं श्रेयस्कर धर्म कोणचा तो मला समजावून सांग असें

श्रीकृष्णास विचारिलें आहे व ही आपली जिज्ञासा कशी अत्यंत तीव्र आहे तें पुढील श्लोकांत स्पष्ट केलें आहे. ]

**न हि प्रपश्यामि ममापनुद्या-**
**द्यच्छोकमुच्छोषणमिंद्रियाणाम्**
**अवाप्यभूमावसपत्नमृद्धं**
**राज्यं सुराणामपि चाधिपत्यम्** ८

**हि, भूमौ असपत्नम् ऋद्धम् राज्यम्, सुराणाम् आधिपत्यम् च अपि, मम इंद्रियाणाम् उच्छोषणम् शोकम् यत् अपनुपद्यात् (तत्) न प्रपश्यामि ।**

कारण पृथ्वीवरील निष्कंटक व वैभवसंपन्न राज्य, ( किंबहुना ) देवांचें आधिपत्य ( त्रैलोक्याचें राज्य ) मिळाल्यावर देखील, माझ्या इंद्रियांना शुष्क करणारा शोक ज्याच्या योगानें नाहींसा होईल असें कांहींच मला दिसत नाहीं.

[ व्यक्तिविषयक ऐहिक सुखोपभोगासारख्या इष्ट फलांवरून कर्माकर्माचा निर्णय करणें योग्य नाहीं अशी अर्जुनाची समजूत असल्यामुळें, या खेरीज कोणत्या रीतीनें कर्माकर्माचा निर्णय करावयाचा; म्हणजे खरा कल्याणकारक मार्ग कोणता, आणि तो कसा ठरवावयाचा, हे आपणास सोपपत्तिक समजावून देण्याविषयीं त्यानें भगवंतास विनंति केली आहे. या वाक्यांत अर्जुनानें अभ्युदयाचा पूर्णपणें तिरस्कार केला आहे असें कित्येकांना वाटतें. पण तो निवळ त्यांचा भ्रम होय. कारण नुसतें राज्यवैभव किंवा निष्कंटक साम्राज्यसत्ता, हे अभ्युदयाचें शुद्ध स्वरूपच नव्हे. अभ्युदयाच्या शुद्ध स्वरूपाची कल्पना गीताशास्त्राच्या अखेरीस आली आहे, त्यावरून हा भ्रम दूर होण्याजोगा आहे.]

**संजय उवाच**

**एवमुक्त्वा हृषीकेशं गुडाकेशः परंतप**
**न योत्स्य इति गोविंदमुक्त्वा तूष्णीं बभूव ह** ९

**परंतप, गुडाकेशः हृषीकेशम् एवम् उक्त्वा, 'न योत्स्ये' इति गोविंदम् उक्त्वा, तूष्णीम् बभूव ह ।**

संजय म्हणाला–हे धृतराष्ट्रा, अर्जुन याप्रमाणें भगवंतास बोलून, ( युद्ध कां करावें ? हें समजेपर्यंत ) मी युद्ध करणार नाहीं असें श्रीकृष्णास म्हणून स्वस्थ राहिला.

[ स्वजनमरणाच्या शोकानें अर्जुनास मोह उत्पन्न झाला, व व्यक्तीच्या ऐहिक किंवा पारलौकिक सुखास वर्णधर्म आड येऊं लागल्यास त्याचा त्याग करण्यास हरकत नाहीं, असें अर्जुनास वाटलें हेंच त्याच्या पूर्वपक्षाचें तात्पर्य होय. तें लक्षांत घेऊनच भगवंतानी त्याला उपदेश करण्यास सुरुवात केली आहे.]

**तमुवाच हृषीकेशः प्रहसन्निव भारत**
**सेनयोरुभयोर्मध्ये विषीदंतमिदं वचः १०**

**भारत, उभयोः सेनयोः मध्ये विषीदतम् तम् हृषीकेशः प्रहसन्, इव इदम् वचः उवाच ।**

हे राजा धृतराष्ट्रा, दोन्ही सैन्यांच्या मध्यभागीं विषण्ण होऊन बसलेल्या त्या अर्जुनाला भगवान् ( थट्टेनें ) हंसल्यासारखें करून असें म्हणाले.

खरें कल्याण कोणतें व तें प्राप्त करून घेण्याचा शास्त्रशुद्ध मार्ग कोणता, हें आपणांस निश्चित समजून, त्याप्रमाणेंच आपलें आचरण व्हावें, अशी अर्जुनाची उत्कट इच्छा होती. ही पवित्र जिज्ञासा वैदिक धर्माचें रहस्य समजल्यावांचून पूर्ण होणें शक्य नसल्यामुळें तें रहस्य त्याला समजून देण्याच्या उद्देशानें त्याच्या विचारसरणींतील पहिली चूक कोणती हें स्पष्ट दाखविण्याकरितां भगवान् म्हणतात.

**श्रीभगवानुवाच**

**अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे**
**गतासूनगतासूंश्च नानुशोचन्ति पंडिताः ११**

**त्वम् अशोच्यान् अन्वशोचः, प्रज्ञावादान् भाषसे च; पंडिताः गतासून् अगतासून् च न अनुशोचंति ।**

श्रीभगवान् म्हणतात–अर्जुना, ज्याविषयीं दुःख करणें योग्य नाहीं, त्याविषयीं तूं दुःख करीत आहेस; व उपपत्ति किंवा कारणें सांगून

समर्थन करीत आहेस. शुद्धबुद्धिमान् लोक गेलेल्या प्राणांबद्दल किंवा न गेलेल्या प्राणांबद्दल ( प्राण गेले काय किंवा राहिले काय, याबद्दल ) दुःख ( पर्वा ) करीत नाहींत.

[ भोगतृष्णा ( स्वार्थ ) म्हणजे उपभोगाविषयीं तळमळ ही कल्याणास विघातक असल्यामुळें, केव्हांही त्याज्यच ठरते. स्वतःच्या चैनीची हाव कोणत्याही दृष्टीनें श्रेयस्कर नसल्यामुळें, व्यवहारांत व परमार्थांत स्वार्थत्यागाची सारखीच आवश्यकता आहे. म्हणून अर्जुनानें दर्शविलेले प्रस्तुत युद्धाचे हेतु ( निमित्तें ) स्वार्थपर असल्यामुळें, तेच खरोखर श्रेयस्कामाच्या दृष्टीनें शोच्य आहेत आणि प्राणिमात्रांचे मरण सृष्टिनियमाप्रमाणें अपरिहार्य असल्यामुळें, तें अशोच्य आहे, म्हणजे त्यामुळें दुःख होणें साहजिक असलें, तरी त्याचा मनावर परिणाम होऊं देणें योग्य नाही. याप्रमाणें स्वार्थपर हेतु खरोखर शोच्य असून त्याविषयीं विचारही न करितां, अशोच्य अशा स्वजनमरणाविषयीं मात्र अर्जुन दुःख करीत आहे व त्यांची आपल्या कल्पनेप्रमाणें सयुक्तिक अशीं कारणेंही सांगत आहे ही त्याची चूक आहे. अनुमानपद्धतीप्रमाणें ही भगवंताची प्रतिज्ञा म्हणजे विधान होय. पंडित कर्तव्याकर्तव्याचा विचार करण्याच्या बाबतींत, म्हणजे कल्याणाचा मार्ग ठरविण्याच्या बाबतींत, जगण्या-मरण्याची विशेष पर्वा बाळगीत नाहींत, हें भगवंताचें दुसरें विधान होय.]

अर्जुनाच्या परलोकासंबंधीं विचारावरून, तो देहालाच आत्मा समजणारा नव्हे, हें लक्षांत घेऊन, मरण हें अशोच्य कसें? हें दाखविण्याकरितां भगवान् पुढें म्हणतात.

**न त्वेवाहं जातु नाऽसं न त्वं नेमे जनाधिपाः**
**न चैव न भविष्यामः सर्वे वयमतः परम्** १२

**जातु अहम् न आसम् (इति) न एव, त्वम् न, इमे जनाधिपाः तु न (इति) न, अतः परम् वयम् सर्वे न भविष्यामः (इति) न एव च।**

मी व तूं व हे (सर्व) राजे पूर्वीं केव्हांही नव्हतों असें नाहीं. (तर होतोंच) त्याचप्रमाणें आपण सर्व यापुढें (कधीं) असणार नाहीं असेंहि नाहीं.

[ मी, तूं व हे राजे, तसेंच जगांतील सर्व प्राणिमात्र यांच्या शरीरांत असणारा जीवात्मा अविनाशी आहे. म्हणजे कोणत्याही काळीं आत्म्याचा नाश होत नाहीं. या ठिकाणीं मी तूं व हे अशा तिन्ही पुरुषवाचक सर्वनामांचा उपयोग करून, अविनाशी आत्मा सर्वत्र आहे, असें ध्वनित केले आहे ].

आत्म्याचा नाश होत नाहीं. तर मरण म्हणजे काय ? हे उदाहरणासह सांगतात.

**देहिनोऽस्मिन् यथा देहे कौमारं यौवनं जरा**
**तथा देहांतरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति** १३

**यथा कौमारम्, यौवनम्, जरा अस्मिन् देहे, तथा देहिनः देहांतर-प्राप्तिः; तत्र धीरः न मुह्यति।**

ज्याप्रमाणें बाळपण, तरुणपण व म्हातारपण ह्या अवस्था ह्या (एकाच) देहावर (एका मागून एक) येतात, त्याप्रमाणेंच जीवात्म्याला एका मागून एक देह प्राप्त होत असतात. त्याबद्दल विचारी मनुष्य मोह पावत नाहीं.

[ देहाची एक अवस्था संपून, त्याला दुसरी अवस्था प्राप्त झाली म्हणजे पहिल्या अवस्थेचा नाशच होतो. परंतु त्या अवस्थानाशाबरोबरच देहाचाही नाश झाला, अशी चुकीची समजूत कोणाचीही असत नाहीं. त्याप्रमाणेंच जीवात्म्याचा एक देह सुटून, त्याला दुसरा देह प्राप्त झाला तरी, पहिल्या देहाच्या नाशाबरोबर जीवात्म्याचाही नाश झाला, असें मानण्याचे कारण नाहीं. ह्यावरून मरण म्हणजे अवस्थांतराप्रमाणेंच जीवात्म्याचें देहांतर होय असें विचारांतीं ठरतें.]

तथापि अवस्थांतर होतांना देहाला क्लेश मुळींच होत नाहीत. पण देहांतर होतांना मात्र जीवाला अत्यंत क्लेश होत असतात; त्याबद्दल तरी शोक कां करूं नये, तें सांगतात.

**मात्रास्पर्शास्तु कौंतेय शीतोष्णसुखदुःखदाः**
**आगमापायिनोऽनित्यास्तांस्तितिक्षस्व भारत** १४

**कौंतेय, मात्रास्पर्शाः तु, शीतोष्णसुखदुःखदाः आगमापायिनः अनित्याः भारत, तान् तितिक्षस्व।**

हे कुंतीपुत्रा, (अर्जुना) इंद्रियविषयसंयोग हे तर शीतोष्णादिकांच्या योगानें सुख किंवा दुःख देणारे असून हे उत्पन्न होणारे व नाश पावणारे (अतएव) अनित्य होत. म्हणून हे भरतकुलोत्पन्ना; ते तुला सहन केले पाहिजेत.

[ विषयांचा म्हणजे शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, ह्यांचा इंद्रियांशीं (किंवा इंद्रियांचा विषयांशीं) संयोग झाल्यामुळें जे शीत उष्ण इत्यादि अनुभव घडतात, ते केव्हां सुखकारकही असतात. व केव्हां दुःखकारकही होतात. म्हणजे कोणत्याही एका विषयाने सर्वांना सर्वकाल सुखच होईल, किंवा दुःखच होईल असा नियम करितां येणे शक्य नाहीं. तथापि विषयांचा इंद्रियांशी संयोग किंवा वियोग झाला म्हणजे सुख किंवा दुःख यांपैकीं कोणती तरी एक वेदना उत्पन्न होणें अपरिहार्य आहे. इंद्रियें व विषय जोपर्यंत विद्यमान आहेत, तोपर्यंत त्यांचा संयोग आणि वियोग होत राहणारच; तो टाळतां येणे शक्य नाहीं. त्याप्रमाणे आत्मा जोपर्यंत जीवदशेंत आहे, तोपर्यंत त्याचा देहाशीं संयोग व वियोग होणें देखील अपरिहार्यच आहे. अर्थात् त्यापासून होणारें सुखदुःखसुद्धां टाळतां येणे शक्य नाहीं. म्हणून ह्या क्षणिक व अनित्य सुखदुःखदायक इंद्रियविषयसंयोगाबद्दल शोक करीत न बसतां ते धैर्यानें सहन करणेंच उचित होय. यावरून मरण म्हणजे देहांतर, याबद्दल होणारें दुःख अपरिहार्य असल्यामुळें, तें सहनच केलें पाहिजे व त्याबद्दल शोक करीत बसणें, ही चूक होय. ११ व्या श्लोकातील पहिल्या विधानाचें येथें "तितिक्षस्व" (सहन कर, म्हणजे शोक करूं नको) या पदानें निगमन (सिद्ध) केलें आहे.]

आतां अनिष्ट पण अपरिहार्य अशा सुखदुःखदायक मात्रास्पर्शाबद्दल शोक न करितां धैर्यानें सहन केल्यामुळें काय लाभ होतो, तें सांगतात.

**यं हि न व्यथयंत्येते पुरुषं पुरुषर्षभ**
**समदुःखसुखं धीरं सोऽमृतत्वाय कल्पते १५**

**हि पुरुषर्षभ, यम् समदुःखसुखम् धीरम् पुरुषम् एते न व्यथयंति सः अमृतत्वाय कल्पते।**

कारण, हे पुरुषश्रेष्ठा (अर्जुना) ज्याला सुख व दुःख सारखेंच सह्य झालेलें असतें, अशा ज्या विवेकी पुरुषाला, हे (विषयेंद्रियांचे संयोग व वियोग) हर्ष-शोक उत्पन्न करीत नाहींत, तो मोक्षाला समर्थ (योग्य) होतो.

[ दुःखाचा परिणाम शोक ज्याप्रमाणें आंवरणें योग्य असतें, त्याचप्रमाणें सुखाचा परिणाम हर्ष हाही आंवरलाच पाहिजे. म्हणजे सुखदुःखाविषयीं समत्व झालें, असें समजावयाचें. याप्रमाणें, सुखदुःखाविषयीं समत्व झालें म्हणजे जगण्यामरण्याची पर्वा करण्याचें कारणच उरत नाहीं. म्हणूनच विवेकी पुरुष कल्याणाचा मार्ग ठरवितांना त्याकडे लक्ष देत नाहींत. हें ११ व्या श्लोकांतील दुसऱ्या विधानाचें निगमन आहे आणि असे विवेकी पुरुषच मोक्षास पात्र होतात. ह्या श्लोकांत अमृतत्व हेंच मनुष्याचें खरें कल्याण (निःश्रेयस्) होय असें भगवंतांच्या वाक्यावरून सिद्ध होत आहे. आणि ह्यावरून अर्जुनानें मानलेलें पारलौकिक सुख (स्वर्ग) हें साध्य गौण अत एव चुकीचें आहे, असेंही ठरतें.]

ह्या प्रकरणांत मरणाचें अशोच्यत्व दाखविण्याकरितां आत्म्याचें नित्यत्व सांगितलें आहे (श्लोक १२). तें सोपपत्तिक सिद्ध करण्याकरितां प्रथम वेदान्त शास्त्रांतील नियम सांगतातः—

**नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः**
**उभयोरपि दृष्टोऽन्तस्त्वनयोस्तत्त्वदर्शिभिः १६**

**असतः भावः न विद्यते। सतः अभावः न विद्यते। अनयोः उभयोः अपि अंतः तत्वदर्शिभिः दृष्टः।**

जें नाही, (असत्) त्याचें अस्तित्व (भाव) असत नाहीं. आणि जें आहे, (सत्) त्याचा अभाव होत नाहीं (म्हणजे तें नाहींसें होत नाहीं). ह्या (सत् व असत्) दोहोंचा (अंत) निर्णय तत्त्वज्ञ लोकांनीं पाहिला आहे. (त्यांना प्रत्यक्ष समजला आहे.)

[ विवर्त व विकार हे वेदान्तशास्त्रांतील दोन पारिभाषिक शब्द आहेत. या शब्दांचा अर्थ नीट समजला म्हणजे प्रस्तुत श्लोकांतील नियम ध्यानांत

येण्यास अडचण पडणार नाहीं. मूळ वस्तूत तत्त्वतः फरक न होतां, केवळ आकारावरून बदल झालासा दिसतो. त्यास विवर्त असें म्हणतात. उदाहरणः—सुवर्णाचा अलंकार हा विवर्त होय. कारण मूळच्या सुवर्णांत कांहींच फरक न होतां, त्याच्या नुसत्या आकारावरूनच त्याला कडें, कंठी, तोडा इत्यादि नांवें प्राप्त होतात. मूळ वस्तूचेंच जें रूपांतर होतें, त्यास विकार असें म्हणतात. उदाहरणः- दुधाचा दहीं हा विकार होय. कारण, दुधाचें स्वरूप अजिबात बदलून त्याचें दहीं होतें. सृष्टि हा ब्रह्माचा विकार नसून विवर्त आहे. म्हणजे मूळ ब्रह्मतत्त्व सर्वत्र एकच असून, त्यासच नाम-रूपात्मक सृष्टि, असें औपचारीक रीतीनें मानण्यांत येत असतें. पाश्चात्य सृष्टिशास्त्रज्ञांच्या अगदीं अलीकडील शोधावरून देखील ह्या नामरूपात्मक सर्व सृष्टीच्या मुळाशीं एकच अव्यक्त तत्त्व असून, त्या एकाच तत्त्वापासून सर्व दृश्य सृष्टि बनली आहे, असें सप्रमाण सिद्ध झालें आहे. ह्या तत्त्वास वेदान्तशास्त्राच्या दृष्टीनें माया किंवा अव्यक्त व कपिलसांख्यांच्या दृष्टीनें प्रधान किंवा प्रकृति म्हणतां येईल परंतु वेदान्तप्रतिपादित सच्चिदानंदस्वरूप ब्रह्मरूप हें ह्या अव्यक्त प्रकृतीच्याहि पलीकडील असून, ही मूळ अव्यक्त प्रकृति त्या ब्रह्मतत्त्वाचाच विवर्त होय. उदाहरणार्थः—सुवर्णाचा कोणताही अलंकार तयार होण्याचे अगोदर त्याची लगड तयार व्हावी लागते. परंतु ती लगडच अलंकाराचें कारण नसून, सुवर्ण हेंच अलंकाराचें खरें कारण होय. त्याप्रमाणें नामरूपात्मक सृष्टीचें मूळ कारण जरी प्रकृति हें असले, तथापि विवर्तरूपानें त्याचें खरें कारण ब्रह्मच होय. नामरूपात्मक सृष्टि हा मात्र मूळ प्रकृतीचा विवर्त नसून विकारच आहे. कारण मूळ प्रकृतीच्या गुणसाम्यांत न्यूनाधिक्य झाल्यानेंच नामरूपात्मक सृष्टि उत्पन्न होते. अलंकारा-मध्यें जसें अंतर्बाह्य सुवर्ण असतें तसें ह्या नामरूपात्मक सृष्टींत अंतर्बाह्य ब्रह्मतत्त्वच आहे आणि तेंच सत् होय. अलंकारांचीं म्हणजे दृश्य आकारांचीं कितीही रूपांतरें ( म्हणजे नाश ) झालीं, तरी त्यांतील सुवर्णाचा नाश होत नाहीं. त्याप्रमाणें सृष्ट पदार्थांचीं कितीही रूपांतरें ( नाश ) झालीं तरी त्यांतील ( सत् ) ब्रह्मतत्त्वाचा नाश म्हणजे अभाव होत नाहीं. सुवर्ण व त्याचे निरनिराळे आकार (अलंकार) हे दोन निरनिराळे पदार्थ आहेत अशी कल्पना करून, त्यांतील सुवर्ण हा पदार्थ एके बाजूस काढून, नुसता

अलंकार हा काय पदार्थ आहे, याचा विचार करूं लागल्यास कांहीं नाहीं, म्हणजे असत् असेंच ठरतें. याप्रमाणें नामरूपात्मक सृष्टींतील ब्रह्मतत्त्व वेगळें केल्यास, हीं नामरूपें म्हणजे कांहीं नाहीं (असत्) असेंच दिसून येईल. म्हणून ब्रह्मतत्त्वरूप सत् वस्तूचा अभाव आणि नामरूपात्मक असत् वस्तूचा भाव केव्हांही सिद्ध होणें शक्य नाहीं. हें ब्रह्मतत्त्व म्हणजेच आत्मतत्त्व होय असें येथें विधान केलें आहे.]

ह्या श्लोकांतील नियमांत सांगितलेल्या सत् तत्त्वाचें आतां स्पष्टीकरण करितातः—

**अविनाशि तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततम्**
**विनाशमव्ययस्यास्य न कश्चित् कर्तुमर्हति** १७

**येन इदम् सर्वम् ततम्, तत् तु अविनाशि विद्धि । कश्चित् अस्य अव्ययस्य विनाशम् कर्तुम् न अर्हति ।**

ज्याच्या योगानें हें सर्व (नामरूपात्मक विश्व) विस्तारलें (बनलें) आहे, तें ब्रह्मतत्त्व मात्र अविनाशी (कधींही नाश न पावणारें) आहे, असें समज. कोणीही ह्या अव्यय म्हणजे जसेंच्या तसेंच असणाऱ्या (ब्रह्मतत्त्वाचा) नाश करण्यास समर्थ नाहीं.

[विवर्त नियमाप्रमाणें हें नामरूपात्मक विश्व तत्त्वतः सत् स्वरूपच असल्यामुळें, तें अविनाशी व अव्यय असतें. म्हणजे त्यांत कोणत्याही प्रकारें फरक, कमीजास्तपणा किंवा रूपांतर कधींही होत नाहीं.]

तर मग नाश हा पदार्थच नाहीं कीं काय? आणि असेल, तर तो कशाचा हें सांगतातः—

**अंतवंत इमे देहा नित्यस्योक्ताः शरीरिणः**
**अनाशिनोऽप्रमेयस्य तस्माद्युध्यस्व भारत** १८

**नित्यस्य, अनाशिनः, अप्रमेयस्य, शरीरिणः इमे देहाः अंतवंतः उक्ताः । भारत ! तस्मात् युध्यस्व ।**

अव्यय, अविनाशी व अमर्याद (असून) शरीराच्या उपाधीनें मर्यादित दिसणाऱ्या ब्रह्मतत्त्वाच्या (म्हणजेच आत्मतत्त्वाच्या) शरी-

रास (नामरूपात्मक आकारास) नाशिवंत म्हणतात (मानितात). म्हणून हे भरतकुलोत्पन्ना! (अर्जुना) युद्ध कर (मरणाच्या काळजीनें शोक करण्याचें कारण नाहीं ).

[ या श्लोकांत 'युध्यस्व' या पदानें जो अर्थ दर्शविला जातो, त्या अर्थाबद्दल शास्त्रदृष्ट्या थोडासा विचार करणें जरूर आहे. कारण अनेक ग्रन्थकारांनीं 'युध्यस्व' म्हणजे युद्ध कर ही आज्ञा नसून अनुवाद किंवा अर्थवाद आहे, असे ठासून सांगितलें आहे. वस्तुतः व्यवहाराच्या दृष्टीनें यांत मोठासा भेद दिसत नाहीं; पण शास्त्रदृष्ट्या आज्ञा व अनुमोदन यांत बराच फरक पडतो आणि यालाच शास्त्रामध्यें विधि किंवा अर्थवाद असें म्हणतात. अर्थवाद हा अनुमोदक असतो, आणि विधि हा अवश्य कर्तव्यता दाखवितो. जें कर्म करण्याकडे मनुष्याची सहजप्रवृत्ति होत नाहीं असें कर्म करण्याविषयींची शास्त्राज्ञा हा विधि होय आणि याप्रमाणें पाहिल्यास नवव्या श्लोकांतील अर्जुनाच्या वाक्यावरून त्याची युद्धाची प्रवृत्ति नष्ट झाली असल्यामुळें त्याच्या दृष्टीनें युद्ध हें कर्म अप्राप्त ठरतें. अशा कर्माबद्दल केलेली आज्ञा विधीच्या सदरांत समाविष्ट केल्यावांचून गत्यंतरच नाहीं. यावरून 'अर्जुना! तूं युद्ध कर' असें जे भगवंतांनीं या श्लोकांत सांगितलें आहे तो अर्थवाद किंवा अनुवाद नसून विधीच आहे हें लक्षांत ठेविलें पाहिजे. आतां पूर्व संदर्भाप्रमाणें श्लोकाच्या सामान्य अर्थाचा विचार करूं.

व्यवहारांत दिसून येणारा सृष्टपदार्थाचा हा पूर्णत्वानें नाश नसून त्याचें रूपांतर होत असतें. सृष्टींतील कोणताही पदार्थ अजीबात नाहींसा होत नाहीं, हा नियम अर्वाचीन शोधांवरूनही सिद्ध झाला आहे. ह्या नियमाप्रमाणें देहांचा नाश, हें दृश्य आकारांचें नुसतें रूपांतर होय, असें ठरतें. पण ह्या रूपांतरालाच व्यवहारांत नाश असें म्हणतात. १६ व १७ श्लोकांत प्रतिपादन केलेल्या ब्रह्मतत्त्वाचाच येथें "शरीरी" या शब्दानें उल्लेख केला आहे. यावरून (ब्रह्मतत्त्व) परमात्मा व जीवात्मा हें एकच तत्त्व आहे, असें येथें निगमन केलें आहे. आत्मा नित्य, अव्यय व अमर्याद असून नामरूपात्मक दृश्य सृष्टि, हा त्याचाच विस्तार आहे. आणि मरण हा अजीबात नाश नसून, देहादि आकाराचें नुसतें रूपांतर होय. सृष्टिनियमाप्रमाणें

हें रूपांतर अपरिहार्य आहे म्हणून त्याबद्दल शोक करीत न बसतां, तूं कर्तव्य-तत्पर हो, असें भगवान् अर्जुनास सांगत आहेत. त्याप्रमाणें नाश म्हणजे पदार्थांच्या आकारांचें नुसतें रूपांतर होय, असें सिद्ध झालें. ह्यावरून सत् म्हणजे ब्रह्मरूप आत्मतत्त्वाचा अभाव असणें व असत् म्हणजे बाह्य आकार याचा भाव असणें शक्य नाहीं.]

व्यवहारांत जेव्हां कोणी कोणाचा नाश करीत आहे, असें दिसतें, त्या वेळीं जीवात्मा ह्या त्या नाशास कारण होतो कीं नाहीं ? असा प्रश्न साहजिक उत्पन्न होतो. त्याचें उत्तर सांगण्याकरितां भगवान् पुढें म्हणतातः—

**य एनं वेत्ति हंतारं यश्चैनं मन्यते हतम्**
**उभौ तौ न विजानीतो नायं हन्ति न हन्यते** १९

**यः एनम् हंतारम् वेत्ति। यः च एनम् हतम् मन्यते। तौ उभौ न विजानीतः। अयम् न हंति। न हन्यते।**

जो कोणी ह्याला (आत्म्याला) मारणारा असें समजतो व जो कोणी ह्याला (आत्म्याला) मेला, असें मानितो, हे दोघेही अज्ञानीच होत. कारण, हा (आत्मा) कोणास मारीतही नाहीं व कोणाकडून मारिलाही जात नाहीं.

[ रूपांतर ( नाश ) हें नामरूपात्मक सृष्टींतील पदार्थांचेंच व्हावयाचें असतें. त्या अर्थीं त्याचें साक्षात् कारणही नामरूपात्मक सृष्टींतच असलें पाहिजे, हें उघड आहे. आत्मा हा नामरूपांहून निराळा असल्यामुळें, त्याचा ह्या कार्यकारणाशीं प्रत्यक्ष संबंध येत नाहीं. असें असतां, मरणारा हें कारण व मारलें जाणें हें कार्य ( कर्म ) ह्याच्याशीं आत्म्याचा जे साक्षात् संबंध जोडतात ते अज्ञानी होत; ह्यावरून आत्मा स्वतः कोणाच्याही नाशास ( रूपांतरास ) साक्षात् कारण होत नाहीं.]

येथपर्यंत केलेल्या विवेचनाचेंच तात्पर्य सांगतातः—

**न जायते म्रियते वा कदाचि-**
**न्नायं भूत्वा भविता वा न भूयः**
**अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो**
**न हन्यते हन्यमाने शरीरे** २०

**अयं कदाचित् न जायते, म्रियते वा। भूत्वा भूयः न भविता न।**
**अयम् अजः, नित्यः, शाश्वतः, पुराणः, शरीरे हन्यमाने अपि, न हन्यते।**

हा (आत्मा) कधीं जन्माला येत नाहीं, किंवा मरणही पावत नाहीं. (म्हणजे) हा होऊन पुन्हा नाहींसा होणारा नाहीं. हा जन्मरहित, नित्य, अव्यय व अनादि आहे. आणि देहाचा नाश झाला तरी (ह्याचा) नाश होत नाहीं.

**वेदाविनाशिनं नित्यं य एनमजमव्ययम्**
**कथं स पुरुषः पार्थ कं घातयति हन्ति कम्** २१

**पार्थ! एनम् अविनाशिनम्, नित्यम्, अजम्, अव्ययम् यः वेदा, सः**
**पुरुषः कम् कथम् घातयति ? कम् हंति ?।**

अर्जुना ! हा आत्मा अविनाशी, नित्य, अनादि व अव्यय आहे, असें जो जाणितो, तो (आत्मज्ञानी) पुरुष कोणाला मारवितो कसा ? (किंवा) कोणाला मारतो कसा ?

[ आत्मज्ञानी पुरुषाची 'मी' ही भावना केवळ आत्मतत्त्वावरच स्थिर झाली असल्यामुळें मारणें, मारविणें, इत्यादि कर्मांचा आत्मतत्त्वाशीं साक्षात् संबंध येत नाहीं हें तो पूर्णपणें जाणतो. कारण आत्मा हा कोणत्याही कार्याचा प्रत्यक्ष कर्ता किंवा करविता होत नाहीं.]

या श्लोकांत आत्मा मारीत नाहीं व मारवीत नाहीं अशी वस्तुस्थिति असली, तरी ती समजली तरच त्यापासून मनुष्याला आपली बुद्धि अलिप्त ठेवतां येते. यावरून आत्मज्ञान नसल्यामुळेंच मनुष्याला शोक होतो व आत्म्याच्या ज्ञानानेंच शोकाचें निवारण होतें. तेराव्या श्लोकामध्यें बाल्य, तारुण्य इत्यादि अवस्थांचा दृष्टान्त देऊन जो मुद्दा सिद्ध केला होता त्याचेंच स्पष्टीकरण करण्याकरितां निराळा दृष्टान्त देतातः—

**वासांसि जीर्णानि यथा विहाय**
**नवानि गृण्हाति नरोऽपराणि**
**तथा शरीराणि विहाय जीर्णा-**
**न्यन्यानि संयाति नवानि देही** २२

**यथा नरः जीर्णानि वासांसि विहाय, अपराणि गृण्हाति। तथा देही जीर्णानि शरीराणि विहाय, अन्यानि नवानि संयाति।**

ज्याप्रमाणें मनुष्य जुनीं वस्त्रें टाकून, दुसरीं नवीं (वस्त्रें) घेतो, त्याप्रमाणें जीवात्मा जुनीं शरीरें टाकून, दुसऱ्या नव्या शरीरांशीं संयुक्त होतो. (त्यामुळें आत्म्यांत कांहीं फरक होत नाहीं.)

[ श्लोक बारा व तेरा यांत सांगितलेलें आत्म्याचें नित्यत्व पुनः श्लोक १९ ते २२ अखेर अधिक स्पष्ट करून सांगितलें आहे. प्राणी मरून जन्माला आला तथापि आत्मवस्तूमध्यें कोणताहीं फरक होत नाहीं. मारणें, मारविणें मरणें अथवा जन्म पावणें वगैरे सर्व विकार जडाचे आहेत आत्म्याचे नव्हत. ]

जडपदार्थांच्या संसर्गानें इतर पदार्थांमध्यें विकार उत्पन्न झालेले दिसून येतात. त्याप्रमाणें स्वतः निर्विकार अशा आत्मतत्त्वावर जड सृष्टीच्या संसर्गाचा कांहीं परिणाम घडून येतो कीं काय ? तें सांगतातः—

**नैनं छिंदंति शस्त्राणि नैनं दहति पावकः**
**न चैनं क्लेदयंत्यापो न शोषयति मारुतः** २३

**एनम् शस्त्राणि न छिंदंति। एनम् पावकः न दहति। एनम् आपः न क्लेदयंति। एनम् मारुतः न शोषयति च।**

ह्याला (आत्म्याला) शस्त्रें तोडीत नाहींत. ह्याला अग्नि जाळीत नाहीं. ह्याला पाणी भिजवीत नाहीं. आणि वायु वाळवीत नाहीं.

[ पृथ्वी (शस्त्र), आप (पाणी), अग्नि (तेज) व वायु हीं चारी व्यक्त जड द्रव्यें सृष्टपदार्थांचीं रूपांतरें घडवून आणण्यास कारण होत असतात. तथापि अविकारी आत्म्यावर मात्र ह्यांपैकीं कोणचाही परिणाम होत नाहीं.]

**अच्छेद्योऽयमदाह्योऽयमक्लेद्योऽशोष्य एव च**
**नित्यः सर्वगतः स्थाणुरचलोऽयं सनातनः** २४

**अयम् अच्छेद्यः। अयम् अदाह्यः। अयम् अक्लेद्यः अशोष्यः च एव। अयं नित्यः, सर्वगतः, स्थाणुः, अचलः, सनातनः।**

हा आत्मा तोडण्यास अशक्य, जाळण्यास अशक्य, भिजविण्यास अशक्य व सुकविण्यास अशक्य असा असून, तो नित्य, व्यापक, अविक्रिय, स्थिर व अनादि आहे.

**अव्यक्तोऽयमचिंत्योऽयमविकार्योऽयमुच्यते**
**तस्मादेवं विदित्वैनं नानुशोचितुमर्हसि** २५

**अयम् अव्यक्तः, अयम् अचिंत्यः, अयम् आविकार्यः उच्यते। तस्मात् एनम् एवम् विदित्वा, अनुशोचितुम् न अर्हसि।**

ह्याला (आत्म्याला) अव्यक्त म्हणजे इंद्रियांस अगोचर, अचिंत्य म्हणजे मनास अगोचर, आणि अविकार्य म्हणजे ज्यांत विकार उत्पन्न होत नाहींत, अशा स्वरूपानें उल्लेखितात. म्हणून हा आत्मा अशा स्वरूपाचा ( १९ व्या श्लोकापासून येथपर्यंत वर्णन केला आहे त्या स्वरूपाचा ) आहे. हें लक्षांत घेऊन, त्याबद्दल शोक करणें तुला उचित नाहीं.

[ १२ व्या श्लोकापासून १८ व्या श्लोकाच्या अखेरपर्यंत जे सिद्धान्त सोपपत्तिक सिद्ध केले आहेत, त्यांचाच पुढें येथपर्यंत अनुवाद करून, त्यावरून आत्म्याविषयीं शोक करणें अनुचित होय, असे भगवंतांनीं अर्जुनास पुनः सांगितलें आहे.]

ह्याप्रमाणें आत्मज्ञान झाल्यावर शोक करणे चुकीचें आहे, हें सिद्धच आहे, परंतु हे ज्ञान होण्यापूर्वीं देहात्मवादी अज्ञ लोकांप्रमाणेंच जरी तुझी कल्पना असती, तरी देखील विचाराअंतीं शोक करणें निपरुयोगीच ठरलें असतें. कारणः—

**अथ चैनं नित्यजातं नित्यं वा मन्यसे मृतम्**
**तथापि त्वं महाबाहो नैवं शोचितुमर्हसि** २६

**अथ च महाबाहो ! एनं नित्यजातम्, नित्यम् मृतम् वा मन्यसे। तथा अपि त्वम् एनम् शोचितुम् न अर्हसि।**

हे पराक्रमी (अर्जुना) हा (आत्मा) नेहमीं जन्म घेतो, व नेहमीं मृत्यु पावतो, असें जरी ( अज्ञ लोकांप्रमाणें ) तुला वाटत असलें, तरीही त्याबद्दल शोक करणें तुला उचित नाहीं.

**जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च**
**तस्मादपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि** २७

**हि, जातस्य मृत्युः ध्रुवः मृतस्य जन्म ध्रुवम् । च तस्मात् अपरिहार्ये अर्थे, त्वम् शोचितुम् न अर्हसि ।**

कारण जन्मास आलेल्या प्राण्याला मृत्यु निश्चित आहे. त्याचप्रमाणें मृताला जन्मप्राप्तीहि निश्चित आहे. म्हणून या अपरिहार्य गोष्टीविषयीं तुला शोक करणें उचित नाहीं.

[ देहात्मवादाची कल्पना चुकीची असली तरी ती क्षणभर गृहीत धरून, त्या दृष्टीनेंही शोक करणें निरर्थक आहे, एवढेंच येथें दाखविलें आहे. ह्याचा मागीलपुढील विवेचनाशीं कांहीं संबंध नाहीं.]

पूर्वींच्या विवेचनावरून नामरूपात्मक सृष्टपदार्थ नाशवंत आहेत, असें सिद्ध झालें, तथापि त्यांच्या नाशाबद्दल शोक करणें कां निरर्थक आहे, तें सांगतातः—

**अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत**
**अव्यक्तनिधनान्येव तत्र का परिदेवना　　　२८**

**भारत ! भूतानि अव्यक्तादीनि, अव्यक्तनिधनानि, व्यक्तमध्यानि एव । तत्र परिदेवना का ?**

हे भरतकुलोत्पन्ना ! भूतांचा ( नामरूपात्मक ) पदार्थांचा आरंभ अव्यक्त म्हणजे अदृश्य किंवा इंद्रियांना अगोचर असून त्यांचा शेवटही अव्यक्तच आहे. त्यांची मधली स्थिति मात्र व्यक्त म्हणजे दृश्य आहे. ( मग ) ती नाहींशी ( अव्यक्त ) झाल्याबद्दल तरी दुःख करण्याचें काय कारण आहे ?

[ या सृष्टींत कोणताही पदार्थ किंवा त्याचे आकार कांहीं काल दृश्य स्थितींत राहून पूर्वींप्रमाणे अदृश्य स्थितीला जातात. प्राणी जन्माला येण्याचे पूर्वीं अदृश्यच असतो; व कांहीं कालानंतर त्याला अदृश्य स्थितींच जाणें भाग असतें; हा नियम निसर्गसिद्ध आहे. त्याबद्दल अज्ञानी मनुष्याच्या दृष्टीनेंदेखील शोक करणें फुकट आहे, असें ठरतें. सर्व व्यक्त पदार्थ प्रथम अव्यक्त स्वरूपांतच होते, ते मध्यंतरीं कांहीं काल व्यक्त झाले, तरी त्यांचा शेवट अखेरीस अव्यक्त स्वरूपांतच व्हावयाचा आहे. हा सृष्टिनियम आहे. अर्थात् या अपरिहार्य गोष्टीबद्दल दुःख करणें व्यर्थ आहे.]

शोकाचा परिहार आत्मज्ञानानेंच होतो हें सिद्ध झालें. पण हें आत्मज्ञान सर्वांस कां प्राप्त होत नाहीं, याचें कारण सांगतातः—

**आश्चर्यवत् पश्यति कश्चिदेन—**
**माश्चर्यवद्वदति तथैव चान्यः ॥**
**आश्चर्यवच्चैनमन्यः शृणोति**
**श्रुत्वाऽप्येनं वेद न चैव कश्चित्** २९

**कश्चित् एनम् आश्चर्यवत् पश्यति । तथा एव अन्यः, आश्चर्यवत् वदति च । अन्यः एवं आश्चर्यवत् श्रृणोति । श्रुत्वा अपि च कश्चित् एनं न वेद एव ।**

कोणी ह्याला (आत्म्याला) अद्भुत समजतो. तर दुसरा कोणी हें एक अद्भुत आहे असें सांगतो (आणखी) कोणी हें अद्भुत आहे. अशाच समजुतीनें ऐकितो (याप्रमाणें आत्म्याविषयींच्या अद्भुत कल्पनेमुळें) तो श्रुत्वापि (पाहणें, सांगणें व ऐकणें) या तिन्ही उपायांनी कोणालाच समजत नाही.

[ आत्मज्ञानाविषयीं (वेदान्ताविषयीं) बऱ्याच लोकांच्या विलक्षण समजुती असल्याचें आढळन येते. कोणी म्हणतात, आत्मज्ञान हें व्यवहारास अगदीं विरुद्ध आहे. आत्मवेत्त्या (वेदान्ती) मनुष्यानें कोणताही व्यवहार करतां कामा नये. त्यानें व्यवहारापासून अलिप्त राहून, बालोन्मत्तपिशाचवत् वागलें पाहिजे. त्याचप्रमाणें गुरूनें मस्तकावर हात ठेवून, यक्षिणीच्या कांडीप्रमाणें एका क्षणांत कृतार्थ केलें, तरच आत्मज्ञान होईल, इतर कोणत्याही उपायानें आत्मज्ञान होणें शक्य नाहीं. किंबहुना, कलियुगांत खरें वेदान्तज्ञान होणें अशक्य, असेंही कित्येकांचे म्हणणें आहे. असल्या गैरसमजुतीच्या बुडाशीं आत्म्याविषयींची अद्भुत कल्पनाच कारण असावी, असें म्हणण्यास हरकत नाहीं. असल्या कल्पनाच रूढ झाल्यामुळें वेदान्ताचें सशास्त्र व सोपपत्तिक ज्ञान संपादन करण्याची प्रवृत्ति कमी होत गेली, आणि वेदान्त व व्यवहार यांची पूर्ण फारकत झाली. हेंच आमच्यांतील कर्तव्यपराङ्मुखतेचें बीज होय. वस्तुतः वेदान्त व व्यवहार यांत विरोध नसून, शुद्ध व्यवहारांत (वेदान्त) ज्ञान अवश्य आहे हें गीताशास्त्रावरूनच सिद्ध होण्यासारखें आहे. त्याच-

प्रमाणें महर्षि वेदव्यासांसारख्या महात्म्यांनीं हें वेदान्तशास्त्र सोपपत्तिक व शक्य तितकें सुबोध करून जगापुढें ठेविलें आहे. त्याचें पद्धतशीर अध्ययन केल्यास, तें इतर शास्त्रांहून फारसें गहनही वाटणार नाहीं व त्यासंबंधानें बरच्यासारखे गैरसमजही उत्पन्न होणार नाहींत.]

आतां ११ व्या श्लोकापासून येथपर्यंत झालेल्या विवेचनाचा थोडक्यांत उपसंहार करितातः—

**देही नित्यमवध्योऽयं देहे सर्वस्य भारत**
**तस्मात् सर्वाणि भूतानि न त्वं शोचितुमर्हसि** ३०

**भारत ! सर्वस्य देहे अयम् देही नित्यम् अवध्यः । तस्मात् त्वम् सर्वाणि भूतानि शोचितुम् न अर्हसि ।**

हे भारता ( अर्जुना ), सर्वांच्या देहांतील हा आत्मा कोणत्याही कालीं अवश्य ( अविनाश्य आहे ) म्हणून तुला सर्व ( कोणत्याही ) प्राण्याबद्दल शोक करणें योग्य नाही ( मग ते स्वजन असोत अथवा इतर कोणीही असोत.)

[ शोकग्रस्त मनुष्य कोणत्याही गोष्टीचा साधकबाधक प्रमाणांनीं विचार करून, निर्णय ठरविण्यास असमर्थ असतो. म्हणून तो निर्णय ठरविण्यासाठीं साधकबाधक प्रमाणांचा विचार ठरविण्यापूर्वी, त्याचा शोक नाहींसा होणें अवश्य असतें. अर्जुनाला खरें कल्याण कोणते व तें प्राप्त होण्याचा निश्चित मार्ग कोणता, हें समजावयास पाहिजे होतें. परंतु शोक नाहींसा झाल्या-खेरीज त्याला हें समजणें शक्य नाहीं. असें जाणूनच भगवंतांनीं त्याला प्रथम आत्मज्ञान सांगितलें आणि त्यावरून शोक करणें व्यर्थ आहे, असें सिद्ध करून, अर्जुनाचा शोक नाहींसा केला. यावरून गीताशास्त्रांत यापुढें जे अनेक विषय प्रसंगोपात्त आले आहेत, त्या सर्वांचे अगोदर भगवंतांनीं अर्जुनास आत्मज्ञानच कां सांगितलें, या प्रश्नाचा बरोबर उलगडा होतो.

श्लोक अकरा ते तीस अखेर आलेल्या विषयास सांख्य असें म्हणण्याची वहिवाट आहे. सांख्यशास्त्र व वेदान्तशास्त्र या दोहोंतील केवळ आत्मज्ञान बहुतांशीं एक आहे आणि म्हणूनच गेल्या वीस श्लोकांतील विषयास सांख्य

असें अंशतः म्हणतां येतें; परंतु या प्रकरणांत आलेल्या आत्मज्ञानास सांख्यच कां म्हणावें; याचें सबळ कारण दिसत नाहीं.

वस्तुतः प्रकृतीच्या वर्णनाचे बाबतींत सांख्यांचें मत विशेषेंकरून नजरेस येण्याजोगें आहे, परंतु या वीस श्लोकांच्या प्रकरणांत सांख्यशास्त्रास संमत असलेल्या प्रकृतीचा स्पष्ट उल्लेख कोठेंही आला नाहीं.

अठाविसाव्या श्लोकांत आलेला अव्यक्त शब्द प्रकृतिवाचक नाहीं. श्लोक अकरा ते अडतीस अखेर आलेल्या विषयास सांख्यनिष्ठा किंवा संन्यासनिष्ठा असेंही म्हणणें बरोबर नाहीं. कारण संन्यास व कर्मयोग या दोहोंमध्यें आत्मज्ञान एकच असलें तरी त्याचें प्रतिपादन येथें अपुरेंच कां ठेविलें याचें कारण प्रस्तुत प्रकरणांत दाखवितां येण्यासारखें नाहीं. त्याचप्रमाणें इतर सर्व विषयांच्या अगोदर गीताशास्त्राच्या दृष्टीनें अर्धवट असलेलें हें आत्मज्ञान भगवंतांनीं अर्जुनास कां सांगितलें हा प्रश्नदेखील अभुक्तच राहतो. या सर्व पक्षांचा विचार केल्यास या प्रकरणांतील आत्म्याचें वर्णन सांख्यनिष्ठेचा एक भाग म्हणून सांगितलें नसून स्वजनमरणाच्या कल्पनेनें शोकग्रस्त झालेल्या अर्जुनाचा शोक नाहींसा करण्याकरितां एक उत्कृष्ट व आवश्यक उपाय म्हणूनच भगवंतांनीं अर्जुनास आत्म्याचें अमरत्व सांगितलें आहे. या प्रकरणांत शोक करणें योग्य नाहीं अशा अर्थाचे शब्द सहा सात वेळां आले आहेत व यापुढे गीतेच्या अखेरपर्यंत वरीलप्रमाणें शोक न करण्याविषयींचा उपदेश आलेला नाहीं. यावरून शोक निवारण होण्यास अवश्य तेवढेंच आत्मज्ञान भगवंतांनीं अर्जुनास हेतुपुरस्सर उपदेशिलें आहे, असें समजणेंच पूर्ण निर्दोष व सयुक्तिक ठरतें.]

अर्जुनाच्या स्वार्थपर विचारसरणीमुळे, (बुद्धीमुळें) प्रस्तुत युद्धाचे हेतु व परिणाम ठरविण्यांत त्याच्या क्रमानें चुका होत गेल्या व शेवटीं त्याच्या बुद्धीचें शोकांत पर्यवसान झालें.

ह्या त्याच्या चुका दुरुस्त करून, त्याच्या विचारसरणींतील स्वार्थपरायणता नाहींशी करण्याकरितां, भगवंतांनीं प्रथम त्याचा शोक निवारण केला. आतां युद्धाचे परिणाम ठरविण्यांत त्याची चूक कशी झाली आहे, हें दाखवितातः—

**स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकंपितुमर्हसि**
**धर्म्याद्धि युद्धाच्छ्रेयोऽन्यत् क्षत्रियस्य न विद्यते ३१**

**अपि च, स्वधर्मम् अवेक्ष्य, विकंपितुम् न अर्हसि। हि क्षत्रियस्य धर्म्यात् युद्धात् अन्यत् श्रेयः न विद्यते।**

आतां (अपिच) स्वधर्माचा म्हणजे (वर्णधर्माचा) विचार करितां, (प्रस्तुत युद्धापासून) परावृत्त होणें तुला योग्य नाहीं. कारण क्षत्रियाला न्याय्य युद्धापेक्षां दुसरें (श्रेयः) कल्याणाचें उत्कृष्ट साधनच नाहीं.

[ अन्यायाच्या प्रतिकारार्थ व न्यायाच्या संरक्षणार्थ उपस्थित झालेलें युद्धच धर्म्य म्हणजे न्यायाचें होय. व असें युद्ध हें क्षात्रियाचें प्रधान कर्तव्य असल्यामुळें इतर श्रेयःसाधनापेक्षां हेंच त्यांना श्रेयस्कर होतें.]

असे धर्म्य युद्धांचे प्रसंग वारंवार प्राप्त होत नाहींत किंवा मुद्दाम उपस्थित करितां येत नाहींत म्हणूनः—

**यदृच्छया चोपपन्नं स्वर्गद्वारमपावृतम्**
**सुखिनः क्षत्रियाः पार्थ लभन्ते युद्धमीदृशम्** ३२

**च पार्थ, यदृच्छया अपावृतम् स्वर्गद्वारम् उपपन्नम् ईदृशम् युद्धम् सुखिनः क्षत्रियाः लभंते।**

अर्जुना (प्रयत्नावांचून) आपोआप उघडलेलें स्वर्गाचें द्वारच असें प्राप्त झालेलें हें युद्ध भाग्यवान् क्षात्रियांना लाभतें.

[ न्यायाचें संरक्षण व अन्यायांचा प्रतिकार करण्याकरितां युद्ध करण्याचे प्रसंग हेच क्षात्रधर्माच्या सार्थकतेचे द्योतक होत. ह्या धर्म्ययुद्धप्रशंसापर भगवद्वाक्यावरून न्यायाच्या सरक्षणाप्रमाणेंच अन्यायाचा प्रतिकार करणें हेंही जगाच्या धारण-पोषणास अत्यंत अवश्य आहे. असे सिद्ध होतें.]

याचप्रमाणें न्यायप्राप्त युद्ध करणें हें क्षात्रियांचें प्रधान कर्तव्य आहे म्हणूनः—

**अथ चेत्त्वमिमं धर्म्यं संग्रामं न करिष्यसि**
**ततः स्वधर्मं कीर्तिं च हित्वा पापमवाप्स्यसि** ३३

**अथ त्वम् इमम् धर्म्यम् संग्रामम् न करिष्यसि, चेत् ततः स्वधर्मम् कीर्तिम् च हित्वा पापम् अवाप्स्यसि।**

असें असतां तूं जर हें वर्णधर्मानें प्राप्त झालेलें युद्ध न करशील,

तर तूं स्वधर्म व कीर्ति यांना मुकून पाप जोडशील. धर्महानीचा परिणाम जसें पातक तसे कीर्तिहानीचे काय परिणाम होतील, तें सांगतात:—

**अकीर्तिं चापि भूतानि कथयिष्यंति तेऽव्ययाम्**
**संभावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते** ३४

**अपि च, भूतानि ते अव्ययाम् अकीर्तिम् कथयिष्यंति। अकीर्तिः संभावितस्य मरणात् अतिरिच्यते च।**

आणखी, प्राणिमात्र तुझी अक्षय अपकीर्ति गात राहतील. अपकीर्ति ही सन्मान्य मनुष्याला मरणाहूनही अधिक (दुःखदायक) असते.

युद्धापासून परावृत्त झाल्यास अपकीर्ति कशी होईल तें सांगतात:—

**भयाद्रणादुपरतं मंस्यंते त्वां महारथाः**
**येषां च त्वं बहुमतो भूत्वा यास्यसि लाघवम्** ३५

**महारथः त्वाम् भयात् रणात् उपरतम् मंस्यंते। येषाम् च त्वम् बहुमतः भूत्वा (स्थितः) लाघवम् यास्यसि।**

महारथी; ( पराक्रमी वीर ) तूं भीतीमुळें युद्धापासून पराङ्मुख झालास, असें मानतील; आणि ज्यांना तूं सन्मान्य होऊन राहिला आहेस, त्यांच्या दृष्टीनें तुला कमीपणा येईल.

**अवाच्यवादांश्च बहून् वदिष्यंति तवाहिताः**
**निंदंतस्तव सामर्थ्यं ततो दुःखतरं नु किम्** ३६

**तव अहिताः च, तव सामर्थ्यम् निंदंतः, बहून् अवाच्यवादान् वदिष्यंति। ततः दुःखतरम् किम् नु ?।**

[आधींच] तुझे शत्रु तर तुझ्या सामर्थ्याची निंदा करणारे, बोलूं नये, असें कितीतरी बोलतील. याहून अधिक दुःखकर तें काय ? [ त्यापेक्षां ]

**हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम्**
**तस्मादुत्तिष्ठ कौंतेय युद्धाय कृतनिश्चयः** ३७

**कौंतेय ! हतः त्वं स्वर्गम् वा प्राप्स्यसि, जित्वा वा महीम् भोक्ष्यसे। तस्मात् युद्धाय कृतनिश्चयः, उत्तिष्ठ।**

हे कुंतिपुत्रा ( अर्जुना ) युद्धांमध्यें मरण पावलास, तर स्वर्ग मिळविशील. किंवा (युद्धांत तुझा) जय झाला तर पृथ्वीचा (पृथ्वीच्या राज्याचा) उपभोग घेशील. म्हणून युद्ध करण्याचा निश्चय करून ऊठ (तयार हो).

[ सहाव्या श्लोकांत अर्जुनानें जयापजयाविषयीं प्रदर्शित केलेल्य संशयाचें भगवंतांनीं या श्लोकांत निराकरण केलें आहे. याप्रमाणें युद्ध करण्याप्रमाणें युद्ध न करणें व्यावहारिक नुकसान कसें होईल व पापही कसें लागेल तें दाखवून असें सुचविण्यांत आलें कीं, स्वजनांचा नाश टाळण्याकरितां आणि कुलक्षयाचें पाप न लागावें अशा हेतूनें तूं वर्णधर्माचा त्याग करीत आहेस; पण या स्वधर्मत्यागांत देखील थोड्याशा फरकानें तेच दोष तुझे हातून घडत आहेत. युद्ध न केल्यानें आप्तजनांचा नाश हें व्यावहारिक नुकसान टळेल. पण त्याऐवजीं अपकीर्तीचें माप पदरीं घ्यावें लागेल. त्याप्रमाणेच कुलक्षयाचें पाप लागलें नाहीं. तर स्वधर्मत्यागाचें पाप पत्करावें लागेल. एवंच वेळ अशी येऊन ठेपली कीं, कांहीं केलें तरी व्यावहारिक व पारलौकिक नुकसान टाळतां येणें शक्य नाही. असें जर आहे तर मग क्षात्रधर्माचा स्वीकार करणे काय वाईट ?

याप्रमाणे युद्ध करणें वा न करणं या दोन्ही बाबी जवळ जवळ सारख्याच दिसत असल्या तथापि वर्णधर्माचा त्याग किंवा कुलक्षय या दोहोंपैकीं कुलक्षयाचें पातक अधिक भयंकर दिसतें, त्याची वाट काय? तर त्याविषयीं खालीं सांगतात:—

**सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ**
**ततो युद्धाय युज्यस्व नैवं पापमवाप्स्यसि ३८**

**सुखदुःखे समे, लाभालाभौ, जयाजयौ ( समौ,) कृत्वा, युद्धाय युज्यस्व । ततः एवम् पापम् न अवाप्स्यसि ।**

सुख व दुःख, लाभ व हानि, आणि जय व अपजय, सारखेच समजून, युद्धाला प्रवृत्त हो. म्हणजे तुला असें (तुझ्या कल्पनेप्रमाणें) पाप लागणार नाहीं.

[ श्लोक ३१–३८ पर्यंतच्या आठ श्लोकांत संन्यासमार्गाच्या दृष्टीनें कर्माचा थोडक्यांत विचार केला आहे. अप्रासंगिक कर्मत्याग कितपत दोषावह आहे हें येथें दाखविलें आहे. स्वर्ग हेंच कर्माचें मुख्य फल होय हें अर्जुनाचें मत संन्यासमार्गा-प्रमाणेंच आहे. प्रस्तुत युद्ध हानिकारक आहे असें वाटल्यामुळें तो प्राप्तकर्माचा त्याग करण्यास तयार झाला आहे. सांप्रतचें युद्ध कुलक्षयकारक असल्यामुळें तें व्यावहारिक दृष्टीनें फायदेशीर नाहीं. गुरुद्रोहासारखीं घोर पातकें त्यांत करावीं लागत असल्यामुळें पारलौकिक लाभ देखील त्यापासून होणें शक्य नाहीं. उलट कौटुंबिक घात व नरकप्राप्ति असले अनर्थ मात्र पदरीं पडतील; करतां युद्धाचा नाद सोडून देऊन भिक्षेचा मार्ग स्वीकारावा लागला तरी बरें; कारण त्यापासून अनर्थ न होतां झालें तर कांहीं श्रेयच होईल असा अर्जुनाच्या म्हणण्याचा सारांश आहे. अर्जुनाच्या म्हणण्याचा सूक्ष्मदृष्ट्या विचार केल्यास त्याचा कल बहुतांशीं संन्यासमार्गाकडेच झुकलेला आहे असें दिसतें. अर्जुनानें युद्ध करण्याचे बाबतींत दोष दाखविले होते, व युद्ध सोडण्याचे बाबतींत गुण दाखविले होते, म्हणून भगवंतांनीं कर्माविषयीं बोलतांना त्याच्या उलट अर्जुनास मनांतून इष्ट वाटणाऱ्या संन्यासमार्गाच्या दृष्टीनेंच युद्ध करण्यांत गुण कोणता आहे व टाकण्यांत दोष कोणता हें दाखविलें आहे.

अर्जुन म्हणतो हें युद्ध पापकारक आहे. पण स्वधर्म म्हणून क्षत्रियांस आपलें धर्म्ययुद्ध पुण्यकारक असतें, हा संन्यासमार्गास कबूल असलेला नियम तो विसरतो. तसेंच युद्ध सोडल्यापासून जगांत आपली अपकीर्ति किती होईल हें त्याच्या लक्षांत आलें नव्हतें. या मुख्य मुख्य गोष्टी त्याच्यापुढें मांडून सुखदुःख, नफातोटा किंवा यशापयश यांविषयीं बेफिकिर राहून आपल्या वर्णाश्रमधर्मास अनुसरून असलेलें प्राप्तकर्म केल्यास तें पापकारक होत नाहीं. हा संन्यासमार्गातील कर्माविषयींचा शेवटचा नियम भगवंतांनीं अर्जुनास सांगितला आहे. या पलीकडे कर्माची उठाठेव करण्यास संन्यास-मार्ग मुळींच तयार नाहीं. कारण अध्यात्मदृष्ट्या चित्तशुद्धीपलीकडे कर्माचा कांहीं उपयोग नाहीं असें संन्यासमार्गांत मानण्यांत येतें. आणि म्हणूनच संन्यासमार्गाच्या वतीनें कर्माचें समर्थन करण्यासारख्या कांहीं गोष्टी अर्जुना-च्या नजरेस आणून देऊन, युद्ध करणें तुला जितकें दोषावह आहे असें

वाटतें, तितकेंच युद्ध टाकून कर्तव्यपराङ्मुख होणें दोषार्ह आहे, असें भगवंताचें अर्जुनास सांगणें आहे. मतलब हा कीं, ज्या संन्यासमार्गाकडे दृष्टि ठेवून प्राप्त-कर्मांतील दोष अर्जुन दाखवीत आहे, त्याच मार्गाच्या दृष्टीनें प्राप्तकर्मांत गुण कोणते आहेत हें त्याला समजून कर्म व अकर्म दोनही बाजू समतोलपणानें त्याच्यापुढें उभ्या राहाव्या आणि त्यायोगें त्याची जिज्ञासा पूर्णपणें जागृत होऊन खऱ्या श्रेयोमार्गाच्या उपदेशाकडे यापुढें त्याच्या चित्ताची नितांत एकाग्रता व्हावी. या विवेचनांतील कर्म शब्दाचा अर्थ निश्चित करण्याचे कामीं प्रस्तुत प्रकरणांतील स्वधर्म शब्दाच्या अर्थाचाच उपयोग करणें जरूर आहे.

या आठ श्लोकांच्या प्रकरणांत स्वधर्म व धर्म्य हे शब्द दोनदोनदां आलटून पालटून आलेले आहेत. त्यांपैकीं ३१ व्या श्लोकांत प्रारंभीं असलेला स्वधर्म शब्द हा श्रीकृष्णाच्या सबंध उपदेशांत प्रथमच आला आहे. तेव्हां स्वधर्म म्हणजे स्वतःचा वर्णधर्म असाच या शब्दाचा अर्थ प्रत्येक टीकाकाराला करणें भाग आहे व या अर्थाला अनुसरूनच धर्म्य किंवा स्वधर्म या शब्दांचा अर्थ लावणें ओघानेंच प्राप्त होतें. या सर्व गोष्टींवरून असें सिद्ध होतें कीं, या प्रकरणांतील उपदेशाचा कटाक्ष सर्वस्वीं वर्णधर्माकडे आहे आणि म्हणूनच अर्जुनाचा कर्मत्याग म्हणजे वर्णधर्माचा त्याग होय, आणि भगवान् श्रीकृष्णाचा कर्मोपदेश म्हणजेच मुख्यत्वें-करून वर्णधर्माचाच उपदेश होय. या धोरणानेंच भगवान् श्रीकृष्णांनीं अर्जुनाला आत्यंतिक श्रेयाचा मार्ग उपदेशिला आहे; हें प्रस्तुत प्रकरणाचा काळजीपूर्वक अभ्यास केल्यास कोणाच्याही सहज लक्षांत येईल.]

याप्रमाणें कर्म व अकर्म या दोनही मार्गांत पापपुण्याचें प्रमाण जवळ जवळ सारखेंच भरत आहे तर यांपैकीं खरा कल्याणाचा मार्ग कोणता तें आतांपर्यंत येऊन गेलेल्या विचारसरणीवरून ठरणें शक्य नाहीं. अशा स्थितींत हें करूं कां तें करूं अशी मनाची संशयग्रस्त स्थिति होणें स्वाभाविक आहे. अमृतत्व हेंच खरें मनुष्य-जन्माचें सार्थक होय हें खरें, पण अमृतत्वाकडे जाणारा या दोहोंपैकीं मार्ग कोणता तो मला समजल्यास मी तोच अवश्य स्वीकारीन ( मग तो कर्माचा असो किंवा अकर्माचा असो ). खरा कल्याणाचा मार्ग जो असेल त्याचाच भगवंतानें आपल्यास उपदेश करावा असें अर्जुनाचें पहिल्यापासूनच म्हणणें होतें. ३८ व्या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें प्राप्तकर्म केल्यास पाप लागणार नाहीं हें खरें, पण हा मार्ग

अमृतत्वाचाच आहे काय हें समजून घेण्याची उत्कट इच्छा अर्जुनास उत्पन्न झाली असली पाहिजे हें ओळखूनच भगवान् म्हणतातः—

**एषा तेऽभिहिता सांख्ये बुद्धिर्योगे त्विमां शृणु।**
**बुद्ध्या युक्तो यया पार्थ कर्मबंधं प्रहास्यसि ३९**

**पार्थ ! एषा ते सांख्ये बुद्धिः अभिहिता। तु इमाम् योगे (बुद्धिम्) शृणु। यया बुद्ध्या युक्तः कर्मबंधम् प्रहास्यसि।**

अर्जुना ! हें तुला सांख्यनिष्ठेविषयीं ज्ञान सांगितलें. आतां हें योगनिष्ठेविषयीं ( ज्ञान ) ऐक, ज्या ( ह्या ) ज्ञानाच्या योगानें तूं कर्माच्या बंधनापासून मुक्त होशील.

[ अर्जुनापुढें असलेल्या कर्मानुष्ठान व कर्मत्याग ह्या दोन मार्गांपैकीं कर्मानुष्ठान हाच मार्ग योग्य आहे असें भगवंतांनीं मागील ( श्लोक ३१ ते ३८ अखेर ) प्रकरणांत सुचविलें आहे. म्हणून या ८ श्लोकांच्या प्रकरणासच सांख्यबुद्धि असें म्हटलें तरी चालेल. कारण या प्रकरणांत केलेला कर्माचा विचार गीतेच्या एकंदर सरणीच्या मानानें बऱ्याच अंशीं वरवरचा दिसतो. ऐहिक किंवा पारलौकिक विषय-सुख मिळणें हेंच कर्माचें फल होय, ही पूर्वमीमांसेची कल्पना संन्यासमार्गीयांनीं जशीच्या तशीच मान्य केली आहे. कारण अज्ञानी अतएव ज्ञानास अनधिकारी अशा लोकांकरितांच मुख्यत्वेंकरून कर्माचा विचार करावयाचा असतो. उच्च दर्जाच्या ज्ञानी लोकांकरितां कर्माच्या विधायक स्वरूपाचा विचार करण्याचें प्रयोजनच उरत नाहीं, असा संन्यासमार्गाचा ठाम सिद्धान्त आहे. या धोरणानेंच स्वर्ग व नरक ( पाप ) कीर्ति व अपकीर्ति इत्यादि गौणफलांवरूनच कर्माचा विचार केलेला दिसतो. व अशा रीतीनें पाहिल्यास ३९ व्या श्लोकांतील 'सांख्येबुद्धि' हे शब्द या ८ श्लोकांच्या प्रकरणास अनुलक्षून असावे असें मानतां येईल.

परंतु ही कल्पना अम्मळ दुर्बोध वाटण्याचा संभव आहे. कारण या प्रकरणांतील कर्माचा विचार संन्यासमार्गाच्या दृष्टीनें केला आहे, असें दाखविण्यास 'एषा तेभिहिता सांख्ये बुद्धि' या वाक्यावांचून दुसरें स्पष्ट प्रमाण दिसत नाहीं, आणि याच वाक्यावरून अनुमान करावयाचें झाल्यास 'एषा' हें दर्शक सर्वनाम समग्र ८ ही श्लोकांस न लावतां फक्त ३८ व्या श्लोकास लावलें तरी चालण्याजोगें आहे. सुख-दुःख, लाभ, हानि किंवा यशापयश वगैरे कर्मजन्य परिणामांचे बाबतींत सम-

बुद्धि ठेविल्यास कर्म पापकारक अगर बंधनकारक होत नाही. कर्माविषयींचा हा एकच व्यापक नियम सांख्यबुद्धीच्या सदरांत समाविष्ट केला आणि त्याला अनुलक्षूनच 'एषातेभिहिता बुद्धिः सांख्ये' हें वाक्य लाविलें तर प्रकरणसंगति बसण्यास कोणताच प्रत्यवाय येत नाहीं. म्हणून ३९ व्या श्लोकांत उल्लेखिलेली सांख्य-बुद्धि म्हणजे ८ श्लोकांचें प्रकरण अगर फक्त ३८ वा श्लोक घेण्यास हरकत नाहीं, असें आमचें मत आहे. असो; कर्माच्या योग्यायोग्यतेचा निर्णय त्या कर्माच्या परिणामावरूनच होणें शक्य नसून तो कर्त्याच्या हेतूवरूनच ठरवावा लागतो. याप्रमाणें हेतूवरून कर्माची योग्यायोग्यता ठरली म्हणजे त्या कर्माच्या परिणामाचा विचार करण्याचें कारण उरत नाहीं. ज्या हेतूंवरून कर्माची योग्यायोग्यता ठरवावयाची ते हेतु मात्र निर्दोष असावे लागतात आणि हेतूंतील दोष नाहींसे होण्यास कर्त्याची बुद्धि शुद्ध व्हावी लागते. अर्जुनानें अध्याय १, श्लोक ३२ यांत प्रदर्शित केलेले प्रस्तुत युद्धाचे हेतु स्वार्थपर अतएव सदोष होते. त्यांतील दोष नाहींसे होण्यास त्याची बुद्धि प्रथम शुद्ध होणें अवश्य होतें. त्याखेरीज स्वार्थाला अनुकूल असेल तेवढेंच योग्य व प्रतिकूल असेल तें अयोग्य, असली चुकीची विचारसरणी दुरुस्त होणें शक्यच नव्हतें. म्हणून योगनिष्ठेच्या प्रारंभींच योगयुक्त बुद्धीनें कर्म केलें असतां तें बंधक होत नाहीं. सांख्यमार्गांत अजिबात कर्मच टाकावयाचें असल्यामुळें कर्माचा बंध लागत नाहीं, ही कल्पनाच असंभवनीय ठरते. कर्मच केलें नाहीं तर तें बंधक होत नाही, हें म्हणणेंच व्यर्थ आहे. पण कर्मयोगमार्गांत प्रत्यक्ष कर्माचरण अवश्य असल्यामुळें त्याचें बंधन नाहींसें कसें होईल? या विषयींचा विचार अत्यंत महत्त्वाचा ठरतो. यामुळेंच योगयुक्त बुद्धीनें आचरिलेलें कर्म बंधक होत नाहीं, असें पहिल्याच वाक्यांत भगवंतांनीं ठासून सांगितलें आहे. सांख्यनिष्ठा व योगनिष्ठा हे दोन्ही अमृतत्वाचे मार्ग आहेत. तथापि सांख्यनिष्ठेपेक्षां योगनिष्ठा अधिक प्रशस्त आहे, हें भगवंतांनींच पुढें दाखविलें आहे. त्याचप्रमाणें येथें 'योग' या शब्दानें कर्मयोगच भगवंतास अभिप्रेत आहे, हेंही पुढें स्पष्ट झालेलें आहे.]

आतां काम्यकर्मांत उत्पन्न होणाऱ्या विशेष अडचणी कर्मयोगांत उत्पन्न होत नाहींत; हें दाखविण्याकरतां भगवान् पुढें म्हणतातः—

**नेहाभिक्रमनाशोऽस्ति प्रत्यवायो न विद्यते**
**स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात् ४०**

**इह अभिक्रमनाशः न अस्ति। प्रत्यवायः न विद्यते। अस्य धर्मस्य स्वल्पम् अपि महतः भयात् त्रायते।**

ह्यांत ( कर्मयोगांत ) अनुक्रमाचा नाश नाहीं. त्याचप्रमाणें प्रत्यवाय ( सामग्रीच्या कमतरतेमुळें येणारें वैगुण्य ) ही नाहीं. ह्या धर्माचा (कर्मयोगाचा) थोडासा अंशदेखील मोठ्या भयापासून संरक्षण करितो.

[ काम्यकर्माचें फल नाशवंत असल्यामुळें, त्या फलाचा नाश म्हणजे त्या कर्माचाच नाश होय. परंतु कर्मयोगाचें फल उपभोगात्मक नसून तें अविनाशी असतें. शिवाय या मार्गांत क्रमभंगाचाही दोष नाहीं. पूर्वमीमांसेमध्यें क्रमाचें महत्त्व फारच मोठें वर्णिलें आहे. त्याप्रमाणें काम्यकर्मांच्या अनुक्रमांत चूक न होऊं देण्याविषयीं फारच काळजी घ्यावी लागते. नाहीं तर क्रमांत थोडीशी चूक झाल्यास त्या क्रमाचा सर्व नाश होतो. त्याचप्रमाणें काम्यकर्मांत साहित्य प्रधान असल्यामुळें त्यावांचून अडतें. पण निष्काम कर्मयोग साहित्याच्या कमतरतेमुळें अडून राहात नाहीं. म्हणून ह्या कर्मयोगाचें थोडेंसें आचरण घडलें तरी पारमार्थिक दृष्टीनें त्याचा मोठा उपयोग होतो.]

त्या कर्मयोगमार्गांत बुद्धि प्रधान असल्यामुळें तिचें स्वरूप सांगतातः—

**व्यवसायात्मिका बुद्धिरेकेह कुरुनंदन**
**बहुशाखा ह्यनंताश्च बुद्धयोऽव्यवसायिनाम्** ४१

**हि, कुरुनंदन! इह व्यवसायात्मिका बुद्धिः एका एव। अव्यवसायिनाम् बुद्धयः बहुशाखाः अनंताः च।**

कारण, अर्जुना ! ह्यांत ( कर्मयोगांत ) निश्चय-स्वरूप बुद्धि एकच ( असते ). चंचल स्वभावाच्या लोकांच्या बुद्धि पुष्कळ फांद्यांच्या ( तऱ्हांच्या ) व असंख्य ( असतात. )

[ कर्मयोगांत प्रधान असलेल्या बुद्धीचें स्वरूप शेवटपर्यंत एकच निश्चित म्हणजे कायम असावें लागतें. परंतु स्वार्थपर मनुष्याच्या उपभोगाच्या इच्छा नेहमीं बदलत असल्यामुळें, म्हणजे त्याच्या मनांत चैनीच्या नव्या नव्या आकांक्षा एकसारख्या उत्पन्न होत असल्यामुळें, त्याचे निश्चयही तदनुरोधानें वारंवार बदलत असतात. असली चंचल बुद्धि कर्मयोगास अत्यंत विघातक होते. यावरून स्वार्थ-

त्याग हें व्यवसायात्मक बुद्धि होण्यास मूळ असल्यामुळें, तो कर्मयोगाचा पहिला धडा होय, असें म्हणण्यास हरकत नाहीं.]

सकाम म्हणजे स्वार्थी मनुष्याची बुद्धि अव्यवसाय म्हणजे चंचल कशी होते, व परिणाम काय होतो, हें सांगतात:—

**यामिमां पुष्पितां वाचं प्रवदंत्यविपश्चितः**
**वेदवादरताः पार्थ नान्यदस्तीति वादिनः** ४२
**कामात्मानः स्वर्गपरा जन्मकर्मफलप्रदाम्**
**क्रियाविशेषबहुलां भोगैश्वर्यगतिं प्रति** ४३
**भोगैश्वर्यप्रसक्तानां तयाऽपहृतचेतसाम्**
**व्यवसायात्मिका बुद्धिः समाधौ न विधीयते** ४४

**पार्थ ! कामात्मानः, अन्यत् न अस्ति इति वादिनः च, वेदवादरताः, अविपश्चितः, जन्मकर्मफलप्रदाम्, क्रियाविशेषबहुलाम् भोगैश्वर्य-गतिम् प्रति पुष्पिताम् याम् इमाम् वाचम् प्रवदंति। तया अपहृत-चेतसाम् भोगैश्वर्यप्रसक्तानाम् बुद्धिः समाधौ व्यवसायात्मिका न विधीयते।**

अर्जुना ! ज्यांचें अंतःकरण उपभोगाच्या इच्छेनें भरून गेलें आहे, स्वर्ग हाच ज्यांचा परमपुरुषार्थ आहे व त्यावांचून दुसरा कांहीं पुरुषार्थच नाहीं, असें जे प्रतिपादन करितात, व जे वेदांतील ( विधिवाद, अनुवाद, अर्थवाद इ० ) वादांतच गढून गेलेले असतात, असे अदूर-दर्शी लोक, जन्मद्वारां कर्मफल देणारें, निरनिराळ्या क्रियांनीं भरलेलें, आणि उपभोगांसच उपयोगीं पडणाऱ्या ऐश्वर्याच्या प्राप्तीच्या वर्ण-नानें प्रफुल्लित म्हणजे मनोहर वाटणारें असें जें वैदिक वाङ्मय वर्णन (प्रतिपादन) करितात, त्या (मोहक) वाङ्मयानें ज्यांचें चित्त भुलून गेलें आहे, व उपभोगाकरतांच ज्यांना ऐश्वर्याची तळमळ लागून राहिली आहे, अशा स्वार्थपरायण लोकांची बुद्धि अंतःकरणाची साम्यावस्था संपादन करण्याच्या बाबतींत निश्चयात्मक केली जात नाहीं.

[ मनुष्याच्या अंतःकरणाला विषयोपभोगाचाच नाद लागला म्हणजे ते उप-भोग आपल्याला कसे मिळतील, व चिरकाल कसे टिकतील, ह्याचीच त्याला अहोरात्र चिंता लागते. पुढें स्वर्ग हें अक्षय्य सुखोपभोग प्राप्त होण्याचें स्थान आहे अशी समजूत झाल्यावर तो केवळ स्वर्गसुखाकरितांच प्रयत्न करूं लागतो. मग स्वर्गप्राप्तीवांचून दुसरी इतिकर्तव्यता नाहीं, अशी त्याची दृढ भावना होते. त्यामुळें तद्विषयक गोष्टींचा ऊहापोह करण्यांतच तो अहोरात्र गढून जातो. आपला जन्म, स्वर्गादि देवलोकांत व्हावा एवढीच त्यांची महत्त्वाकांक्षा असते. ती प्राप्त करून घेण्यासाठीं कितीही श्रम करण्यास तो मागें घेत नाहीं आणि ऐश्वर्योपभोगाचीं चटकदार वर्णनें ज्यांत आहेत, तेंच वाङ्मय त्याला मनोहर व रमणीय वाटूं लागतें. अशा रीतीनें केवळ चैनबाजीचे गुलाम बनलेल्या अदूरदर्शी मनुष्याच्या बुद्धींत कोणत्याही गोष्टीचा शांतपणें विचार करण्याचें सामर्थ्य असत नाहीं.]

कर्मयोगाला विघातक असलेल्या अव्यवसायी ( चंचल ) बुद्धीचा याप्रमाणें निषेध करून, आतां कर्मयोगांत अवश्य असलेल्या व्यवसायात्मक बुद्धीचें स्वरूप सांगतातः—

**त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन**
**निर्द्वंद्वो नित्यसत्त्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान्** ४५

**अर्जुन ! त्रैगुण्यविषयाः वेदाः, निस्त्रैगुण्यः निर्द्वंद्वः नित्यसत्त्वस्थः, निर्योगक्षेमः, आत्मवान् भव।**

अर्जुना ! सात्त्विक, राजस व तामस उपभोगांचेंच मुख्यत्वेंकरून वेदांत वर्णन आहे. (परंतु) तूं निस्त्रैगुण्य, ( त्रिगुणजन्य उपभोग-वासनांपासून अलिप्त ) निर्द्वंद्व, ( सुख-दुःख इत्यादि द्वंद्वविरहित ) नेहमीं समत्व, धृती व उत्साह इत्यादि सात्त्विक गुणांनीं संपन्न, योग-क्षेमाबद्दल निश्चिंत व आत्मज्ञानवान् हो.

[ वेदांतील भोगतृष्णा वाढविणाऱ्या अर्थवादात्मक वर्णनांच्या नादीं लागणें, कर्मयोगदृष्ट्या श्रेयस्कर नाहीं. म्हणून ज्याला आपली बुद्धि व्यवसायात्मक करावयाची असेल, म्हणजे ज्याला स्थितप्रज्ञ व्हावयाचें असेल, त्यानें सात्त्विक, राजस व तामस या तीनही प्रकारच्या उपभोगवासना मनांतून नाहींशा करून, हेतु शुद्ध ठेविला पाहिजे. शीत, उष्ण, सुख, दुःख इत्यादि परस्परविरुद्ध गोष्टी किंवा परस्पर-

विरोधी मनोविकार हीं द्वंद्वें होत. हीं द्वंद्वें अपरिहार्य असतात. तथापि तितिक्षेच्या योगानें त्यांचा बुद्धीवर परिणाम होऊं देतां कामा नये. म्हणजे बुद्धि निर्विकार व स्थिर राहिली पाहिजे. धृति, उत्साह, समत्व इत्यादि सात्त्विक वृत्ति अढळ असल्या पाहिजेत. संपादन व संरक्षणाविषयीं निश्चित असलें पाहिजे, म्हणजे बुद्धि प्रसन्न ठेविली पाहिजे आणि ज्ञानविज्ञानसंपन्न झालें पाहिजे. व्यवसायात्मक बुद्धि म्हणजे वरील स्वरूपाची स्थितप्रज्ञा हें कर्मयोगाचें मूलतत्त्व होय असें ह्या श्लोकांत भगवंतांनीं विधान ( अनुमान पद्धतीप्रमाणें प्रतिज्ञा ) केलें आहे.]

वेदांतील वर्णनाप्रमाणें वैदिक काम्यकर्मापासून प्राप्त होणाऱ्या स्वर्गादि लोकांविषयींची इच्छा कशी नष्ट होते, तें सांगतातः—

**यावानर्थ उदपाने सर्वतः संप्लुतोदके**
**तावान्सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानतः　　४६**

**सर्वतः संप्लुतोदके, उदपाने यावान् अर्थः, तावान् ब्राह्मणस्य विजानतः सर्वेषु वेदेषु ( अर्थः ).**

सर्वत्र जल परिपूर्ण ( प्राप्त होणें सुलभ ) झालें असतां, विहिरीविषयीं जितकी आवश्यकता असते, तितकीच ज्ञानविज्ञानसंपन्नाला ( स्थितप्रज्ञाला ) सर्व वेदांविषयीं ( वेदांत सांगितलेल्या स्वर्गादिलोकांविषयीं ) असते.

[ ब्राह्मण म्हणजे ब्रह्मज्ञानी व विजानतः म्हणजे विज्ञानसंपन्न अशा अर्थानें येथें 'ब्राह्मणस्य विजानतः' हीं पदें आलेलीं आहेत. कर्मयोगापासून प्राप्त होणारें अमृतत्व अत्यंत श्रेष्ठ असल्यामुळें, ह्याच्यापेक्षां कमी प्रतीच्या स्वर्गादि फलांची स्थितप्रज्ञाला आवश्यकताच उरत नाहीं. ४५ व्या श्लोकांत केलेल्या विधानांतील "आत्मवान्" या पदाचें येथें स्पष्टीकरण करून ज्ञानविज्ञानाच्या योगानेंच उपभोगवासना कशी नष्ट होते हें दाखविलें आहे.]

यावरून वैदिक कर्मांचीं फलें जरी त्याज्य ठरतात; तथापि त्याबरोबरच सर्व कर्में त्याज्य ठरत नाहींत असें सांगतातः—

**कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन**
**मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते संगोऽस्त्वकर्मणि　　४७**

**कर्मणि एव ते अधिकारः । फलेषु कदाचन मा । कर्मफलहेतुः मा भूः । अकर्मणि ते संगः मा अस्तु ।**

( अर्जुना ) कर्म करण्याविषयींच तुझा अधिकार आहे. फला-विषयीं केव्हांही नाहीं. कर्माच्या फलाचा हेतु ठेवणारा तूं होऊं नको. ( आणि ) कर्म न करण्याविषयीं आग्रह धरूं नको.

[ कर्म करणें हा मनुष्याचा स्वाभाविक धर्म असल्यामुळें, प्रत्येकानें आपल्या योग्यतेनुसार प्राप्तकर्म करीत राहणें, हें त्याचें कर्तव्यच ठरतें. तथापि कर्माचें फल मिळणें हें मनुष्याच्या हातचें नसतें. म्हणून आपण करीत असलेल्या कर्माचें फल आपल्याला मिळावें, असा हेतु धरणें अनुचित होय.

याप्रमाणें कर्म करीत राहणें अवश्य ठरत असल्यामुळें, त्याचा हट्टानें त्याग करूं पाहणें वेडेपणाचें आहे. कर्माच्या फलांकडे दृष्टि ठेवून, तें कर्म करण्यास प्रवृत्त होणें किंवा त्यापासून पराङ्मुख होणें अनुचित होय. कर्मफलाची आशा नष्ट झाल्यानंतर योगक्षेमाची ( संपादन-संरक्षणाची ) तळमळ अंतःकरणांत शिल्लक राहावयाची नाही. ]

सुखदुःखात्मक फलांची पर्वा सोडून, कर्मे कशीं करावयाचीं, तें सांगतातः—

**योगस्थः कुरु कर्माणि संगं त्यक्त्वा धनंजय**
**सिध्द्यसिध्द्योः समो भूत्वा समत्वं योग उच्यते ४८**

**धनंजय ! संगम् त्यक्त्वा, सिद्ध्यसिद्ध्योः समः भूत्वा योगस्थः कर्माणि कुरु । समत्वम् योगः उच्यते ।**

अर्जुना ! ( कर्म न करण्याचा ) आग्रह सोडून, यशापयशाविषयीं समबुद्धि होऊन, (म्हणजे) योगयुक्त होऊन, कर्मे कर. (कारण) समत्वालाच योग म्हणतात.

[ कर्तव्यकर्म करीत असतां, कर्त्याच्या अंतःकरणांत आपल्याला अपयश येईल कीं काय, अशी धास्ती असतां कामा नये. त्याचप्रमाणें यश मिळणारच असा फाजील विश्वासही असतां कामा नये. कारण, त्यामुळें कर्तव्याविषयीं बेसावधपणा उत्पन्न होण्याचा संभव असतो. म्हणून कोणत्याही प्रकारचा दुराग्रह न धरतां धैर्यानें, उत्साहानें व समबुद्धीनें कर्तव्यास तत्पर असणें, म्हणजेच योग-युक्त असणें होय. समत्व हें योगाचें संक्षिप्त लक्षण आहे. ४५ व्या श्लोकांत

केलेल्या विधानांतील "नित्यसत्त्वस्थ" ह्या पदाचें येथें स्पष्टीकरण केलें आहे. शिवाय या श्लोकांत 'संगं त्यक्त्वा' अशीं पदें मोघम आलीं आहेत. त्यावरून असें सिद्ध होतें कीं, कर्म न करण्याविषयींचा आग्रह जसा त्याज्य आहे, त्याप्रमाणेंच मी अमुक एक प्रकारचें कर्म करीन असा आग्रह देखील त्याज्यच समजला पाहिजे. कर्माच्या व्यावहारिक मोबदल्याची कल्पना सोडणें जितकें सोपें आहे, त्यापेक्षां एखादें काम करीत असतां केवळ तें काम करण्यामुळें बाह्यतः दिसून येणारा श्रेष्ठकनिष्ठ भाव अपरिहार्य असतो. आणि त्यामुळें मनुष्याचे मनांत मी अमुक प्रकारचें कर्म करीन असा आग्रह उत्पन्न होतो. लग्नसमारंभासारख्या प्रसंगीं अत्तरगुलाबाचें काम करण्याऐवजी झाडलोट करण्याचा प्रसंग आल्यास मनुष्याला असल्या कनिष्ठ प्रकारचें काम करणें जिवावर येतें. अशा वेळीं अत्तरगुलाबाच्या कामासारखें काम करण्याविषयींचा जो आग्रह त्यालाच कर्मसंग असें म्हणतात. नैतिकदृष्ट्या व बुद्धियोगदृष्ट्या कर्मफलाप्रमाणें हा कर्मसंगदेखील त्याज्यच ठरतो. हें दर्शविण्याकरितांच भगवंतांनीं 'संगं त्यक्त्वा' हीं मोघम पदें घातलीं आहेत. याचप्रमाणें यशापयशाविषयीं समबुद्धि ठेवण्यास सांगितलें आहे. या श्लोकांत सिद्धि व असिद्धि अशीं दोनही पदें आलीं असलीं तथापि मनुष्याला असिद्धीचें म्हणजे अपयशाचें नेहमीं फारच भय वाटतें. म्हणून खऱ्या योगयुक्त बुद्धीच्या माणसानें अपयशाचे चटके सोसण्यास शांतचित्तानें सादर झालें पाहिजे असा भगवंतांचा अभिप्राय आहे. म्हणजे येथें एकाहून एक उच्च अशा समत्वाच्या तीन पाहिऱ्या दाखविल्या आहेत त्या अशाः—एक कर्माचें फल सोडणें. दुसरें कर्माच्या स्वरूपाविषयींचा आग्रह ( संग ) टाकणें व तिसरी सिद्धि किंवा असिद्धि, म्हणजे यश किंवा अपयश यांविषयीं विकारवश न होणें. इतक्या गोष्टी झाल्या म्हणजे बुद्धीचें पूर्ण समत्व झालें असें समजावें. या अभिप्रायानेंच समत्व म्हणजे 'योग' असें सांगून योगाचें लक्षण सांगितलें आहे. लोकमान्य टिळकांनीं 'कर्मण्येवाधिकारस्ते' या एकाच श्लोकांत, कर्मयोगाची चतुःसूत्री बसविली आहे. परंतु त्यापेक्षां श्लोक ४५ ते ४८ अखेर कर्मयोगसिद्धान्त पुरा झाला असल्यामुळें, या चार श्लोकांत कर्मयोगशास्त्राची चतुःसूत्री सिद्ध करणें अधिक सयुक्तिक ठरतें. चतुःसूत्रीची कल्पना ब्रह्मसूत्रांतील आहे. वेदान्तशास्त्रांतील मुख्य किंवा जीवन सिद्धान्त या उत्तरमीमांसेच्या पहिल्या चार सूत्रांत साधिला आहे. म्हणून एकाच सिद्धान्ताशीं संबद्ध असलेल्या या चार सूत्रांस मिळून चतुःसूत्री असें म्हणण्याची वहिवाट आहे. या चतुःसूत्री-

सारखीच चतुःसूत्री आम्हीं वर म्हटल्याप्रमाणें या चार श्लोकांत दिसून येते. ४५ व्या श्लोकांत बुद्धियोगाचें तात्त्विक स्वरूप सांगून, त्याचें फल पूर्णकामत्व किंवा कृतार्थत्व हें ४६ व्या श्लोकांत सांगितलें आहे. पुढील दोन श्लोकांत कर्माचें तत्त्व सांगून बुद्धियोगाशीं त्याच्या संयोगाची आवश्यकता दाखवून कर्मयोगशास्त्रांतील हा जीवनसिद्धान्त पुरा केला आहे. यावरून या चार श्लोकांच्या समुच्चयालाच 'चतुःसूत्री' म्हणणें अधिक प्रशस्त होय.]

अशा प्रकारच्या योगयुक्त बुद्धीचें कर्माच्या तारतम्यांत किती महत्त्व आहे, हे सांगतातः—

**दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनंजय**
**बुद्धौ शरणमन्विच्छ कृपणाः फलहेतवः** ४९

**धनंजय ! हि बुद्धियोगात् कर्म दूरेण अवरम्। बुद्धौ शरणम् अन्विच्छ। फलहेतवः कृपणाः।**

अर्जुना ! ज्याअर्थीं बुद्धियोगापेक्षां ( केवळ ) कर्म अगदींच कनिष्ठ आहे ( त्याअर्थीं ) बुद्धीच्या ठिकाणीं आश्रय शोध ( ग्रहण कर ). फलविषयक हेतु ( कृपण ) दुर्बल आहेत.

[ कर्माचें तारतम्य, उत्तम मध्यम व कनिष्ठ अशा तीन प्रकारांनीं ठरवितां येतें. अज्ञ मनुष्य कर्माच्या बाह्य स्वरूपावरूनच त्याचा बरेवाईटपणा ठरवितो. पण ही रीति कनिष्ठ होय. सामान्य मनुष्य कर्माचें फल म्हणजे परिणाम पाहून त्यावरून कर्माचे तारतम्य लावितो. ही रीति प्रसंगविशेषीं उपयुक्त असली, तरी निर्णयाचे बाबतींत नेहमीं तिजवरच अवलंबून राहतां येत नाहीं. म्हणून तीही मध्यमच ठरते. ज्ञानी (विचारी) मनुष्य मात्र हेतूच्या शुद्धतेवरूनच कर्माची योग्यता ठरवीत असतो. हीच रीति निर्दोष व उत्तम होय; असें पूर्ण विचाराअंती मान्य करावें लागतें. ह्यावरून शुद्ध हेतु हीच कर्माची खरी कसोटी ठरते. आणि बुद्धियोगावांचून हेतु नितांत शुद्ध होणें शक्यच नसल्यामुळें, कर्माचें तारतम्य ठरविण्याकरितां, अखेरीस योगयुक्त बुद्धीलाच शरण जाणें भाग पडतें.]

कर्माचें तारतम्य ठरविण्याच्या बाबतींत बुद्धियोगासच इतकें महत्त्व कां येतें, तें सांगतातः—

**बुद्धियुक्तो जहातीह उभे सुकृतदुष्कृते**
**तस्माद्योगाय युज्यस्व योगः कर्मसु कौशलम्** ५०

**इह बुद्धियुक्तः सुकृतदुष्कृते उभे जहाति । तस्मात् योगाय युज्यस्व । योगः कर्मसु कौशलम् ।**

ह्या कर्मयोगमार्गात स्थितप्रज्ञ पुरुष पुण्य व पाप ह्या दोहोंचाही त्याग करतो. ( ह्या दोहोंपासूनही अलिप्त असतो ) म्हणून तूं बुद्धियोग संपादन करण्यास तयार हो. ( कारण ) बुद्धियोग (हेंच) कर्मातील कौशल्य ( खुबी ) आहे.

[ कोणतेंही कर्म घडलें, तरी त्याचा कांहीं तरी परिणाम (फल) हा झालाच पाहिजे. हा सृष्टिनियम आहे आणि कर्माचें बरेवाईट फल कर्त्याला मिळावें, असें न्यायतःच प्राप्त होतें. 'नाभुक्तं क्षीयते कर्म' 'कर्मणा बध्यते जंतुः' इत्यादि वचनांवरून, कर्माचे बरेवाईट परिणाम म्हणजे पापपुण्य कर्त्याला भोगल्यावांचून सुटका नाहीं असें ठरतें. हाच कर्मबंध होय. परंतु स्थितप्रज्ञ कर्मयोगी पुरुष ह्या कर्मबंधानें बद्ध होत नाहीं. कारण त्याचे हेतु नितांत शुद्ध असल्यामुळें त्या हेतूचा कर्माच्या फलांशीं कोणत्याही प्रकारें संबंध नसतो. म्हणून बुद्धियोग हीं कर्मबंधांतून सुटण्याची उत्तम युक्ति होय. सुकृत व दुष्कृत हीं सुखदुःखांचीं अदृष्ट कारणें असतात. योगयुक्त पुरुष ह्या दोनही परस्परविरुद्ध कारणांचा त्याग करितो. असें सांगून येथें ४५ व्या श्लोकांतील 'निर्द्वंद्व' या पदाचें महत्व दर्शविलें आहे ]

कर्माचें बंधकत्व नाहींसें करण्याचें सामर्थ्य बुद्धियोगांत असण्याचें कारण सांगतातः—

**कर्मजं बुद्धियुक्ता हि फलं त्यक्त्वा मनीषिणः**
**जन्मबंधविनिर्मुक्ताः पदं गच्छन्त्यनामयम्** ५१

**हि, मनीषिणः बुद्धियुक्ताः कर्मजम् फलम् त्यक्त्वा जन्मबंधविनिर्मुक्ताः, अनामयम् पदम् गच्छंति ।**

कारण मनीषी ( ज्ञानी ) स्थितप्रज्ञ कर्माच्या फलाचा ( उपभोगवासनांचा ) त्याग केल्यामुळें जन्माच्या ( जन्ममरणाच्या ) बंधनांतून मुक्त झालेले ( असे ) निर्विकार ( ब्रह्म ) पदाला ( अमृतत्वाला ) जातात.

[ याप्रमाणें ज्ञानानें शुद्ध झालेली बुद्धि, कर्माचा बंध नाहींसा करण्यास समर्थ होते. म्हणून कर्माचें तारतम्य ठरविण्यांत बुद्धियोगासच अग्रस्थान प्राप्त होतें.

एवढ्याकरितां भगवंतांनीं ४८ व्या श्लोकांत योगयुक्त होऊन, कर्मे करण्यास अर्जुनास सांगितलें आहे. ४५ व्या श्लोकांतील निस्त्रैगुण्य व आत्मवान् ( वासना-त्याग व ज्ञानविज्ञान ) यांचा कार्यकारणभाव येथेंही दर्शविला आहे. येथवर ४५ व्या श्लोकांतील पांचही अंशांचें स्पष्टीकरण केलें आहे.]

आतां तुझी बुद्धि स्थिर केव्हां व कशी होईल तें सांगतातः—

**यदा ते मोहकलिलं बुद्धिर्व्यतितरिष्यति**
**तदा गंतासि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रुतस्य च** ५२

**यदा ते बुद्धिः मोहकलिलम् व्यतितरिष्यति । तदा श्रोतव्यस्य श्रुतस्य च निर्वेदम् गंतासि ।**

( अर्जुना ) जेव्हां तुझी बुद्धि मोह–( सुखदुःखापासून उत्पन्न होणारी भुरळ ) रूप दोषांतून पार पडेल, तेव्हां ऐकावयाच्या व ऐकलेल्याविषयीं ( कर्मफलांविषयीं म्हणजे त्यांच्या उपभोगाविषयीं ) वैराग्यास तूं प्राप्त होशील.

[ विचारी मनुष्याचें मन ज्याप्रमाणें दुःखानें बावरत नाहीं, त्याचप्रमाणें हर्षानें ही भुलत नाहीं. मनाचा हा दोष नाहींसा झाला म्हणजे बुद्धींतील मोह नाहींसा होऊन ती वैराग्यसंपन्न होते. ज्ञानाच्या योगानें जेव्हां तूं आपला मोह नाहींसा करशील तेव्हांच तूं विषयोपभोगापासून परावृत्त होशील.]

बुद्धीच्या स्थैर्याची योगनिष्ठेत किती आवश्यकता आहे तें सांगतातः—

**श्रुतिविप्रतिपन्ना ते यदा स्थास्यति निश्चला**
**समाधावचला बुद्धिस्तदा योगमवाप्स्यसि** ५३

**श्रुतिविप्रतिपन्ना ते बुद्धिः यदा निश्चला समाधौ अचला स्थास्यति । तदा योगम् अवाप्स्यसि ।**

( कर्मफलांच्या ) श्रवणामुळें चंचल झालेली तुझी बुद्धि स्थिर होऊन जेव्हां साम्यावस्थेंत कायम राहील तेव्हां तुला बुद्धियोग प्राप्त होईल.

[ उपभोगतृष्णा नाहींशी झाल्यावांचून अंतःकरण स्थिर होऊन, समत्व प्राप्त होणें शक्य नाहीं. आणि अशा समाधानवृत्तीशिवाय बुद्धियोगाची पूर्णता होत नाहीं. बुद्धींतील उपभोगाविषयींचा मोह नाहींसा होऊन ती वैराग्यसंपन्न झाल्या-वरच ( खरा स्वार्थत्याग झाल्यावरच ) पूर्ण योगयुक्त होते.]

याप्रमाणें बुद्धियोग प्राप्त झालेल्या स्थितप्रज्ञाचीं लक्षणें कोणतीं हें अर्जुन विचारितोः—

**अर्जुन उवाच**

**स्थितप्रज्ञस्य का भाषा समाधिस्थस्य केशव**
**स्थितधीः किं प्रभाषेत किमासीत व्रजेत किम्** ५४

**केशव ! समाधिस्थस्य स्थितप्रज्ञस्य का भाषा ? स्थितधीः किम् प्रभाषेत ? किम् आसीत ? किम् व्रजेत ? ।**

अर्जुन म्हणाला, हे केशवा ! समाधिस्थितींत ( साम्यावस्थेंत ) असलेल्या स्थितप्रज्ञाला काय म्हणतात ? ( स्थितप्रज्ञ कोणाला म्हणतात ?) स्थितप्रज्ञ कसें बोलतो ? कसा राहातो आणि कसा वागतो ?

स्थितप्रज्ञाचीं लक्षणें समजून घेण्याकरितां अर्जुनानें वरील चार प्रश्न विचारिले आहेत. त्यांचीं उत्तरें भगवान् अनुक्रमानें पुढें देत आहेत.

**श्रीभगवानुवाच**

**प्रजहाति यदा कामान् सर्वान् पार्थ मनोगतान्**
**आत्मन्येवात्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते** ५५

**पार्थ ! यदा मनोगतान् सर्वान् कामान् प्रजहाति, आत्मनि आत्मना एव तुष्टः, तदा स्थितप्रज्ञः उच्यते ।**

श्रीभगवान् म्हणाले. अर्जुना ! मनुष्य जेव्हां मनांतील सर्व विषयवासना पूर्णपणें टाकतो, व स्वतः विषयीं मनानेंच संतुष्ट असतो, तेव्हां ( त्याला ) स्थितप्रज्ञ म्हणतात.

**दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः**
**वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते** ५६

**दुःखेषु अनुद्विग्नमनाः, सुखेषु विगतस्पृहः, वीतरागभयक्रोधः मुनिः स्थितधीः उच्यते ।**

( त्याचप्रमाणें ) ज्याचें मन दुःखाविषयीं निर्भय, (व) सुखाविषयीं निस्पृह असतें, ( म्हणजे ) ज्याच्या मनांतून अभिलाष, भीति व

क्रोध नाहींसे झाले आहेत, अशा विवेकी मनुष्याला स्थितप्रज्ञ म्हणतात.

[ हें ५४ व्या श्लोकांतील अर्जुनाच्या पहिल्या प्रश्नाचें उत्तर आहे.]

**यः सर्वत्रानभिस्नेहस्तत्तत्प्राप्य शुभाशुभम्**
**नाभिनंदति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता** ५७

**यः सर्वत्र अनभिस्नेहः, तत् तत् शुभाशुभम् प्राप्य, न अभिनंदति, न द्वेष्टि, तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ।**

जो सर्व बाबतींत निर्लोभ राहून, कोणताही बरावाईट प्रसंग प्राप्त झाला तरी अनुक्रमें अभिनंदन ( प्रशंसा ) किंवा तिरस्कार करीत नाहीं, त्याची बुद्धि स्थिर झाली. ( तोच स्थितप्रज्ञ झाला.)

[ जो मनुष्य कसल्याही सुखदुःखाच्या प्रसंगीं स्तुति किंवा निंदा करीत नाहीं व ते सर्व प्रसंग शांत चित्तानें सहन करतो तो स्थितप्रज्ञ होय. त्याच्या भाषेत स्वार्थमूलक स्तुति किंवा निंदा नसते. या श्लोकांत अर्जुनाच्या दुसऱ्या प्रश्नाचें उत्तर आलें आहे.]

**यदा संहरते चायं कूर्मोंगानीव सर्वशः**
**इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता** ५८

**अयम् कूर्मः अंगानि इव, सर्वशः इंद्रियाणि इंद्रियार्थेभ्यः यदा संहरते च, तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ।**

हा ( स्थितप्रज्ञ पुरुष ) कांसवाच्या अवयवांप्रमाणें आपलीं सर्व इंद्रियें त्यांच्या त्यांच्या अर्थांपासून ( विषयांपासून ) जेव्हां आवरून घेतो, तेव्हां त्याची बुद्धि स्थिर झाली. ( असें म्हणावें.)

विषय व इंद्रियें यांचा संयोग तोडल्यानेंच इंद्रिय—निग्रह पूर्ण होत नाहीं. तो पूर्ण होण्यास कशाची आवश्यकता आहे तें सांगतात:—

**विषया विनिवर्तंते निराहारस्य देहिनः**
**रसवर्जं रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते** ५९

**निराहारस्य देहिनः विषयाः रसवर्जम् विनिवर्तन्ते । परम् दृष्ट्वा अस्य रसः अपि निवर्तते ।**

केवळ विषयसेवन बंद करणाऱ्या मनुष्याचे विषय आवड खेरीज-करून, निवृत्त होतात. (विषयसेवन प्रत्यक्ष बंद होतें. पण तेणेंकरून मनांतील विषयोपभोगाची आवड नष्ट होत नाहीं.) ( परंतु ) आत्म-दर्शनानें, ही आवड देखील नष्ट होते.

[ अंतःकरण निर्मल होणें, हीच इंद्रियनिग्रहाची पूर्णावस्था होय. ह्यावरून इंद्रियनिग्रहाच्या पूर्णतेस आत्मज्ञान आवश्यक आहे, असेंही सिद्ध होतें.]

आत्मज्ञानाखेरीज नुसता इंद्रियनिग्रह अपुरा कसा असतो, तें सांगतातः—

**यततो ह्यपि कौंतेय पुरुषस्य विपश्चितः**
**इंद्रियाणि प्रमाथीनि हरंति प्रसभं मनः** ६०

**कौंतेय! विपश्चितः पुरुषस्य यततः अपि हि प्रमाथीनि इंद्रियाणि मनः प्रसभम् हरंति।**

अर्जुना! विचारी पुरुष ( इंद्रियांचा विषयांशीं संयोग न होऊं देण्याविषयीं ) कितीही प्रयत्न करीत असला तरी, हीं उच्छृंखल इंद्रियें त्याचें मन जबरदस्तीनें हरण करितात. ( मोहित करितात.) म्हणूनः -

**तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः**
**वशे हि यस्येंद्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता** ६१

**युक्तः तानि सर्वाणि संयम्य, मत्परः आसीत। हि इंद्रियाणि यस्य वशे, तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता।**

स्थितप्रज्ञानें त्या सर्व इंद्रियांचें नियमन करून, मत्परायण ( ईश्वरपरायण ) असावें. कारण इंद्रियें ज्यांच्या ताब्यांत आलीं, त्याचीच प्रज्ञा प्रतिष्ठित झाली. ( तोच स्थितप्रज्ञ झाला.)

[ ५८ व्या श्लोकापासून येथपर्यंत अर्जुनास तिसऱ्या प्रश्नाचें उत्तर सांगितलं आहे.]

५९ व्या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें ( रस ) आवड नष्ट झाली नाहीं, तर उपभोगाची चिंताही नाहींशी होत नाहीं. पण ही चिंता किती विघातक आहे हें सांगतातः—

**ध्यायतो विषयान्पुंसः संगस्तेषूपजायते**
**संगात्संजायते कामः कामात्क्रोधोभिजायते** ६२
**क्रोधाद्भवति संमोहस्संमोहात्स्मृतिविभ्रमः**
**स्मृतिभ्रंशाद्बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति** ६३

**विषयान् ध्यायतः पुंसः तेषु संगः उपजायते। संगात् कामः संजायते। कामात् क्रोधः अभिजायते। क्रोधात् संमोहः भवति। संमोहात् स्मृतिविभ्रमः (भवति)। स्मृतिभ्रंशात् बुद्धिनाशः (भवति)। बुद्धिनाशात् प्रणश्यति।**

विषयांचें चिंतन करणाऱ्या पुरुषाला त्या विषयांच्या उपभोगा विषयीं आसक्ति उत्पन्न होते. आसक्तीपासून तृष्णा उत्पन्न होते तृष्णेमुळें (तीस प्रतिबंध करणाराविषयीं) क्रोध उत्पन्न होतो क्रोधामुळें अविवेक (भुरळ) उत्पन्न होतो, अविवेकामुळें (कर्तव्या विषयीं) स्मृतिभ्रंश (विस्मरण) होतो; स्मृतिभ्रंशामुळें निश्चयात्मक बुद्धि नष्ट होते; आणि बुद्धि नष्ट झाली म्हणजे सर्वनाश होतो.

[ विषयांच्या नुसत्या चिंतनामुळें शेवटीं किती भयंकर अधःपात होतो हें येथें प्रसंगानुसार दाखविलें आहे.]

ह्या सर्व नाशाच्या कारणपरंपरेंतील काम व क्रोध हे प्रमुख दोष अगोदर नाहींसे करण्याची आवश्यकता सांगतातः—

**रागद्वेषवियुक्तैस्तु विषयानिंद्रियैश्चरन्**
**आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति** ६४
**प्रसादे सर्वदुःखानां हानिरस्योपजायते**
**प्रसन्नचेतसो ह्याशु बुद्धिः पर्यवतिष्ठते** ६५

**रागद्वेषवियुक्तैः तु, आत्मवश्यैः इंद्रियैः विषयान् चरन् विधेयात्मा प्रसादम् अधिगच्छति। प्रसादे अस्य सर्वदुःखानाम् हानिः उपजायते। हि, प्रसन्नचेतसः बुद्धिः आशु पर्यवतिष्ठते।**

रागद्वेषरहित व पूर्णपणें स्वाधीन अशा इंद्रियांनीं विषयांत वावरणाऱ्या (व्यवहार करणाऱ्या) शुद्ध अंतःकरणाच्या पुरुषाला प्रसाद

( समाधान ) प्राप्त होतो. ( ह्याप्रमाणें ) समाधान प्राप्त झाल्यावर त्याच्या सर्व दुःखांचा नाश होतो. कारण प्रसन्नचित्त-पुरुषाची बुद्धि तत्काळ सर्व बाजूंनीं स्थिर ( योगयुक्त ) होते.

[ वरील दोन श्लोकांत अर्जुनाच्या चौथ्या प्रश्नाचें उत्तर दिलें आहे.]

येथपर्यंतच अर्जुनाच्या चारी प्रश्नांचीं उत्तरें देऊन त्यांचें तात्पर्य थोडक्यांत व्यतिरेकानें सांगतातः—

**नास्ति बुद्धिरयुक्तस्य नचायुक्तस्य भावना**
**नचाभावयतः शांतिरशांतस्य कुतः सुखम्** ६६

**अयुक्तस्य बुद्धिः न अस्ति। अयुक्तस्य भावना च न । अभावयतः च शांतिः न । अशांतस्य सुखम् कुतः ।**

योगरहित पुरुषाला निश्चित बुद्धि नसते व त्याच्या अंतःकरणावर भावना म्हणजे आत्मज्ञानाचा संस्कार होत नाहीं. अशा भावनारहित ( आत्मज्ञान-संस्कार-रहित ) पुरुषाला शांति मिळत नाहीं. आणि ज्याला शांति नाहीं, त्याला सुख कोठून मिळणार ?

[ या श्लोकांतील 'अयुक्त' शब्दाचा अर्थ मागील दोन श्लोकांतील वर्णनाच्या अनुरोधानेंच करावयास पाहिजे. याप्रमाणें पाहिल्यास इंद्रियनिग्रह व मनोनिग्रह म्हणजे आत्मसंयमन हाच अर्थ 'योग' शब्दानें विवक्षित आहे. योगरहित म्हणजे आत्मसंयमनरहित अशा अर्थानेंच 'अयुक्त' शब्द या श्लोकांत आला आहे. आत्मसंयमन न केल्यानें योगनिष्ठेस मूलभूत असलेली व्यवसायात्मक बुद्धि प्राप्त होत नाहीं. त्याचप्रमाणें मनुष्यानें कितीही अभ्यास केला, तथापि त्याच्या बुद्धीवर ज्ञानाचा जो संस्कार व्हावयाचा त्या संस्काराला देखील आत्मसंयमनाची अत्यंत जरूरी आहे. अभ्यासी मनुष्य इंद्रियनिग्रही नसेल तर त्याच्या मनावर विद्येचा संस्कार होत नाहीं. असा बुद्धीनें असंस्कृत पण बाह्यतः मोठा विद्वान् मनुष्य व्यवहारांत व परमार्थांत निरुपयोगी ठरतो. यावरून आत्मसंयमनाची बुद्धि-स्थैर्याला व बुद्धीवर ज्ञानाचा संस्कार होण्याला सारखीच आवश्यकता आहे हें दिसून येईल.]

**इंद्रियाणां हि चरतां यन्मनोऽनुविधीयते**
**तदस्य हरति प्रज्ञां वायुर्नावमिवांभसि** ६७

**हि, यत् मनः चरताम् इंद्रियाणाम् अनुविधीयते, तत् , अंभसि वायुः नावम् इव, अस्य प्रज्ञाम् हरति ।**

कारण जें मन ( विषयांकडे )धावणाऱ्या इंद्रियांच्या मागें धावत सुटतें. तें मन समुद्रांत वारा ज्याप्रमाणें नाव ( भलतीकडे ) नेतो, त्याप्रमाणें पुरुषाच्या बुद्धीला भलत्या मार्गाला नेतें.

**तस्माद्यस्य महाबाहो निगृहीतानि सर्वशः**
**इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ६८**

तस्मात् महाबाहो ! यस्य इंद्रियाणि इंद्रियार्थेभ्यः सर्वशः निगृहीतानि, तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ।

म्हणून, हे अर्जुना ! ज्याचीं इंद्रियें विषयांपासून पूर्णपणें स्वाधीन ( निगृहीत ) झालीं. त्याची प्रज्ञा (बुद्धि) स्थिर झाली असें म्हणावें.

[ कर्मयोगाला आत्मज्ञानाच्या संस्कारानें होणारा उपभोगतृष्णेचा पूर्ण नाश व बुद्धीची स्थिरता ह्या दोन गोष्टी अत्यंत अवश्य असतात व त्या दोन्हीही गोष्टी ( आत्मसंयमनाने म्हणजे ) योगानें-अंतःकरणाच्या समत्वानेंच साध्य होतात. ह्याप्रमाणे योग व तज्जन्य बुद्धिस्थैर्य आणि भावना ह्या साधनांनीं बुद्धियोग पूर्ण होऊन, शांतिसुखाचा लाभ होतो ]

३९ व्या श्लोकापासून येथपर्यंत वर्णन केलेल्या योगनिष्ठेचा उपसंहार करितातः—

**या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी**
**यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः ६९**

**सर्वभूतानाम् या निशा तस्याम् संयमी जागर्ति । यस्याम् भूतानि जाग्रति, सा पश्यतः मुनेः निशा ।**

सर्व प्राणिमात्रांची जी रात्र, तीमध्यें संयमी स्थितप्रज्ञ जागृत असतो. ( आणि ) जीमध्यें सर्व प्राणिमात्र जागृत असतात, ती ज्ञानी स्थितप्रज्ञाची रात्र असते.

[ विषयासक्त मनुष्य विषयोपभोगात गुरफटून गेला असल्यामुळे, हा बुद्धि योग त्याला मुळींच दिसत नाहीं. म्हणून बुद्धियोग हीच त्याची रात्र असें म्हटलें आहे. परंतु ज्ञानी स्थितप्रज्ञ ह्या योगनिष्ठेंत तत्पर असल्यामुळे, तो उपभोगाकडे ढुंकूनही पहात नाहीं. म्हणून विषयोपभोग हीच त्याची रात्र होय.]

**आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं समुद्रमापः प्रविशंति यद्वत्**
**तद्वत्कामा यं प्रविशंति सर्वे स शांतिमाप्नोति न कामकामी ७०**

**यद्वत् आपूर्यमाणम् अचलप्रतिष्ठम् समुद्रम् आपः प्रविशंति। तद्वत् यम् सर्वे कामाः प्रविशंति सः शांतिम् आप्नोति। कामकामी न।**

ज्याप्रमाणें चोहोंकडून (पाणी) भरत जात असणाऱ्या परंतु ज्याची मर्यादा अढळ राहते, अशा समुद्रांत पाणी प्रवेश करीत असतें; (तथापि त्याची स्थिति बदलत नाहीं) त्याप्रमाणें ज्यास सर्व कामोपभोग असतात (तथापि ज्याची स्थिति अढळ राहते.) त्या स्थितप्रज्ञास शांतिसुख प्राप्त होतें. तें कामोपभोगपरायण मनुष्यास प्राप्त होत नाहीं.

[ महासागराला बाहेरील पाण्याची गरज नसली तरी तो आपल्यांत येऊन मिळणाऱ्या जलप्रवाहास कधींही प्रतिबंध करीत नाही. तसेंच त्यांत कितीही प्रवाह बाहेरून मिळाले तरी त्याची अढळ मर्यादा कमजास्त होत नाहीं. त्याप्रमाणेंच स्थितप्रज्ञ योग्याला उपभोगांची आकांक्षा नसली तरी तो कर्तव्यतत्पर असल्यामुळें त्याच्या इंद्रियाचा नेहमीं विषयांशीं संयोग होत असला तरी, त्याची योगोपयुक्त सात्त्विक स्थिति अढळ राहते ]

**विहाय कामान् यः सर्वान् पुमांश्चरति निस्पृहः**
**निर्ममो निरहंकारः स शांतिमधिगच्छति ७१**

**यः पुमान्, सर्वान् कामान् विहाय, निस्पृहः निर्ममः निरहंकारः चरति, सः शांतिम् अधिगच्छति।**

जो पुरुष सर्व विषयवासना सोडून, निरिच्छ, ममत्वशून्य, व निरभिमान होऊन, कर्तव्य करीत राहतो, त्याला शांति मिळते.

[ अज्ञ लोक अनेक विषयोपभोगांच्या म्हणजे त्रैगुण्याच्या नादीं लागतात. परंतु ज्ञानी स्थितप्रज्ञ विषयोपभोगांपासून परावृत्त म्हणजे निस्त्रैगुण्य व स्वतःच्या सुखदुःखाची पर्वा न बाळगणारा, म्हणजे निर्द्वंद्व असतो. त्याचप्रमाणें कोणत्याही प्रसंगीं त्याची सात्त्विक स्थिति ढळत नाहीं. म्हणजे तो नित्यसत्त्वस्थ असतो. आणि तो उपभोग-संपादनाविषयीं निरिच्छ असून, प्राप्त होत असलेल्या उपभोगा-विषयीं—देखील त्याच्या अंतःकरणांत ममत्व नसतें. म्हणजे तो निर्योगक्षेम

असतो. त्याच्या अंगीं आत्मज्ञान बाणलें असल्यामुळें, स्वतःच्या कर्तृत्वाबद्दल मुळींच अभिमान वाटत नाहीं. म्हणजे तो पूर्ण आत्मवान् असतो. ह्याप्रमाणें वरील तीन श्लोकांत मिळून ४५ व्या श्लोकांत सांगितलेल्या योगनिष्ठेच्या पांचही अंशांची पूर्णता दर्शविली आहे. व त्याचप्रमाणें ५४ व्या श्लोकांतील अर्जुनाच्या प्रश्नावरून पुढें येथपर्यंत जें प्रतिपादन केलें आहे, त्यांत योगनिष्ठेची पूर्णता दर्शविणें हाच अभिप्राय आहे. ४५ व्या श्लोकांत बुद्धियोगाचे जे पांच अंश सांगितले आहेत त्यांची परिपूर्णता देखील ५५ व्या श्लोकापासून सुरू झालेल्या या प्रकरणांत सर्वत्र वर्गवारीनें दिसून येण्याजोगी आहे. परंतु प्रत्येक ठिकाणीं त्या त्या अंशाची पूर्णता दाखविणें एकंदर शास्त्रार्थाच्या दृष्टीनें फारसें आवश्यक नाहीं. कारण, बुद्धियोगाचे हे पांच अंश समजुतीकरितां स्थूल मानानें केले आहेत. म्हणून त्याची वर्गवारीनें चिकित्सा करण्याची आवश्यकता नाहीं. पुढील ग्रंथांत त्याचें विभागशः वर्णन यावयाचें आहे.]

शेवटीं योगनिष्ठेच्या पूर्णावस्थेचें वर्णन करितातः—

**एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ नैनाम्प्राप्य विमुह्यति**
**स्थित्वास्यामन्तकालेऽपि ब्रह्मनिर्वाणमृच्छति ७२**

**पार्थ ! एषा ब्राह्मी स्थितिः । एनाम् प्राप्य न विमुह्यति । अंतकाले अपि अस्याम् स्थित्वा, ब्रह्मनिर्वाणम् ऋच्छति ।**

अर्जुना ! हीच ब्राह्मी म्हणजे ज्ञान–विज्ञानमय स्थिति होय. ही स्थिति ज्याला प्राप्त होते, तो केव्हांही मोह पावत नाहीं. अंतकालीं देखील ही स्थिति प्राप्त झाली तरीही त्याला ब्रह्मानंद म्हणजे अमृतत्व प्राप्त होतें.

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे सांख्ययोगो नाम द्वितीयोऽध्यायः ।**

याप्रमाणें श्रीभगवंतांनीं गाइलेल्या उपनिषदांतील ब्रह्मविद्यांतर्गत कर्मयोगशास्त्राविषयींच्या श्रीकृष्ण व अर्जुन ह्यांच्या संवादांतील सांख्ययोग ( प्रकरण ) नांवाचा दुसरा अध्याय समाप्त झाला.

# रहस्यदीपिकेच्या द्वितीयाध्यायाचा उपसंहार.

हा दुसरा अध्याय गीताशास्त्रांत येणाऱ्या सर्व शास्त्रीय विषयांचा सूचक असल्यामुळें उपक्रम या नात्यानें त्याचें महत्त्व फार आहे. म्हणून उपसंहारांत सर्व विषयांचें सविस्तर विवेचन करणें योग्य असलें तरी यांतील सर्व विषय पुढील अध्यायांत क्रमशः येणार असल्यामुळें त्यांचा विस्तारानें विचार करण्याची येथें आवश्यकता नाहीं. तथापि या महत्त्वाच्या अध्यायांतील सर्व विषय नीट ध्यानांत येण्याकरितां प्रथम विषयांची अनुक्रमणिका व पुढें उपसंहार, अशी योजना करणेंच उचित होय. या अध्यायांतील पहिल्या श्लोकांत संजयानें अर्जुनाची शोकाकुल स्थिति वर्णन केली आहे. भगवंतांनीं केलेला तीव्र निषेध २ ते ३*; अर्जुनानें केलेला आपल्या पूर्वपक्षाचा अनुवाद ४ ते ६; उपदेश करण्याविषयीं अर्जुनानें केलेली प्रार्थना ७ ते ८; संजयानें सांगितलेला अर्जुनाचा निश्चय. व भाषणाच्या प्रारंभीं भगवंतांनीं केलेला आविर्भाव ९ ते १०; उपक्रम ११ ते १५; आत्मज्ञान १६ ते १८; वरील दोन विषयांतील कांहीं मुद्द्यांचें स्पष्टीकरण १९ ते २५; इतर कल्पनांनीं देखील शोकाची निरर्थकता २६ ते २८; आत्मज्ञान जास्त दुर्बोध वाटण्याचें कारण २९; अकराव्या श्लोकापासून सुरू झालेल्या विषयाचा उपसंहार ३०; सांख्य, संन्यासनिष्ठा ३१ ते ३८; योगनिष्ठेची प्रस्तावना ३९ ते ४४; बुद्धियोग ४५ ते ५३; अर्जुनाचा प्रश्न ५४; स्थितप्रज्ञाचीं लक्षणें व योगनिष्ठेचें परिपूर्ण स्वरूप ५५ ते ६८; योगनिष्ठेचा उपसंहार ६९ ते ७१ व ब्राह्मी स्थिति ७२.

दुसऱ्या अध्यायांतील विषयविवेचनास सुरवात करण्याचे पूर्वी मागील अध्यायाचे शेवटीं वर्णिलेल्या अर्जुनाच्या शोकमग्न स्थितीकडे थोडेंसें लक्ष देणें अवश्य आहे. आपल्या हातून स्वजनहत्या, कुलक्षय इत्यादि महापातकें घडणार आणि ज्यांच्याकरितां हें पापाचरण करावयाचें त्या आप्तइष्टांचीदेखील याच रणकुंडांत आहुति पडणार; अर्थात् व्यावहारिक व धार्मिक या दोनही दृष्टींनीं हें युद्ध आपणांस अत्यंत हानिकारक होणार, असें वाटल्यामुळें त्याचें मन विषण्ण झालें, व आतां हें युद्ध थांबत

* प्रत्येक विषयावरील आंकडे या अध्यायांतील श्लोकांचे समजावेत.

नाहीं असें वाटून तो शोकाकुल झाला. अर्जुनाच्या शोकाच्या कारणांची मीमांसा वेदान्तदृष्ट्या करावयाची झाल्यास अर्जुनाचा मोह व अज्ञान हेंच त्याच्या शोकाचें कारण होय, असें ठोकळमानानें कोणासही ठरवितां येण्याजोगें आहे. परंतु अर्जुनाचें अज्ञान म्हणजे काय ? त्याची चूक कोठें व कशी झाली ? किंवा त्याच्या अज्ञानाचें (मोहाचें) स्वरूप कोणत्या प्रकारचें होतें ? या प्रश्नांचा शास्त्रीयदृष्ट्या सूक्ष्म विचार करावयास पाहिजे. आजपर्यंतच्या गीताशास्त्रावरील बहुतेक ग्रंथकारांनीं एकाच रीतीनें म्हणजे जगन्मिथ्यात्ववादानें अर्जुनाच्या शोकमोहाचा विचार केला आहे. अहंकार व ममता म्हणजे मी व माझें हीं समजूत वेदान्ताच्या दृष्टीनें (जगन्मिथ्यात्ववादास अनुसरून) सर्वथैव खोटी असल्यामुळें स्वकीय व परकीय या मिथ्या कल्पनेमुळेंच अर्जुनास शोक उत्पन्न झाला असा त्यांच्या म्हणण्याचा इत्यर्थ आहे.

वेदान्तशास्त्रांत या मिथ्यात्वाच्या व्याख्या दोन प्रकारांनीं केलेल्या आढळून येतात. त्यांतील वर दिलेली विचारसरणी नवीन वेदान्तग्रंथकारांनीं स्वीकारली असून दुसरा प्रकार प्राचीनांस संमत असावासा दिसतो. हे दोन प्रकार लक्षांत येण्याकरितां कांहीं उदाहरणें पुढें देतों. शुक्तिरजत, रज्जुसर्प, किंवा मृगजळ हीं पहिल्या प्रकारच्या मिथ्यात्वाचीं उदाहरणें होत. या उदाहरणांत शिंपीवर रुप्याचा, दोरीवर सापाचा किंवा सूर्यकिरणांवर पाण्याचा होणारा भास सर्वथैव खोटा आहे, व याप्रमाणेंच ब्रह्मावर होणारा जगताचा भास खोटा आहे असें ओघानेंच प्राप्त होतें.

ही कल्पना प्राचीन मतांत फारशी आढळून येत नाहीं. मिथ्यात्वाचा दुसरा प्रकार लक्षांत येण्याकरितां एक उदाहरण पुढें दिलें आहे. सूत व कापड यांत सुतासच खरेपणा असून कापड हा काल्पनिक पदार्थ आहे. कारण सुताच्या विशिष्ट रचनेखेरीज यांत निराळें असें कांहींच नसतें. सुतावर केलेलें विणकाम म्हणजेच कापड होय. आणि म्हणूनच कापडाचें स्वतंत्र अस्तित्व मिथ्या म्हणजे खोटें आहे याच दृष्टान्ताप्रमाणें ब्रह्माचे ठिकाणीं अचिन्त्य शक्तीच्या त्रिगुणात्मक मायेनें बनविलेल्या नामरूपात्मक सृष्टीचें स्वतंत्र अस्तित्व खोटें आहे. रज्जुसर्पाच्या मिथ्यात्व कल्पनेंत व तंतुपटाच्या मिथ्यात्व कल्पनेंत पुष्कळच फरक आहे. दोरीचें खरें ज्ञान झाल्याबरोबर, सर्पाची कल्पना अजिबात नाहींशी होते. व त्याला दृश्यत्व देखील उरत नाहीं. परंतु सूत कापड या दृष्टांतांत सुताचें ज्ञान झाल्यावर देखील कापडाचें दृश्यत्व नाहींसें होत नाहीं. म्हणून पहिल्या प्रकारास प्रतियोगी मिथ्यात्व व दुसऱ्यास अनुयोगी मिथ्यात्व म्हणावें. "यस्मिन्विज्ञाते सर्वमिदं

विज्ञातं भवति " ह्या औपनिषद् सिद्धान्ताचा विचार केल्यास तंतुपटाप्रमाणेंच जगन्मिथ्यात्व छांदोग्यादिक उपनिषदांना संमत आहे. (छां. ६।१।४-५-६) असें म्हणण्यास हरकत नाहीं.

नाहीतर दोरीवर भ्रांतीनें भासणाऱ्या सर्पासारखें जग हें खोटें समजल्यास, ब्रह्मज्ञान झाल्यानें सर्व जगताचें ज्ञान होतें हा श्रौतसिद्धान्त बाधित होईल. कारण वरील दृष्टान्तांत दोरीचें ज्ञान झाल्यानें सर्पाचें ज्ञान होत नसून ती कल्पना बाधित होते. याप्रमाणें ब्रह्मज्ञान झाल्यावर सर्व जगाविषयींची कल्पना बाधित होईल. पण त्याचें ज्ञान झालें असें म्हणतां यावयाचें नाहीं. येनकेन प्रकारेण श्रौत सिद्धान्ताची संगति लावण्याकरितां लाक्षणिक अर्थ स्वीकारणें भाग पडतें. परंतु लाक्षणिक अर्थापेक्षां शास्त्रांत प्रतिपदोक्त म्हणजे खऱ्या अर्थाचीच महती अधिक असल्यामुळें " यस्मिन् विज्ञाते सर्वमिदं विज्ञातं भवति"या श्रुतीस अनुसरून तंतुपटासारखी मिथ्यात्वाची दुसरीच कल्पना या ठिकाणीं स्वीकारणें योग्य ठरतें व हीच कल्पना कर्मयोग-शास्त्रांत ग्राह्य धरली आहे. मिथ्यात्वाचे हे दोनही प्रकार वेदान्तशास्त्रांत रूढ आहेत. त्यांतील पहिला प्रकार संन्यासमार्गांत, व दुसरा प्रकार कर्मयोगांत स्वीकारला आहे. मिथ्यात्वाच्या या दोनही व्याख्या वेदान्त परिभाषेच्या अनुमान-परिच्छेदांत २२५-२६ या पृष्ठांवर दिल्या आहेत.

अर्जुनाच्या शोकमोहांच्या कारणाचा विचार करतांना गीताशास्त्रास दुसऱ्या प्रकारचें मिथ्यात्व ग्राह्य आहे. हे विसरतां कामा नये. या दृष्टीनें पाहिल्यास अर्जुनानें काढलेले आक्षेप सर्वथैव चुकीचे होते, असें म्हणतां येत नाहीं. कारण जग किंवा संसार यांना स्वतंत्र अस्तित्व नसलें तथापि या प्रकाराच्या मिथ्यात्वाचा अनुकूल तर्काप्रमाणें परमार्थामध्यें देखील उपयोग आहे. आणि म्हणूनच नीति, अनीति, वर्णाश्रमधर्म, कर्तव्याकर्तव्य, पुण्य, पाप इत्यादि गोष्टींचा विचार करून निर्णय ठरविणें अवश्य असतें. व अर्जुनानें आपल्याकडून सर्व बाजूंनी विचार करून प्रस्तुत युद्ध सर्वथैव हानिकारक आहे असें ठरविलें, यांत अर्जुनाची कोणती चूक झाली ? या प्रश्नाचाच सूक्ष्मदृष्ट्या विचार केला पाहिजे. कारण गोत्रवध किंवा कुलक्षय, या गोष्टी कोणालाही नाकबूल होणें शक्य नाहीं. आणि म्हणूनच या बाबतींतील अर्जुनाची विचारसरणी चुकीची नव्हती. परंतु धर्म कोणता व अधर्म कोणता किंवा मानवी आयुष्याचें अंतिम साध्य कोणतें ? या प्रश्नांचा विचार करतांना व्यक्तिधर्माचा विचार करणें जितकें अवश्य असतें त्यापेक्षां देखील

समष्टीचा किंवा समाजधर्मांचा विचार करणें अगत्याचें आहे. वेदान्त-शास्त्रांत व्यष्टि व समष्टि म्हणजे व्यक्ति व समुदाय या पद्धतीनेंच आध्यात्मिक तत्त्वांचा विचार केलेला असतो. व्यष्टीनें समष्टीशीं म्हणजे व्यक्तीनें समाजाशीं तत्त्वतः एकरूप होणें हेंच जीवन्मुक्तीचें लक्षण होय. व्यष्टीचा चालक जीव व समष्टीचा परमेश्वर असतो. यांपैकीं जीव आपला संकुचितपणा टाकून ईश्वर-स्वरूपांत एकरूप होतो तेव्हां त्याला जीवन्मुक्त म्हणतात. अर्जुनानें व्यक्तिधर्मांचा पूर्ण विचार केला, पण तो समष्टीस अगदींच विसरला. जर ही गोष्ट त्याच्या लक्षांत आली असती तर समाजाच्या कल्याणाकरितां सर्वस्वाची आहुति देण्यांतच व्यक्तीची सार्थकता असते हें त्याच्या सहजच लक्षांत आलें असतें. परंतु व्यक्तीचा संकुचितपणा नष्ट झाल्याखेरीज खरा स्वार्थत्याग कोणता, हें कळणें देखील मुष्किलीचें असतें. अशा संकुचित स्थितींत मनुष्य कितीही शाहाणा असला तथापि त्याचें अंतःकरण दुर्बळच असतें व या वैयक्तिक संकुचितपणामुळेंच ऐनवेळीं अर्जुनाच्या मनोदौर्बल्यानें उचल खाल्ली, आणि त्याची करुणाजनक अशी विषमस्थिति करून टाकली.

मनोदौर्बल्यानें उत्पन्न झालेल्या या शोकतंद्रेतून अर्जुनास जागें करण्याकरितां भगवंतांनी त्याला निषेधाचा एक तीव्र चटका दिला आहे. या चटक्यानेंच थोडेंसें शुद्धीवर येऊन अर्जुनानें आपलें म्हणणें श्रीकृष्णापुढें थोडक्यांत मांडून खरा श्रेयस्कर मार्ग कोणता तो दाखविण्याविषयीं त्याची प्रार्थना केली आहे. अर्जुनाच्या म्हणण्याचा इत्यर्थ इतकाच की, युद्धाचे पूर्वी जयापजयाविषयीं मुळींच खात्री नसते, अशा संदिग्ध स्थितींत गुरुहत्या करून राज्य मिळवावें कां सर्वस्वावर पाणी सोडून भिक्षेचा मार्ग स्वीकारावा ? यांपैकीं श्रेयस्कर कोणतें तें मला कळत नाहीं. तरी-पण मी खरा श्रेयस्काम आहें. जीविताचें खरें साफल्य ज्या योगानें होईल तेंच कर्म करण्यास मी एका पायावर तयार आहें. यापुढें मला कशाचीही पर्वा नाहीं. अर्जुनानें या वेळीं आपलें मन अगदीं मोकळें करून आपल्या हृदयांतील भाव निवेदन केल्यामुळेंच, सरलहृदयी श्रेयस्काम पुरुषाचा सखा भगवान्, श्रीकृष्ण, स्वार्थत्यागी पण कर्तृत्वशाली, श्रद्धावान् पण जिज्ञासुबुद्धिमान् अशा अर्जुनास व्यष्टिसमष्टीचें तादात्म्य करणाऱ्या कर्मयोगशास्त्राचा उपदेश करण्यास तयार झाला आहे. कर्मयोगासारख्या उत्साहजनक ब्रह्मविद्येचा उपदेश ऐकण्याला योग्य अशी मनोभूमिका तयार होणें जरूर असल्यानें आधीं त्याच्या मनांतून शोक अजिबात

नाहींसा करणें अगत्याचें होतें. व अवश्य तितकें आत्मज्ञान सांगून श्रीकृष्णानें त्याचा शोक नष्ट केला. श्रीकृष्णाचे भाषणाच्या उपक्रमादाखल जे पांच श्लोक आले आहेत त्यांत व्यष्टि व समष्टि, किंवा व्यक्ति व मानवी समाज, यांतील आत्म्याचें नित्यत्व, मरणाची सोदाहरण व्याख्या, तितिक्षा, समता व अमृतत्व, या मुद्द्यांचा निर्देश झाला आहे. हीं तत्त्वें या अध्यायाच्या पंचेचाळिसाव्या श्लोकांतील बुद्धि-योगाच्या पांचही अंशांस धरून आहेत, असें म्हणण्यास हरकत नाहीं. शिवाय यांतच अमृतत्व हेंच मानवी जीविताचें खरें साफल्य होय असेंही दर्शविलें आहे. मागें दिलेल्या आध्यात्मशास्त्रांतील व्यष्टिसमष्टीच्या उपपत्तीनेंच सोळाव्या श्लोकां-तील प्रमेय समाधानकारक रीतीनें सोडवितां येतें. अनुयोगी मिथ्यात्वाच्या रीतीनेंच ब्रह्माच्या ठिकाणीं झालेला मायेचा विवर्त व तिच्यापासून उत्पन्न झालेले नाम-रूपात्मक सृष्टीचे नानाविध विकार कसे बनतात तें सुवर्णालंकाराच्या दृष्टान्तानें आम्हीं सदर श्लोकाच्या विवरणांत दाखविलें आहे. (र. दी. पृष्ठ ५० पाहा.) सोळाव्या श्लोकांतील या प्रमेयाचा सूक्ष्म दृष्टीनें विचार केल्यास असें आढळून येईल कीं, जर जगत् हें मृगजळाप्रमाणें केवळ भ्रमरूपच असें ठरेल तर त्याच्यांतील अवयवावयवी भावदेखील भ्रांतिरूपच म्हणावा लागेल. आणि असें झालें म्हणजे जीवन्मुक्त दशेंत जगाचें दृश्यत्वदेखील नाहींसें होतें, असें म्हणावें लागेल. पण ही गोष्ट अनुभवविरुद्ध असल्यामुळें रज्जुरूपी सर्पाप्रमाणें जग म्हणजे निवळ भ्रमाचा पसारा नसून ब्रह्मविवर्ताची म्हणजे मायेची विशिष्ट रचना आहे. असेंच कबूल करणें भाग पडतें. आणि म्हणूनच या जगतांतील सत् आणि असत् यांचें परीक्षण करतांना एका शुद्ध ब्रह्मतत्त्वाखेरीज इतर ठिकाणीं दिसणारें अस्तित्व हें त्या त्या पदार्थांच्या घटकावयवांवर अवलंबून राहतें. स्वतंत्रपणानें ब्रह्माखेरीज कोणत्याही पदार्थाला अस्तित्व नाहीं हा निर्णय जगाला अनुकूल—मिथ्या मानल्या-खेरीज व्यष्टिसमष्टीच्या उपपत्तीनें सरळ सोडवितां येत नाहीं. भ्रमरूप मिथ्यात्वामध्यें व्यष्टि-समष्टीची कल्पनाही असंभवनीय असल्यामुळें पदार्थ व त्यांचे घटकावयव, ही कल्पनाच निराधार होऊन सयुक्तिक निर्णय बसवितां येणें दुर्घट होतें. व्यष्टिसमष्टीच्या उपपत्तीनें केवळ सत्स्वरूप ठरलेलें शुद्ध आत्मतत्त्वच पिंड-ब्रह्माण्डामध्यें व्यापून राहिलें आहे. हें तत्त्व म्हणजे आत्मा अविनाशी (अमृत) आहे हें जाणून दृश्य रचनेकरितां शाहण्या मनुष्यानें शोक करणें उचित नव्हे असें ठरतें. समाजाशीं तादात्म्य होण्याचें सामर्थ्य अंगीं नसल्यास अशा असमर्थ

व्यक्तीला आत्मज्ञानाच्या साहाय्यानें मोक्ष मिळवितां येणें शक्य आहे. या पद्धतीलाच संन्यासमार्ग किंवा सांख्यनिष्ठा म्हणतात. कारण या मार्गांतील कर्मविचार विशेषतः वैयक्तिक दृष्टीनेंच केलेला असतो आणि म्हणूनच सांख्यबुद्धीचें वर्णन करतांना स्वर्गदायक पुण्य किंवा नरकदायक पाप, राज्योपभोग अथवा अपकीर्ति या केवळ व्यक्तिधर्माचाच उल्लेख केला आहे. परंतु संकुचित वैयक्तिक कर्म अमृतत्वास उपयोगी पडणारें नसतें. इतकेंच काय, पण तें पारमार्थिक दृष्ट्या बंधकच ठरतें. असें कर्म संन्यासमार्गानेंही अग्राह्य मानलें जातें परंतु याबरोबरच मुमुक्षूनें किंवा जीवन्मुक्तानें कर्माचा त्यागच केला पाहिजे, कर्माचा त्याला अधिकारच नाहीं, हें संन्यासमार्गाचें मोघम विधान व्यष्टिसमष्टिमूलक वेदांतशास्त्रपद्धतीस नाकबूल केल्याखेरीज गत्यंतरच नाहीं. संन्यासमार्ग व्यक्तीला मोक्षदायक असला तरी तो समष्टीला म्हणजे समाजाला पोषक नसल्यामुळें अर्जुनासारख्या उत्साही पुरुषास लोककल्याणकारक योगबुद्धीचा म्हणजे योगनिष्ठेचाच उपदेश करणें स्वाभाविक होतें. योगनिष्ठेचा प्रस्तावना प्रथम ६ श्लोकांत केल्यावर ( श्लोक ४५ ते ५३ ) योगनिष्ठेचाच उपदेश आला आहे. यांतील मुख्य वाक्य कोणतें हें हुडकून काढतां आल्यास योगनिष्ठेचें मुख्य प्रधान सूत्रच मिळालें असें होईल. या ९ श्लोकांत आज्ञार्थी अशीं जवळ जवळ ६ क्रियापदें आलीं आहेत. पैकीं ४७व्या श्लोकांतील दोनही क्रियापदें निषेधार्थी ( अकरणरूपी ) असल्यानें त्यांचा विचार करण्याची गरज नाहीं. श्लोक ४९ यांतील '**बुद्धौ शरणमन्विच्छ**' ( बुद्धीमध्यें आधार शोधून पाहा. ) हें आज्ञार्थी क्रियापद मुख्य उपदेश सूचक आहे असें मानतां यावयाचें नाहीं. त्याचप्रमाणें ५० व्या श्लोकांतील '**योगाय युज्यस्व**' ( तूं योगास सिद्ध हो ) हें क्रियापदहेखील उपदेशाचा प्रधानविधी म्हणजे मुख्य भाग म्हणतां येत नाहीं. कारण वरील दोनही वाक्यांत बुद्धीचें आणि योगाचें महत्त्वच दाखविलें आहे. राहतां राहिलीं दोन वाक्यें. त्यांपैकीं श्लोक ४८ यांतील **योगस्थः कर्माणि कुरु** ( योगांत राहणारा म्हणजे योगयुक्त असा होऊन कर्में कर ) या वाक्यांतील आज्ञा मुख्यत्वेंकरून कर्मासंबंधीं आहे. म्हणून योगनिष्ठेच्या उपदेशाचें हें प्रधान वाक्य आहे, असें म्हणतां यावयाचें नाहीं. याप्रमाणें प्रस्तुत ९ श्लोकांच्या प्रकरणांतील इतर कोणत्याही आज्ञार्थी वाक्यांना प्राधान्य येत नाहीं. चालू प्रकरण योगनिष्ठेच्या उपदेशाचा मुख्य भाग आहे, याविषयीं कोणाचाही मतभेद नाहीं. अशा या महत्त्वाच्या प्रकरणांत जर

कोणतें उपदेशाचें प्रधान विधिवाक्य असेल तर तें ४५ वा श्लोक हेंच होय. या श्लोकांत तीन निषेधक व दोन विधायक अंश आहेत. पहिला निस्त्रैगुण्य, या अंशानें सात्त्विक, राजस व तामस या तीनही प्रकारच्या उपभोगांविषयींची इच्छा टाकून तूं निस्पृह हो, असा उपदेश केला आहे. उपभोग, चैन किंवा विलास हे व्यक्तिधर्म आहेत. समष्टी (समाजा)चे धर्म नव्हत. समाजाला अपकारक होणारा कोणताही धर्म व्यक्तीनें याज्यच मानला पाहिजे. पण ऐश्वर्याची गोष्ट तशी नाहीं. ऐश्वर्य म्हणजे सत्ता किंवा मालकीचा अधिकार, हा समाजाचा धर्म आहे. त्याचा उपभोगाशी मुळींच संबंध नाहीं. परंतु एक किंवा कांहीं व्यक्तींची उपभोगलालसा बेमुमार वाढूं लागली म्हणजे त्यांना अधिकाराची हांव उत्पन्न होते. चैनबाजीसारख्या क्षुद्र व्यक्तिधर्मास बळी पडलेले हे दुर्बल मनाचे लोक ऐश्वर्यास कसे नालायक असतात, याची साक्ष पटविण्यास इतिहास समर्थ आहे. ज्या मानानें व्यक्ति समाजाशीं एकरूप झाली असेल त्या मानानेंच ऐश्वर्याची लायकी मनुष्याच्या अंगीं उत्पन्न होते. सत्ता हा व्यक्तिधर्म नसून समाजधर्म आहे. हें मत महाभारतास पूर्ण संमत आहे (म० भा० शा० प० अ० ९० श्लो० १४–१५ पाहा). याप्रमाणें ऐश्वर्याचा संबंध उपभोगाशीं जोडणें कोणत्याही दृष्टीनें अनिष्टच होय. उपभोगासारखी क्षुद्र इच्छा टाकून लोकहितासारख्या पवित्र हेतूची जोपासना करणें हा बुद्धियोगांतील उपदेशाचा निस्त्रैगुण्य या पदानें सुचविलेला एक अंश होय. निर्द्वंद्व या पदानें बुद्धि विकारवश होऊं देऊं नये असें सांगितलें असून निर्योगक्षेम या पदानें तळमळ किंवा उच्छृंखलपणा सोडण्यास सांगितलें आहे. नित्यसत्त्वस्थ व आत्मवान या पदांचा अर्थ आम्हीं टीकेंत दिलाच आहे. त्याची पुनरुक्ति करण्याची गरज नाहीं. सांगण्याचा मुख्य मुद्दा हाच कीं, या श्लोकासारखें मुख्य उपदेशवाक्य या प्रकरणांत दुसरें कोणतेंहि नाहीं व या वाक्याच्या प्राधान्यांत कोणतीही उणीव दिसत नाहीं. यावरून ४५ वा श्लोक हेंच योगनिष्ठेचें मुख्य सूत्र होय, असें सिद्ध होतें. या वाक्यांत सांगितलेला उपदेश आपोआप घडून येणारा नसल्यामुळें त्यासच मीमांसाशास्त्रांत अत्यंत अप्राप्त असें म्हणतात. अशा अत्यंत अप्राप्त गोष्टींविषयीं केलेल्या मुख्य उपदेशवाक्यांस मीमांसकांनीं अपूर्वविधि असें नांव दिलें आहे.

सारांश, या प्रधान वाक्यांत योगनिष्ठेंतील मूलतत्त्व सूत्रमय अशा शब्दांनीं गोविलें आहे. व्यवसायात्मक बुद्धि हाच कर्मयोगाचा पाया असून तिचें परिपूर्ण स्वरूप थोडक्यांत या श्लोकांत सांगितलें आहे. बुद्धि ही

कर्मयोगशास्त्राचीच काय, पण जगांतील सर्व शास्त्रांची जननी आहे, असें म्हटलें तरी चालेल. मनापेक्षां बुद्धि हें उच्चतम तत्त्व आहे. संवेदन हा मनाचा धर्म आहे. व संवेदनेनंतर स्मरणशक्ति, तारतम्यविचार, इच्छा व निश्चय हीं बुद्धीचीं स्वरूपें होत. व्यवहार असो वा परमार्थ असो, सर्व गोष्टी बुद्धीवरच अवलंबून असतात. भगवंतांनीं अर्जुनास उपदेशिल्याप्रमाणें जसजशी बुद्धियोगाची पूर्णता होत जाते तसतशी मनुष्याची योग्यता अधिकाधिक वाढतच जाते. उपदेशवाक्यांत बुद्धियोगाच्या पांच अंशांचा निर्देश असला तरी त्यांतल्या त्यांत आत्मज्ञान व समत्व यांचें महत्त्व अधिक आहे. म्हणूनच ते दोनही अंश विधायक शब्दांनीं सांगितले आहेत.

संकुचित उपभोगेच्छा समाजधर्मास किंवा परमार्थास विघातक असते. आत्मज्ञानाखेरीज तिचा पुरा नाश होत नाहीं. बुद्धीची खरी साम्यावस्था आत्मज्ञानानेंच उत्पन्न होते. आणि म्हणूनच स्वार्थत्यागी ज्ञानविज्ञानसंपन्न पुरुषच सर्वांना वंद्य होतात. आतां अठ्ठेचाळिसाव्या श्लोकांतील आज्ञार्थी वाक्याचा विचार केला पाहिजे. हा विचार करण्याचे आधीं सत्तेचाळिसाव्या श्लोकांतील अर्थ लक्षांत घेणें जरूर आहे. कारण त्या श्लोकांत तुला कांहीं शक्य असेल तर कर्म करणें हेंच आहे. यांतील अधिकार–शब्दानें कर्म बुद्धियोगाप्रमाणें अप्राप्त नसून तें निसर्गतः प्राप्तच आहे, असें स्पष्ट दर्शविलें आहे. फलप्राप्ति तुझ्या हातची नाहीं म्हणून तिची इच्छा करूं नकोस आणि कर्म न करण्याचा वृथा हट्ट करूं नकोस, असें सांगून 'तूं योगयुक्त होऊन कर्म कर अशीं' अठ्ठेचाळीसाव्या श्लोकांत आज्ञा केली आहे. साहजिक प्राप्त झालेल्या कर्मांत शिस्त पाळली जावी म्हणून व्यवस्थेकरितां जी आज्ञा केली जाते तिला मीमांसाशास्त्रांत नियमविधि असें म्हणतात. उदाहरणार्थ, अन्न खाणें हें सहजकर्म, परंतु त्या बाबतींत अव्यस्थितपणा येऊं नये, या हेतूनें दिवसां एक वेळ भोजन करावें अशी धर्मशास्त्रानें आज्ञा केली असल्यास तिचा नियमविधींतच समावेश होतो. याप्रमाणें अपूर्वविधि, निषेध व नियम या तीनही विधिप्रकारांनीं कर्मयोगशास्त्राचा सिद्धान्त निश्चित केल्यावर त्या सिद्धांताचें महत्त्व दर्शविण्याकरितां 'तूं बुद्धीलाच शरण जा', 'बुद्धियोग संपादन करण्यास तयार हो' अशीं आज्ञार्थी वाक्यें आलीं आहेत. शास्त्रीय उपपत्तीच्या दृष्टीनें पाहिल्यास पंचेचाळिसाव्या श्लोकापासून अठ्ठेचाळिसाव्या श्लोकापर्यंत मुख्य सिद्धान्त पूर्ण करून, पुढें त्रेपन्नाव्या श्लोकापर्यंत बाकीचे उपसिद्धान्त सांगितले आहेत व त्यांतच बुद्धियोगाच्या निरनिराळ्या अंशांचें स्पष्टीकरण साधलें आहे.

याप्रमाणें सिद्धांत व उपसिद्धान्त यांनीं युक्त असा सोपपत्तिक उपदेश श्रवण करून बुद्धियोगाच्या परिपूर्णतेविषयीं उत्पन्न झालेली अर्जुनाची जिज्ञासा किती स्वाभाविक आहे, हें निराळें सांगावयास नको. दुसऱ्या अध्यायांतील स्थितप्रज्ञाचें वर्णन हें परिपूर्ण सिद्धावस्थेचें वर्णन होय. अहंकार व ममता हे दोष ज्या वेळीं पूर्णपणें नाहींसे होतात तेव्हांच त्याला शांतीचा लाभ होतो. म्हणजे त्याची बुद्धि समुद्राप्रमाणें गंभीर होते. स्थितप्रज्ञ कर्मयोगी उन्नतीच्या पायऱ्या चढत समष्टीशीं एकरूप होतो, त्याच वेळीं कोणाच्याही सहज प्रत्ययास येण्याजोगी त्याची निरहंकारता प्रगट होते. ह्या उच्चतम स्थितीसच वेदान्तशास्त्रांत ब्राह्मी स्थिति असें म्हटलें आहे. मनुष्याला आपल्या आयुष्याच्या शेवटीं शेवटीं जरी ही 'ब्राह्मी स्थिति' प्राप्त झाली तरी देखील त्याला ब्रह्मपदाची प्राप्ति होऊन त्याच्या जीविताचें सार्थक होतें.

असें सांगून भगवंतांनीं या द्वितीय अध्यायाची परिसमाप्ति केली आहे.

---

# तृतीयोऽध्यायः।

## तिसऱ्या अध्यायाचा उपक्रम

दुसऱ्या अध्यायांतील पंचेचाळीसाव्या श्लोकांत बुद्धियोगाचा स्पष्ट उपदेश केला असून अठ्ठेचाळिसाव्या श्लोकांत कर्म करावयास सांगितलें आहे, आणि लगेच एकूणपन्नासाव्या श्लोकांत बुद्धियोगापेक्षां कर्म अत्यंत कनिष्ठ प्रतीचें आहे; तूं बुद्धीसच शरण जा, असेंही सांगितलें आहे. यामुळें अर्जुनास शंका उत्पन्न होणें साहजिकच आहे. शिवाय सिद्धावस्थेच्या वर्णनांत कर्माचें फारसें विवेचन आलें नसल्यामुळें त्याच्या शंकेला थोडासा जोर मिळाला आहे.

वस्तुस्थिति अशी आहे कीं, कोणत्याही शास्त्रीय सिद्धान्ताच्या स्वरूपाचे तात्त्विक व व्यावहारिक असे दोन विभाग करणें अपरिहार्य असतें. या नियमास अनुसरूनच मागील अध्यायांत योगनिष्ठेच्या तात्त्विक स्वरूपाचें वर्णन आलें असून तिच्या व्यावहारिक स्वरूपाचें सविस्तर वर्णन अद्यापि यावयाचें आहे.

परंतु, तत्त्व आणि व्यवहार यांतील भेद अपरिहार्य का व कसा आहे, हें समजल्याखेरीज ही विभागकल्पना शंकास्पद वाटल्यास त्यांत फारसें नवल नाहीं. शास्त्रीय उपपत्तीच्या क्रमाप्रमाणें पाहिल्यास योगनिष्ठेचें व्यावहारिक वर्णन आता ओघानेंच प्राप्त होतें. पण उपपत्तीची विभागकल्पना स्पष्ट होण्याकरितां अर्जुनानें अगोदर त्याविषयींच शंका विचारली आहे.

अर्जुनाच्या पुढें असलेल्या कर्मांत म्हणजे युद्धांत त्याला अनेक दोष दिसत होते. बीभत्स अशा या युद्धाच्या बाह्य स्वरूपानेंच निर्विण्ण होऊन सर्वकर्मसंन्यासाचा मार्ग स्वीकारण्यास तो तयार झाला होता.

भगवंतानी उपदेशिलेलें शुद्ध व निर्मल असे योगनिष्ठेचें तात्त्विक स्वरूप त्याला चांगलेंच पटलें होतें; परंतु कर्म करणेंच तुझ्या हातचें आहे, तूं बुद्धियोग संपादन करून कर्म कर, हा अ. २ श्लोक ४७ व ४८ यांतील श्रीकृष्णानें थोडक्यांत केलेला योगनिष्ठेच्या व्यावहारिक स्वरूपाचा उपदेश अर्जुनाला अद्यापि चांगलासा पटला नव्हता. केवळ ४५ व्या श्लोकांत सांगितलेला बुद्धियोग त्याच्या कर्मसंन्यासाला जुळणारा होता. पण त्या बुद्धियोगाचें व्यावहारिक स्वरूप त्याच्या मतास प्रतिकूल असें वाटत होतें म्हणूनः—

**ज्यायसीचेत्कर्मणस्ते मता बुद्धिर्जनार्दन**
**तत्किं कर्मणि घोरे मां नियोजयसि केशव** १

**जनार्दन ! ते कर्मणः बुद्धिः ज्यायसी मता चेत् तत् केशव! घोरे कर्मणि माम् किम् नियोजयसि ?**

अर्जुन म्हणालाः—हे जनार्दना ! जर तुला कर्मापेक्षां बुद्धि श्रेष्ठ वाटते, तर मला कर्म व तेंही ( असलें ) घोर कर्म कां करावयास लावितोस ?

**व्यामिश्रेणेव वाक्येन बुद्धिं मोहयसीव मे**
**तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम्** २

**व्यामिश्रेण वाक्येन इव मे बुद्धिम् मोहयसि इव। येन अहम् श्रेयः आप्नुयाम्, तत् एकम् निश्चित्य वद।**

घोटाळा उत्पन्न करण्यासारख्या वाक्यानें, ( भाषणानें ) मला वाटतें, तूं माझ्या बुद्धीस मोह पाडीत आहेस तर, ज्याच्यायोगानें माझें परम कल्याण होईल, अशी एकच निश्चित गोष्ट मला सांग.

[ मागील अध्यायांतील विवेचनावरून, मोक्षमार्गामध्यें बुद्धियोग मुख्य आहे असें सिद्ध झालें. परंतु त्या विवेचनांत कर्माचें सोपपत्तिक विवेचन आलें नसल्या-मुळें, कर्म व अकर्म ह्या दोन्हींचा विकल्प असावा, असें अर्जुनानें अनुमान केलें-अर्थात् त्यांपैकी कोणत्याही एका पक्षाचें विनिगमन ( दोहोंपैकी असुकच स्वीकार-ण्याचें योग्य कारण ) झालें नसल्यामुळें, भगवंताच्या सांगण्याप्रमाणें कर्मच कां करावें, याचें ( विनिगमन ) योग्य कारण अर्जुन ह्या प्रश्नांत विचारीत आहे. ]

अर्जुनाच्या ह्या प्रश्नांत गर्भित असलेली कर्माभावाची कल्पना कशी चुकीची आहे, हें भगवान् प्रथम दाखवितातः——

**श्रीभगवानुवाच**

**लोकेऽस्मिन् द्विविधा निष्ठा पुरा प्रोक्ता मयानघ**
**ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेण योगिनाम्** ३

**अनघ ! अस्मिन् लोके द्विविधा निष्ठा मया पुरा प्रोक्ता। सांख्यानां ज्ञानयोगेन, योगिनाम् कर्मयोगेण।**

श्रीभगवान् म्हणाले: —हे निष्पाप ( अर्जुना ) ! ह्या लोकीं,

( मोक्षप्राप्तीचे ) दोन मार्ग मीं ( तुला ) पूर्वी ( पूर्वाध्यायीं श्लोक ३९ त ) सांगितले आहेत. सांख्यांची ( निष्ठा ) ज्ञानस्वरूपानें व योग्यांची ( निष्ठा ) कर्मस्वरूपानें ( युक्त असते ).

[ योग म्हणजे कवच अर्थात् बाह्य स्वरूप. ह्या श्लोकांत 'सांख्य' म्हणजे संन्यासी व 'योगी' म्हणजे कर्मयोगी असा अर्थ अभिप्रेत आहे. वैदिक धर्मात संन्यास व कर्मयोग हे मोक्षप्राप्तीचे दोन मार्ग सांगितले आहेत. म. भा. शां.अ. १९ श्लोक ( पाहा ), अर्जुनाच्या प्रश्नांतील बीज ओळखूनच दोन्ही निष्ठांच्या बाह्य स्वरूपाचा स्पष्ट निर्देश भगवंतांनी येथें केला आहे. येथील ज्ञानयोग व कर्मयोग यांपैकीं योग शब्दाचा आम्ही बाह्यस्वरूप असा अर्थ केला आहे. कारण, सांख्य किंवा योगनिष्ठेच्या तात्त्विक स्वरूपांत ऐक्य असून त्यांची बाह्य स्वरूपें मात्र भिन्न आहेत. या बाह्य स्वरूपांतील भेदावरूनच वरील निष्ठेचे दोन विभाग होतात व हेंच योग शब्दाचा **बाह्यस्वरूप** असा अर्थ करण्याचें मुख्य कारण आहे. कर्मयोगाचें तात्त्विक स्वरूप म्हणजे बुद्धियोग हें अर्जुनाच्या संन्यासमार्गी मतास मिळतें आहे. पण कर्म हे त्याचें बाह्यस्वरूप मात्र तसें नाहीं. मी जी योगनिष्ठा तुला सांगितली ती जर तुला पटली तर तिच्या व्यावहारिक स्वरूपाचा देखील स्वीकार करणें क्रमप्राप्त आहे.]

योगनिष्ठेचें बाह्यस्वरूप म्हणजे या निष्ठेनें जाणाऱ्या साधकाची किंवा सिद्धाची आचरणपद्धति होय. अर्थात् या निष्ठेबरोबरच कर्तव्याचरण आवश्यक आहे असें ठरतें. यावर असा प्रश्न उत्पन्न होतो कीं, अमृतत्वास म्हणजे योगनिष्ठेच्या अंतिम साध्यास कर्माचरण प्रतिबंधक होईल कीं काय याचें उत्तर सांगतातः—

**न कर्मणामनारंभान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते**
**न च संन्यसनादेव सिद्धिं समधिगच्छति ४**

**कर्मणाम् अनारंभात् पुरुषः नैष्कर्म्यम् न अश्नुते। संन्यसनात् एव सिद्धिम् न समधिगच्छति च।**

कर्मास आरंभच न करण्यानें पुरुषाला नैष्कर्म्य प्राप्त होत नाहीं, त्याचप्रमाणें, (चालू कर्माच्या) त्यागानेंही सिद्धि मिळत नाहीं.

[ नैष्कर्म्य म्हणजे कर्मजन्य बंधाची निवृत्ति व सिद्धि म्हणजे आत्मसाक्षात्कार, ह्या दोनही अंशांचा उल्लेख दुसऱ्या अध्यायांत ५१ व्या श्लोकांत आलेला आहे.

हे दोन्ही शब्द मिळूनच (नैष्कर्म्यसिद्धि) अमृतत्व असा अर्थ होतो. कर्मास आरंभच न केल्यानें किंवा चालू कर्माचाच त्याग केल्यानें ही नैष्कर्म्यसिद्धि प्राप्त होत नाहीं. सारांश, नैष्कर्म्यसिद्धि प्राप्त होण्यास नुसता कर्माभाव उपयोगी पडत नाहीं कर्म अमृतत्वास प्रतिबंधक असतें तर त्याचा त्याग किंवा अभाव अमृतत्वाला आवश्यक ठरला असता; परंतु कर्म स्वरूपतः प्रतिबंधक नसून कर्त्याची बुद्धि मलीन असेल तर तें कर्म प्रतिबंधक होतें, नाहीं तर नाहीं. यावरून कर्म हें जात्या प्रतिबंधक नसल्यामुळेंच त्याचा अभाव अमृतत्वास आवश्यक नाहीं.]

कर्माभाव निरुपयोगी, इतकेंच नव्हे, तर तो होणें अशक्यही आहे असें सांगतातः—

**न हि कश्चित् क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत्**
**कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः** ५

**हि, कः चित् क्षणम् अपि अकर्मकृत् जातु न तिष्ठति। हि (सर्वः) प्रकृतिजैः गुणैः अवशः कर्म कार्यते।**

कारण, कोणीही एक क्षणभर देखील कर्मावांचून कधींच राहूं शकत नाहीं. प्रकृतीच्या गुणांनीं सर्व प्राणी अस्वतंत्र असल्यामुळें, ( ते गुण ) त्यांच्याकडून कर्म करवितात.

[ स्थावरजंगमात्मक सर्व सृष्टि प्रकृतीच्या सत्त्वरजतमोगुणांपासूनच झाली असल्यामुळें, प्रत्येक प्राणी, किंबहुना प्रत्येक पदार्थ ह्या सृष्टींत कर्मरहित केव्हांही असणें शक्य नाहीं. देह, इंद्रियें, मन व बुद्धि हीं प्रकृतीच्या गुणांपासूनच उत्पन्न झालीं असल्यामुळें, कर्म हा त्यांचा स्वभावच आहे. ह्याप्रमाणें सर्व सृष्टि कर्ममय असल्यामुळें, ह्या जगांत कर्मावांचून कोणत्याही पदार्थाचें अस्तित्व राहणें शक्य नाहीं. म्हणून व्यक्तीचे ठिकाणींदेखील कर्माचा पूर्ण अभाव होणें सर्वथैव अशक्य आहे, असा भगवंतांचा अभिप्राय आहे.]

असें असतां:—

**कर्मेन्द्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन्**
**इंद्रियार्थान् विमूढात्मा मिथ्याचारः स उच्यते** ६

**यः कर्मेन्द्रियाणि संयम्य मनसा इंद्रियार्थान् स्मरन् आस्ते, सः विमूढात्मा वा मिथ्याचारः उच्यते।**

जो केवळ कर्मेंद्रियें दाबून धरून मनानें विषयांचें चिंतन करतो तो मूर्ख किंवा ढोंगी म्हटला जातो.

[ वाचा, हात, पाय, मूत्रद्वार व गुदद्वार हीं पांच कर्मेंद्रियें होत. ह्या पांच इंद्रियांचे बाह्य व्यापार हट्टानें बंद करून, विषयचिंतनाचा मनाचा व्यापार मात्र सुरू ठेविल्यास दिसण्यांत तें अकर्म दिसलें तरी तें खरें नसून, नुसतें अकर्माचें सोंग होय व तें कोणीं करूं नये असें वरील श्लोकाचें तात्पर्य आहे. कारण कर्माभाव अनवश्यक व अशक्य असें ठरल्यानंतर त्याविषयीं केलेला वरवरचा बाहणा कधींही हितकारक होणार नाहीं अतएव तो सर्वथैव निषिद्ध होय.]

कर्माभाव (अकर्म) निरुपयोगी किंवा अशक्य ठरला तर तेवढ्यानेंच कर्म मोक्षदृष्ट्या उपयुक्त आहे, असें होत नाहीं. करितां मोक्षमार्गांत कर्म उपयुक्त आहे किंवा नाहीं या प्रश्नाचें सयुक्तिक व सप्रमाण विवेचन करण्याच्या उद्देशानें भगवान् म्हणतातः—

**यस्त्विन्द्रियाणि मनसा नियम्यारभतेऽर्जुन**
**कर्मेन्द्रियैः कर्मयोगमसक्तः स विशिष्यते ७**

**अर्जुन ! यः तु असक्तः मनसा इंद्रियाणि नियम्य कर्मेंद्रियैः कर्मयोगम् आरभते, सः विशिष्यते।**

अर्जुना ! परंतु, जो फलासक्तिरहित पुरुष ( शुद्धबुद्धीनें ) मनासह ज्ञानेंद्रियांचें नियमन करून कर्मेन्द्रियांनी कर्मयोग करीत राहतो, तोच श्रेष्ठ होय.

[ डोळे, नाक, कान, जिव्हा व त्वचा हीं पांच ज्ञानेंद्रियें होत. कर्मेंद्रियें स्थूल व जड असल्यामुळें तीं ह्या ज्ञानेंद्रियांच्याच स्वाधीन असतात; मन हें ह्या ज्ञानेंद्रियांचें चालक असतें. ह्या इंद्रियांचा विषयांशीं प्रत्यक्ष संबंध असून, विषयांविषयींची आवडनावड (रागद्वेष) इंद्रियांचे ठिकाणीं नैसर्गिकच असते. ह्या रागद्वेषांस आळा घालण्यास असमर्थ असलेलें मन, इंद्रियांच्या आधीन झालेलें असतें. विषयवासनांनीं मलिन व चंचल झालेल्या बुद्धीमध्यें मनाला आवरून धरण्याची शक्ति नसल्यामुळें, तीही इंद्रियाधीन होऊन जाते. ह्याप्रमाणें मन व बुद्धि इंद्रियनियमनाचीं आपापलीं कामें योग्य रीतीनें बजावण्यास असमर्थ झाल्यामुळें, सर्व व्यवहार ह्या रागद्वेषांच्या तंत्रानें चालूं लागतात. अशीं रागद्वेषप्रयुक्त कर्मे, मग तीं बाह्यतः पापकारक दिसोत किंवा पुण्यकारक दिसोत, जीवास बंधनकारकच होतात. विषयवासनांपासून अलिप्त असलेल्या शुद्ध बुद्धीमध्यें मनाचें नियमन करण्याचें सामर्थ्य स्वाभाविकच असतें. शुद्ध बुद्धीच्या कह्यांत वागणारें मन इंद्रियांवर योग्य अधिकार

चालवून रागद्वेषांच्या स्वाधीन न होतां त्यांना शुद्ध बुद्धीच्या तंत्रानें वागविण्यास तयार असतें. ह्याप्रमाणें बुद्धि व मन यांचें योग्य नियमन इंद्रियांवर असलें म्हणजे त्यांची सर्व कर्मे शुद्ध बुद्धीच्या तंत्रानेंच होऊं लागतात. अशी शुद्ध बुद्धि-प्रेरित कर्मे बाह्यतः कशीही दिसलीं तरी, तीं जीवास बंधक होत नाहीत, इतकेंच नव्हे पण, तीं पूर्वकर्मांचा बंधसुद्धां नाहींसा करूं शकतात व हाच कर्म-योग होय. म्हणून मन व इंद्रियें शुद्धबुद्धीनें नियमित करून कर्मयोग आचरण करणारा पुरुष श्रेष्ठ होय. मन व बुद्धि हे अंतःकरणाचेच दोन भाग किंवा स्वरूपें आहेत. एखादी गोष्ट करावी कीं न करावी, अशा संकल्पविकल्पस्थितींत असलेल्या अंतःकरणाच्या वृत्तीस मन असें म्हणतात व त्यांपैकीं अमुकच गोष्ट करावयाची, अशा निश्चयात्मक स्थितींत असलेल्या अंतःकरणाच्या वृत्तीस बुद्धि असें म्हणतात. अंतःकरण हें एक जड पण सूक्ष्म व ज्ञानवाहक अंतरिंद्रिय ( अवयव ) आहे. या श्लोकांत कर्मयोगाची व्याख्या संक्षिप्त पण स्पष्ट आली असून कर्माच्या शुद्ध स्वरूपासच कर्मयोग ही संज्ञा दिली आहे.]

याप्रमाणें सामान्य नियमांनीं सिद्ध झालेल्या प्रमेयाचा व्यक्तिशः अर्जुनास उपदेश करतातः—

**नियतं कुरु कर्म त्वं कर्म ज्यायो ह्यकर्मणः**
**शरीरयात्राऽपिच ते न प्रसिद्ध्येदकर्मणः ८**

**त्वं कर्म नियतं कुरु । हि अकर्मण कर्म ज्यायः । ते शरीरयात्राऽपिच अकर्मणा न प्रसिध्द्येत् ।**

तूं आपलें कर्म ( मागील श्लोकांत सांगितल्याप्रमाणें ) नियत ( शुद्धबुद्धिनियंत्रित ) असें कर. कारण कर्म न करण्यापेक्षां कर्म करणें श्रेष्ठ आहे. आणि तुझें जीवित देखील कर्माशिवाय चालणार नाहीं.

[ मागील श्लोकांत आलेल्या सामान्य नियमाचा या श्लोकांत अर्जुनाला व्यक्तिशः उपदेश केला आहे. येथपर्यंत म्हणजे चवथ्या श्लोकापासून ८व्या श्लोकापर्यंत कर्म-मीमांसेचें जें सामान्य विवेचन झालें त्याचा संगतवार विचार करणें जरूर आहे. कारण या प्रकरणांत आलेली कर्ममीमांसा, ही पुढील सर्व विवेचनाचा पाया आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. या विवेचनांत आलेल्या सिद्धान्ताचे पुढीलप्रमाणें अंश होतात ]:—

(१) कोणत्याही कार्यास त्या कार्याला प्रतिबंधक होणाऱ्या गोष्टींचा अभाव ( नसणें ) कारण असतो, या शास्त्रीय नियमाप्रमाणें पाहिल्यास कर्माचा अभाव ( अकर्म ) हें नैष्कर्म्यसिद्धीचें कारण नव्हे. कारण कर्म हें नैष्कर्म्यसिद्धीला प्रतिबंधक नाहीं.

(२) प्रकृतिजन्य त्रिगुणांचें मिश्रण हें कर्ममय असल्यामुळें त्यापासून उत्पन्न होणाऱ्या सर्व सृष्टपदार्थांचा कर्म हा स्वभावच आहे. बुद्धि हें जडाचें पराकाष्ठेचें उन्नत स्वरूप असलें तरी ती प्रकृतिजन्य असल्यामुळें कर्म हा तिचा देखाल स्वभावच आहे. आणि म्हणूनच सचेतन किंवा अचेतन अशा कोणत्याही पदार्थांची स्थिति क्षणभर देखील कर्मरहित असणें शक्य नाहीं.

(३) देह, इंद्रियें, मन व बुद्धि यांपैकीं एखाद्या भागांत कोणत्या तरी उपायांनीं कांहीं काल कर्म बंद ठेवणें शक्य झालें तरी तें ( कर्मप्रतिबंधक ) निरुपयोगी किंवा हानिकारक असल्यामुळें कोणींही करूं नये.

( ४ ) सदसद्विवेक, स्मृति व इच्छा हे बुद्धीचे धर्म ( कर्म ) होत. त्या धर्मांच्यायोगानेंच मन, इंद्रियें व देह, यांजवर बुद्धीचा ताबा चालतो. परंतु इंद्रियें किंवा मन यांतिल रागद्वेषांचा किंवा विषयवासनांचा ( विकारांचा ) जोर अधिक झाल्यास हें अधिकारचक्र उलटें फिरूं लागतें. व तेंच जीवाच्या अधोगतीस कारण होतें. म्हणून हें अधिकार चक्र योग्य दिशेनें चालू ठेवणेंच श्रेयस्कर असतें. अर्थात् निर्मल व विवेकशील अशा बुद्धीचा मनावर, मनाचा इंद्रियांवर, आणि इंद्रियांचा देहावर, अधिकार राहून जें कर्म घडतें, तेंच शुद्ध कर्म होय. हें शुद्ध कर्म ( कर्मयोग ) नैष्कर्म्यसिद्धीचें मुख्य साधन होय, हा सिद्धान्त व्यक्तीला अनुलक्षून आल्यासारखा दिसला, तथापि तो एकंदर मानवी प्राण्यास लागू होतो.]

**यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबंधनः**
**तदर्थं कर्म कौंतेय मुक्तसंगः समाचार ९**

**यज्ञार्थात् कर्मणः अन्यत्र अयम् लोकः कर्मबंधनः। कौंतेय ! मुक्तसंगः कर्म तदर्थम् समाचर।**

उपासनेच्या हेतूखेरीज इतर हेतूनें कर्म केलें असतां हा मनुष्य कर्मबंधनानें युक्त होतो. ( म्हणून ) ( अर्जुना ) तूं अनासक्त ( होऊन ) आपलें कर्म उपासनेच्या हेतूनेंच कर.

[ आतांपर्यंत आलेल्या कर्ममीमांसेच्या तात्त्विक सिद्धान्ताचें वैदिकधर्मास अनुसरून स्पष्टीकरण करतातः—या श्लोकांत देखील पहिल्या वाक्यांत सामान्य नियम असून, त्याच नियमाचा अर्जुनाला व्यक्तिशः उपदेश दुसऱ्या वाक्यांत केला आहे. या उपदेशांत व पूर्वीच्या सिद्धान्तांत थोडासा शाब्दिक फरक दिसतो इतकेंच. सातव्या श्लोकांत असक्त हें कर्त्याचें विशेषण आलें आहे, व या श्लोकांत मुक्तसंग हें विशेषण आलें असून व तदर्थं (यज्ञार्थ) विशेषण कर्माला दिलें आहे. कर्माचें हें विशेषण पूर्वोक्त सामान्य सिद्धान्तांत नसलें तरी येथें तें त्याच सिद्धान्ताच्या अधिक स्पष्टीकरणार्थ आलें आहे. निस्वार्थ ईश्वरोपासनायुक्त बुद्धीनें नियमित असें जें कर्म घडतें तेंच अर्जुनानें अवश्य करावें असा या उपदेशांतील भगवंतांचा अभिप्राय आहे.

येथें आलेला यज्ञ शब्द फारच व्यापक अर्थाचा आहे. वैदिकधर्माच्या प्राचीन व अर्वाचीन स्वरूपाचा विचार केल्यास त्यांत यज्ञ हा पूर्ण सर्वगामी आहे असें आढळून येतें. यज्ञाचेही प्रकार अनेक आहेत. तरी त्या सर्व प्रकारांची उभारणी उपासनेच्याच तत्त्वावर झाली असल्यानें यज्ञ शब्दाचा उपासना हाच अर्थ व्यापक व निर्दोष आहे. धर्म मग तो व्यष्टीचा म्हणजे व्यक्तीचा असो, किंवा समष्टीचा म्हणजे समाजाचा असो, त्यांत यज्ञाचा (उपासनेचा) संबंध पूर्ण येऊन पोंचतो. व्यक्तिधर्माचें क्षेत्र, पिंड किंवा कुटुंब व समष्टिधर्माचें क्षेत्र, समाज किंवा राष्ट्र होय. विवाह हा कुटुंबसंस्थेचा मूळ पाया आहे. या विवाहांत यज्ञाचा संबंध कसा येतो हें पाहावयाचें असल्यास 'पत्युर्नो यज्ञसंयोगे' (पाणिनि ४।१।३३) या पाणिनीच्या सूत्राचा सूक्ष्मदृष्टीनें विचार केल्यास सहज कळण्यासारखें आहे. यावरून व्यष्टिधर्माचा म्हणजे कौटुंबिक धर्माचा पायादेखील यज्ञावरच (उपासनेवरच) कसा उभारला आहे हें चांगलेंच दिसून येतें. वैदिकधर्माची आज्ञा अशी आहे कीं, उपासनेचा हेतु डोळ्यांपुढें ठेवूनच प्रत्येक मनुष्यानें कर्म केलें पाहिजे. परंतु ही उपासना सकाम किंवा निष्काम अशा दोन्ही रीतींनीं संभवत असल्यामुळें फक्त निष्काम उपासनेवरच अध्यात्मशास्त्राचा कटाक्ष आहे. म्हणजे आपल्या हातून ईश्वरोपासना घडावी ही इच्छा हेंच खरें माणुसकीचें लक्षण असून या उपासनाविषयक इच्छेचेंच शुद्ध स्वरूप गीताशास्त्रानें प्रस्तुत विवेचनांत मुक्तसंग या शब्दानें दाखविलें आहे. निष्काम उपासनेची इच्छा चांगली (शुभेच्छा) असली तरी तिला सदसद्विवेकाची अत्यंत जरूर असते, हें मागील श्लोकांतील

'नियत' या कर्माच्या विशेषणानें दाखविलें आहे. बुद्धिविशिष्ट जीवात्मा कर्माचे बाबतींत सर्वथैव परतंत्रच आहे असें म्हणतां येत नाहीं. तसें असतें तर तूं यज्ञाच्या (उपासनेच्या) हेतूनें कर्म कर, असा भगवंतानें अर्जुनास उपदेश केला नसता. कारण ज्याप्रमाणें कर्म हा प्रकृतीचा किंवा प्रकृतिजन्य सर्व पदार्थांचा नैसर्गिक धर्म आहे, त्याप्रमाणें इच्छादेखील सर्वस्वी प्रकृतीच्याच स्वाधीन असती तर तूं उपासनेची इच्छा धर असें सांगण्याची जरूरच नव्हती. परंतु कर्म किंवा कर्मफल या बाबतींत जीव परतंत्र असला तरी त्या बुद्धिविशिष्ट जीवाला इच्छा–स्वातंत्र्य पूर्ण आहे, असें येथें तदर्थ या शब्दानें भगवंतानीं स्पष्ट दर्शविलें आहे. श्रीकृष्णाच्या या उपदेश वाक्यांत आलेला यज्ञ शब्द व्यष्टिधर्माचा व समष्टिधर्माचाही बोधक आहे. या तत्वावरच वैदिकधर्मांत आश्रमधर्माची व वर्णधर्माची उभारणी केली आहे. अशा अभिप्रायानेंच तूं निष्काम ईश्वरोपासनेचा हेतु धरून आपलें कर्म शुद्धबुद्धीनें नियंत्रित कर असें भगवंतानी विधान केलें आहे.]

यज्ञ म्हणजे उपासना हें व्यक्तिधर्माप्रमाणेंच (वर्णधर्माचें) सामाजिक धर्माचें मूलतत्त्व कसें आहे, तें दाखविण्याकरितां यज्ञचक्राचें वर्णन करितातः—

**सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः**
**अनेन प्रसविष्यध्वमेषवोऽस्त्विष्टकामधुक्** १०

**पुरा प्रजापतिः सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा उवाच। अनेन प्रसविष्यध्वम्। एषः वः इष्टकामधुक् अस्तु।**

पूर्वीं ( कल्पारंभीं ) प्रजापति ( परमेश्वर ) यज्ञासह म्हणजे उपासनाधर्मासह प्रजा ( मानवी प्राणी ) उत्पन्न करून म्हणाला, ह्या ( धर्माच्या ) योगानें तुम्ही ( आपलें ) संवर्धन करून घ्या. हा उपासना ( धर्मच ) तुम्हांला इष्टकामप्रद ( इष्ट मनोरथ पूर्ण करणारा ) होईल.

[ यज्ञ म्हणजे उपासना हेंच आर्यधर्माचें मूळ असल्यामुळें, धर्माच्या कोणत्याही अंगांत अगर स्वरूपांत व्यक्त किंवा अव्यक्त रूपानेंही उपासना आढळून आल्यावांचून रहात नाहीं. म्हणून यज्ञ म्हणजे उपासना, अर्थात् धर्म हा अर्थ लाक्षणिक मानण्याचें कारण नाहीं. 'प्रजा' ह्या शब्दांत सर्व प्राणिमात्रांचा समावेश होत असला, तथापि 'उवाच' (म्हणाला) ह्या शब्दावरून येथें मानवी प्राणीच

विवक्षित आहेत हें उघड आहे. यज्ञ करण्याचा अधिकार प्रत्येक मनुष्यास आहे असें महाभारतांत ( शां० प० अ० ६० श्लो० ५२–५३ ) सांगितलें आहे. त्याप्रमाणें या श्लोकांतील प्रजापतीचा म्हणजे परमेश्वराचा उपदेश एका वर्णास किंवा जातीस अनुलक्षून नसून सर्व शुभेच्छु मनुष्यप्राण्यास आहे असें सिद्ध होतें. सर्व मानवी प्राण्यांस उपासनेचा अधिकार असल्यामुळें 'प्रजा' ह्या शब्दाचा अर्थ 'सर्व मानवी प्राणी' असाच करणें अवश्य आहे. या श्लोकांत आलेलीं 'प्रसविष्यध्वम्' व 'इष्टकामधुक्' हीं दोन पदें सूक्ष्म विचार करण्यासारखीं आहेत. 'प्रसविष्यध्वम्' या पदानें संतति संवर्धन सुचविलें असून 'इष्टकामधुक्' या पदानें नियमित विषयोपभोग सुचविला आहे. आणि या दोहोंनाही यज्ञाची मर्यादा घातली आहे. संततिसंवर्धन करावयाचें असलें तरी तें यज्ञाच्याच मार्गानें करावयास हवें. म्हणजे विवाहधर्माखेरीज संतति संवर्धनास शास्त्राची मुळींच आज्ञा नाहीं. त्याचप्रमाणें 'इष्ट' (योग्य) या विशेषणानें मनुष्याच्या विषयवासना देखील निरर्गल होतां कामा नयेत, असें सुचविलें आहे. यज्ञाच्या साहाय्यानें मनुष्यानें आपले योग्य मनोरथच पूर्ण करून घ्यावेत. अयोग्य व अमर्याद वासनांचा यज्ञाशीं म्हणजे ईश्वरोपासनेशीं मुळींच संबंध येऊं शकत नाहीं. वरील सर्व वर्णन मुख्यतः आश्रमधर्मासच अनुलक्षून दिसतें. यावरून या श्लोकाचा उत्तरार्ध आश्रमधर्माचा बोधक आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.]

यज्ञाचा समाजधर्माकडे म्हणजे वर्णधर्माकडे कसा उपयोग होतो तें सांगतातः–

**देवान् भावयतानेन ते देवा भावयंतु वः**
**परस्परं भावयंतः श्रेयः परमवाप्स्यथ ११**

**अनेन देवान् भावयत। ते देवाः वः भावयंतु। परस्परम् भावयंतः परम् श्रेयः अवाप्स्यथ।**

तुम्ही ह्या ( यज्ञाच्या ) योगानें देवांना संतुष्ट करा. ( म्हणजे ते देव तुम्हांला संतुष्ट करतील, ( ह्याप्रमाणें ) एकमेकांना संतुष्ट करणारे तुम्ही परम श्रेय पावाल.

[ या श्लोकांत अमृतत्वाचा मार्ग उपदेशिला आहे असें यांतील 'परम श्रेय या शब्दावरून कोणाच्याही लक्षांत येईल. मनुष्यांनीं यज्ञानें देवांना संतुष्ट करणें आणि त्याच रीतीनें देवांनीं मनुष्यांना संतुष्ट करणें हाच तो मार्ग होय. या मार्गाचें

स्वरूप अधिक स्पष्ट होण्यास यांतील 'देव' शब्दाच्या अर्थाकडे लक्ष देणें जरूर आहे. प्राचीन ऋषिप्रणीत वाङ्मयांत 'देव' शब्दाच्या अर्थाचा विस्तार फारच मोठा दिसतो. देव म्हणजे आकाशस्थ ज्योती किंवा स्वर्गांत राहाणाऱ्या देवता एवढाच संकुचित अर्थ येथें विवक्षित नाहीं. पूज्य किंवा श्रेष्ठ अशा अर्थाच्या विशेषणासारख्या 'देव' शब्दाचा उपयोग केल्याचें अनेक ठिकाणीं आढळून येतें. हें 'मातृदेवो भव', 'पितृदेवो भव' इत्यादि उपनिषद्वाक्यांवरून सहज सिद्ध होण्याजोगें आहे. त्याप्रमाणेंच या श्लोकांतील 'देव' शब्दाचा अर्थदेखील श्रेष्ठ किंवा पूज्य व्यक्ति अशा व्यापक दृष्टीनेंच घ्यावयास पाहिजे. असा अर्थ घेतल्यास प्रस्तुत श्लोकांतून समाजशास्त्राचा एक महत्त्वाचा नियम निष्पन्न होतो तो असा कीं, 'मनुष्यानें यज्ञाच्या म्हणजे उपासनेच्या पद्धतीनेंच श्रेष्ठ लोकांना संतुष्ट राखावें आणि श्रेष्ठांनीं देखील कनिष्ठांना याच उपासनापद्धतीनें संतुष्ट राखावें.' हा नियम वडील व लहान, श्रीमंत व गरीब, सत्ताधारी व सत्तेंत वागणारे किंबहुना राजा व प्रजा, या सर्व ठिकाणीं परस्पर सहकारितेची भावना म्हणजेच उपासनापद्धति असणें अत्यंत जरूरीचें आहे. मनुष्यानें सामाजिक व्यवहारांत म्हणजे वर्णधर्मांत याच भावनेनें आचरण ठेविलें पाहिजे व हा वर्णधर्मच मनुष्याला मोक्षदायक होतो असें या श्लोकाचें तात्पर्य आहे.]

**इष्टान्भोगान्हि वो देवा दास्यन्ते यज्ञभाविताः**
**तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुंक्ते स्तेन एव सः ॥ १२**

**हि यज्ञभाविताः देवाः वः इष्टान् भोगान् दास्यन्ते। तैः दत्तान् एभ्यः अप्रदाय यः भुंक्ते, सः स्तेनः एव।**

कारण यज्ञानें ( उपासनेनें ) संतुष्ट झालेले देव तुम्हांला इष्ट म्हणजे प्रिय व हितकर भोग्य वस्तु देतील. त्यांनीं ( देवांनीं ) दिलेल्या भोग्य वस्तु त्यांना समर्पण केल्यावांचून जो उपभोगितो तो चोरच होय.

[ या श्लोकांतील देव शब्दाचा अर्थदेखील मागील श्लोकाप्रमाणें व्यापकच घेतला पाहिजे. व्यक्तीच्या जीविताला अवश्य असणारे भोग किंवा त्यांचीं साधनें समाजांतील निरनिराळ्या अधिकारयुक्त वर्गाकडून अगर व्यक्तीकडून प्राप्त व्हावयाचीं असतात व त्यांवरच व्यक्तीचा जीवनक्रम अवलंबून असतो. म्हणून निरनिराळ्या देवतांप्रमाणें व्यक्तिमात्राला समाजाचीदेखील आराधना करावी

लागते. यावरून मनुष्य जें अन्न किंवा संपत्ति मिळवितो त्या संपत्तीनें वा अन्नानें समाजाची आराधना करणें अत्यंत अवश्य आहे. असें असतां मला मिळालेल्या अन्नावर माझ्यावांचून इतर कोणाचाही हक्क नाहीं असें समजणें पाप होय. आपल्यास मिळालेली जीवनसामग्री समाजाच्याच कृपेनें मिळालेली आहे ही गोष्ट नेहमीं ध्यानांत ठेविली पाहिजे. यावरून व्यक्ति व समाज यांचा संबंध अन्योन्यपोषक असला पाहिजे हें उघड आहे. लोकाराधनेप्रमाणेंच निरनिराळ्या देवतांची उपासना-देखील येथें विवक्षित आहे पण समाजाच्या आराधनेची कल्पना गीतेच्या अर्थ-संप्रदायांत नवीन असल्यामुळें तिचें अधिक स्पष्टीकरण केलें आहे ही कल्पना नवीन असली तरी ती मूळ ग्रंथांत विशेष अभिप्रेत आहे यांत शंका नाहीं.]

**यज्ञशिष्टाशिनःसन्तो मुच्यंते सर्वकिल्बिषैः**
**भुञ्जते ते त्वघं पापा ये पचंत्यात्मकारणात्** १३

**यज्ञशिष्टाशिनः संतः सर्वकिल्बिषैः मुच्यंते। ये तु आत्मकारणात् पचंति। ते पापाः अघम् भुञ्जते।**

यज्ञशिष्ट म्हणजे यज्ञ करून म्हणजे देवांना व समाजाला समर्पण करून राहिलेला अवशेष उपभोगणारे सज्जन सर्व पातकांपासून मुक्त होतात. (परंतु) जे स्वतःकरितां केवळ (स्वार्थबुद्धीनेंच) (अन्न) शिजवितात ते पातकी पापच भक्षण करितात.

[असले लोकच अघाशी म्हणजे अधाशी होत, व हा अप्पलपोटेपणा अत्यंत निंद्य मानला जातो.]

जगताच्या धारणपोषणाकरितां म्हणजे लोककल्याणाकरितां यज्ञाची किती आवश्यकता आहे, हें दाखविण्यासाठी पुढील क्रम सांगितला आहे:—

**अन्नाद्भवंति भूतानि पर्जन्यादन्नसंभवः**
**यज्ञाद्भवति पर्जन्यो यज्ञः कर्मसमुद्भवः** १४
**कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि ब्रह्माक्षरसमुद्भवम्**
**तस्मात्सर्वगतं ब्रह्म नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम्** १५

**अन्नात् भूतानि भवंति। पर्जन्यात् अन्नसंभवः। यज्ञात् पर्जन्यः भवति। यज्ञः कर्मसमुद्भवः। कर्म ब्रह्मोद्भवम्। ब्रह्म अक्षरसमुद्भवम्। तस्मात् सर्वगतम् ब्रह्म यज्ञे नित्यम् प्रतिष्ठितम् विद्धि।**

अन्नापासून प्राणी उत्पन्न होतात. पर्जन्यापासून अन्न ( खाद्य-पेय पदार्थ उत्पन्न होतात. ) यज्ञामुळें पर्जन्यवृष्टि होते. यज्ञ हा कर्मानें संपादन होतो, कर्म ब्रह्मापासून ( सगुण ब्रह्मापासून ) उत्पन्न होतें आणि सगुणब्रह्म अक्षर म्हणजे नित्यतत्त्वापासून ( सच्चिदानंद स्वरूपापासून ) प्रगट होतें. यावरून सर्वव्यापी परमेश्वरी तत्त्व यज्ञामध्यें ( उपास्यदेवतारूपानें ) नेहमीं असतें, असें समज.

[ वरील परंपरेंत जगताच्या धारणपोषणार्थ आवश्यक असलेल्या अनेक साधनांपैकीं पर्जन्य हें एक साधन उदाहरणार्थ सांगितलें आहे. ]

याप्रमाणें व्यक्तीच्या व सर्व समाजाच्या कल्याणास अत्यंत अवश्य असलेलें यज्ञचक्र चालविण्याची जबाबदारी प्रत्येक मानवी प्राण्यावर कशी आहे तें सांगतातः—

**एवं प्रवर्तितं चक्रं नानुवर्तयतीह यः**
**अघायुरिंद्रियारामो मोघं पार्थ स जीवति १६**

**पार्थ ! एवम् प्रवर्तितम् चक्रम् यः इह न अनुवर्तयति, सः अघायुः, इंद्रियारामः मोघम् जीवति ।**

अर्जुना ! ह्याप्रमाणें (परमेश्वरानें) सुरू केलेलें हें यज्ञचक्र जो ह्या लोकीं (जिवंत) असून पुढें चालवीत नाहीं, तो पापमय आयुष्याचा, इंद्रियांचा क्रीडास्थान असून व्यर्थ जगतो. (असें समजावें).

[ जगाच्या धारणपोषणाची काळजी वाहण्याची आपल्याला गरज नसल्यामुळें, यज्ञचक्र चालविणेंही भाग नाहीं; असें कोणी म्हणेल तर, त्याला ह्या जगांतील कोणत्याही वस्तूच्या साधनानें आपली शरीरयात्रा चालविण्याचा म्हणजे जगण्याचाही हक्क नाहीं असें भगवंतांनीं येथें स्पष्ट सांगितलें आहे. कारण व्यक्तित्वास ( व्यक्तिधर्मास ) समष्टिधर्म ( समाजधर्म ) हाच नियामक आहे. म्हणजे व्यक्तीनें आपला जीवनक्रम समाजास विघातक न होईल अशा रीतीनेंच आंखला पाहिजे. जगताचें हित करण्यामध्येंच आपलें सर्वस्व खर्ची घालणें यांतच व्यक्तिधर्माची खरी सार्थकता आहे. परंतु तसें करणें आपल्या सामर्थ्याच्या बाहेर आहे असें वाटल्यास लोकहिताच्या आड न येतां व्यक्तीनें आपला जीवनक्रम संन्यासवृत्तीनें चालवावा अशी आर्यधर्मांत सवलत ठेविली आहे हें खरें. परंतु तो श्रेष्ठ कल्प

नव्हे. वेदान्ताचें खरें रहस्य व्यष्टिसमष्टीच्या तादात्म्यांत असल्यामुळें ब्रह्मविद्या-मूलक कर्ममीमांसेचे नियमदेखील त्याच धोरणानें गीताशास्त्रांत कसे ग्रथित केले आहेत हें या सोळाव्या श्लोकापर्यंत फारच उत्कृष्ट रीतीनें दाखविलें आहे. स्मृति-ग्रंथांनींदेखील सर्व वर्णांचे व आश्रमांचे धर्म या यज्ञचक्रास अनुकूल अशाच रीतीनें उपदेशिले आहेत हें कोणाही विचारी माणसास निराळें सांगावयास नको. यज्ञ ज्याप्रमाणें व्यष्टिधर्मांत त्याप्रमाणेंच समष्टिधर्मांत कसा अनुस्यूत आहे हें येथें उघड सिद्ध झालें आहे. याप्रमाणें जे जे व्यापक स्वरूपाचे धर्म आहेत ते ते प्रत्येकानें अवश्य पाळले पाहिजेत असा भगवंतांनीं आपला निश्चित अभिप्राय व्यक्त केला आहे. श्लोक १० पासून आतांपर्यंतच्या आलेल्या विवेचनांत दोन भाग दिसतात. श्लोक १० ते १३ अखेर आलेल्या विवेचनांत वर्णधर्म व आश्रमधर्म यांची अन्योन्य सहकारिता दाखविली असून १४ व १५ या श्लोकांत अन्न व भूतें वगैरे गोष्टींचा एकमेकांशीं कार्यकारणभाव दाखविला आहे या दोन्ही भागांस अनुलक्षून प्रस्तुत श्लोकांत ‘चक्र’ हा शब्द आला आहे हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. वण व आश्रम यांतील चक्राकार संबंध यज्ञमूलक असल्यामुळें आम्ही त्याला यज्ञचक्र असें म्हटलें आहे.]

वरील श्लोकांत सांगितलेल्या नियमांतून सोडवणूक असल्यास त्याची मानसिक स्थिति कोणत्या प्रकारची असावयास पाहिजे तें सांगतातः—

**यस्त्वात्मरतिरेवस्यादात्मतृप्तश्च मानवः**
**आत्मन्येव च संतुष्टस्तस्य कार्यं न विद्यते** १७

**तु यः मानवः, आत्मरतिः, आत्मतृप्तः एव च, आत्मनि एव संतुष्टः च, तस्य कार्यम् न विद्यते।**

परंतु जो मनुष्य आत्मज्ञानांत रममाण असणारा, आत्मज्ञानानें तृप्त व आत्मज्ञानाविषयींच संतुष्ट असतो त्याला स्वतःचें कार्य म्हणजे करावयाचें कांहीं नसतें.

**नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन**
**न चास्य सर्वभूतेषु कश्चिदर्थव्यपाश्रयः** १८

**इह तस्य कृतेन न, अकृतेन एव न अर्थः अस्य सर्व भूतेषु कश्चित् अर्थव्यपाश्रयः न च।**

कारण येथें (या जगांत) त्याला कांहीं करण्यानें किंवा न करण्यानें (स्वतःकरितां) कांहीच मिळवावयाचें नसतें, त्याचप्रमाणें त्याचें स्वतःचें हित कोणत्याही पदार्थावर अवलंबून नसतें.

[ रति, तृप्ति व संतोष हे मनोधर्म आहेत. या तीनही मनोधर्मांची किंवा त्यापैकीं एखाद दुसऱ्याची तरी प्राणिमात्राच्या जीवितास आवश्यकता असते. ज्याप्रमाणें खाद्यपेयपदार्थांवांचून मनुष्याची शरीरयात्रा चालत नाहीं, त्याप्रमाणेंच मनःस्वास्थ्यावांचूनदेखील मनुष्याचें जीवित चालणार नाहीं. वर सांगितलेल्या तीन मनोधर्मांपैकीं कोणत्या तरी एकाची मनःस्वास्थ्यास आवश्यकता आहे.सामान्य मनुष्याचे हे मनोधर्म प्रायः विषयोपभोगावर अवलंबून असतात परंतु ज्ञानी मनुष्याची रति, तृप्ति व संतोष या मनोवृत्ति विषयोपभोगांवर अवलंबून नसतात त्यांच्या त्या ज्ञानावर अवलंबून असतात. आणि म्हणूनच ज्ञानी माणूस जीं वर्णाश्रमधर्मांचीं कर्तव्यें करतो–म्हणजे यज्ञचक्र चालवितो—तें स्वतःच्या रति किंवा तृप्तीकरितां नसून केवळ ईश्वरोपासनेच्या बुद्धीनेंच चालवितो. यावरून साधक किंवा सिद्ध कोणीही असला तरी त्याला हें यज्ञचक्र स्वार्थाकरितां चालवावयाचें नसतें. या दोन श्लोकांत केवळ संन्यासमार्गाचेंच वर्णन आहे असें सकृद्दर्शनी भासतें, पण मागील व पुढील श्लोकांचा विचार केल्यास हे श्लोक केवळ संन्यासमार्गाचे दर्शक नसून निष्कामकर्मयोगी स्थितप्रज्ञालाही लागू होण्यासारखे आहेत, हें कोणाच्याही सहज लक्षांत येईल.

कदाचित् या श्लोकांतील वर्णन केवळ संन्यासमार्गीयांचेंच आहे असें मानलें तरीदेखील त्यावरून कर्मयोगाचें महत्व मुळीच कमी होत नाहीं. येथें विवक्षित असलेला ज्ञानी पुरुष संन्यासवृत्तीचाच आहे असें धरलें तर १६ व्या श्लोकांत सांगितलेल्या नियमाप्रमाणें असा ज्ञानवान् संन्यासी अघायु (पापी) होत नाहीं येवढेंच सिद्ध होईल.

कर्मयोगी स्थितप्रज्ञ असेल तर तो लोकसंग्रहार्थ कर्म करीलच पण सर्वकर्मसंन्यासमार्गीयानें हें यज्ञचक्राचें कर्म न केल्यास तो पापी व बद्ध होईल अशी शंका घेण्यास जागा राहूं नये इतकाच या श्लोकांतील हेतु आहे. तेवढ्यावरून कर्मसंन्यास गीतेंत अभिप्रेत आहे असें म्हणणें सर्वस्वीं चुकीचें होय हें येथें निराळें सांगावयास नकोच.

यज्ञचक्र न चालविण्यानें ज्ञानी पुरुषास पाप लागलें नाहीं तरी ज्ञानी पुरुषाच्या या उदासीन वृत्तीनें वर्णाश्रमधर्माची घडी विसकटून लोकसंग्रह बिघडतो म्हणून निष्कामबुद्धीनें हें वर्णाश्रमधर्मरूप यज्ञचक्र चालविणेंच अधिक श्रेयस्कर आहे तें सांगतातः—

**तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर**
**असक्तो ह्याचरन् कर्म परमाप्नोति पूरुषः १९**

**हि, असक्तः पूरुषः, कर्म आचरन् परम् आप्नोति। तस्मात् ( त्वम् ) असक्तः कार्यम् कर्म सततम् समाचर।**

ज्या अर्थीं अनासक्त म्हणजे निष्कामबुद्धीचा पुरुष ( यज्ञार्थ व नियत ) कर्माचें आचरण करीत असतां अमृतत्व मिळवितो, त्या-अर्थीं तूं निष्कामबुद्धीनें कार्य म्हणजे करावयाचें ( नियत कर्तव्य ) नेहमीं आचरण कर ( कर्मयोगाचें आचरण कर).

[ ह्यावरून साधकानें आत्मोन्नतीकरितां व सिद्धानें लोककल्याणाकरितां कर्मयोगाचरण करणें सारखेंच अवश्य आहे असें सिद्ध होतें ]

ह्या नियमास प्राचीन उदाहरण सांगतातः—

**कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः**
**लोकसंग्रहमेवाऽपि संपश्यन्कर्तुमर्हसि २०**

**हि, कर्मणा एव जनकादयः संसिद्धिम् आस्थिताः। लोकसंग्रहम् अपि संपश्यन् ( कर्म ) कर्तुम् एव अर्हसि।**

कारण, कर्मयोगानेंच जनकादिक महात्मे अमृतत्वाला प्राप्त झाले आहेत. ( अमृतत्व प्राप्त झालें तरी देखील ) लोककल्याणाकडे लक्ष्य देऊन सुद्धां तुला कर्मयोगच आचरिला पाहिजे.

[ जनकादिकांच्या उदाहरणावरून कर्मयोगानें अमृतत्व प्राप्त होतें हें येथें सिद्ध केलें आहे, व सिद्धावस्था प्राप्त झाल्यावर केवळ लोककल्याणार्थ हें यज्ञचक्र चालविणें अवश्य आहे, असें दाखविलें आहे.

येथवर केलेल्या विवेचनावरून कर्मयोग हेंच नैष्कर्म्यसिद्धीचें म्हणजे अमृतत्वाचें अवश्यक व उत्कृष्ट साधन होय. चौथ्या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें कर्माचा कोणत्याही प्रकारचा कर्माभाव नैष्कर्म्यसिद्धीला अवश्य तर नाहींच उलट निसर्ग-

विरुद्ध आहे असें ठरतें. म्हणून साधकानें आत्मोन्नतीकरितां (मोक्षाकरितां) या निष्कामबुद्धीच्या कर्मयोगाचेंच अवलंबन करणें अवश्य आहे असें सिद्ध होतें.]

सिद्धांना लोकसंग्रहाकरितां कर्मयोगाचें आचरण करणें कां अवश्य आहे, तें सांगतातः—

**यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः**
**स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते** २१

**श्रेष्ठः यत् यत् आचरति, तत् तत् एव इतरः जनः आचरति। सः यत् कुरुते, तत् प्रमाणम् लोकः अनुवर्तते।**

श्रेष्ठ पुरुष जें जें करितो, तेंच इतर (सामान्य) करीत असतात. तो (श्रेष्ठ) जें कर्म करतो त्याला (कर्माला) प्रमाण समजून लोक अनुसरतात.

[ धर्माधर्मनिर्णयाचे वेळीं श्रुतिस्मृति प्रमाण मानावयाच्या त्याचप्रमाणें सदाचार हेंही एक प्रमाण शास्त्रसंमत आहे. 'सत्' म्हणजे स्थितप्रज्ञ सिद्ध यांचा आचार हाच प्रमाणभूत सदाचार होय. स्थितप्रज्ञ सिद्ध पुरुषाचें आचरण लोकांपुढें आदर्शरूपानें असतें. म्हणून अनियत म्हणजे निरर्गल आचरणानें सिद्ध पुरुषाचें स्वतःचें कोणतेंही नुकसान होण्यासारखें नसलें तरी, त्याच्या अनियत आचरणानें सामान्य लोकांची दिशाभूल झाल्यावांचून रहात नाहीं, म्हणून स्थितप्रज्ञानें लोककल्याणाकडे दुर्लक्ष करणें कधींही इष्ट नाहीं.]

वरील नियमास स्वतःच्या आचरणाचें उदाहरण सांगतातः—

**न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किंचन**
**नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एव च कर्मणि** २२

**पार्थ! त्रिषु लोकेषु मे किंचन कर्तव्यम् न अस्ति। अनवाप्तम्, अवाप्तव्यम् न च, कर्मणि एव वर्ते।**

अर्जुना! ह्या तिन्ही लोकांत मला स्वतःकरितां कांहींच कर्तव्य ( करावयाचें ) नाहीं, ( कारण ), मला अप्राप्त किंवा प्राप्तव्य कांहींच नाहीं. ( तथापि ) मी कर्मामध्येंच वर्तत आहें म्हणजे कर्मयोग आचरीत आहें.

**यदि ह्यहं न वर्तेयं जातु कर्मण्यतंद्रितः**
**मम वर्त्मानुवर्तंते मनुष्याः पार्थ सर्वशः २३**

**हि, पार्थ ! यदि जातु अहम् कर्माणि अतंद्रितः न वर्तेयम्, मनुष्याः मम वर्त्म सर्वशः अनुवर्तंते ।**

कारण, अर्जुना ! जर क्वचित् प्रसंगीं मी कर्मांत दक्षपणें वागणार नाहीं, म्हणजे कर्तव्याविषयीं थोडेंसें दुर्लक्ष करीन, तर लोक माझ्याच मार्गाला म्हणजे दुर्लक्षाला ( अव्यवस्थेलाच ) पूर्णपणें अनुसरतील.

ह्याप्रमाणें श्रेष्ठ पुरुषाच्या कर्तव्यतत्परतेंत थोडासा जरी निष्काळजीपणा झाला तरी त्यामुळें केवढा अनर्थ गुदरण्याचा संभव आहे तें सांगतातः—

**उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यां कर्मचेदहम्**
**संकरस्य च कर्ता स्यामुपहन्यामिमाः प्रजाः २४**

**अहम् कर्म न कुर्याम् चेत्, इमे लोकाः उत्सीदेयुः । संकरस्य कर्ता स्याम् । इमाः प्रजाः उपहन्याम् च ।**

( जर ) मीं कर्तव्य केलें नाहीं तर हे सर्व लोक उत्सन्न होतील ( म्हणजे समाजव्यवस्थेचा उच्छेद होऊन लोक उन्मार्गगामी होतील. ) वर्णसंकराचा कर्ता मीच होईन, आणि ( तेणेंकरून ) मी ह्या सर्व मानवी जातीचा घात केलासें होईल.

[ भगवंतांनीं कर्मयोगाची आवश्यकता स्वतःच्याच उदाहरणानें सिद्ध केली असल्यामुळें, त्याबद्दल मतभेद होण्याचें मुळींच कारण नाहीं. ह्याप्रमाणें साधकावस्थेंत कर्मयोगाची आवश्यकता दाखविण्याकरितां जनकाचें उदाहरण देऊन, सिद्धावस्थेंतही लोकसंग्रहार्थ कर्मयोगाची कशी आवश्यकता असते, हें स्वतःच्या उदाहरणानें सिद्ध केलें आहे. कारण, भगवान् श्रीकृष्ण हीच सिद्धावस्थेची पराकाष्ठा होय. शिवाय, अलीकडे २।३ हजार वर्षे कर्मयोगास पारख्या झालेल्या आमच्या राष्ट्राची अधोगति हेंच कर्मयोगलोपाच्या दुष्परिणामांचें प्रत्यक्ष उदाहरण आहे. अर्जुनानें आपल्या पूर्वपक्षांत कुलक्षयाचा दुष्परिणाम म्हणून वर्णसंकरांचा दोन वेळां उल्लेख केला आहे. (अ० १ श्लो० ४१ व ४३) अर्जुनाच्या भाषणांतील पूर्वापार संबंध लक्षांत आणल्यास जातिसंकर अशा अर्थानेंच वर्णसंकर हा शब्द आला आहे, आणि या जातिसंकराबद्दलच अर्जुनास फार भीति वाटत आहे.

अर्जुनाच्या या शंकेचें उत्तर भगवंतांनीं प्रस्तुत श्लोकांत दिलें आहे, तें असें कीं, कुलक्षयापासून होणाऱ्या जातिसंकरापेक्षां वर्णधर्माचा त्याग केल्यानें होणारा वर्णधर्माचा संकर अधिक भयंकर आहे. जातिसंकरापासून कुलाचा नाश होईल तर वर्णधर्माचा संकर राष्ट्रघातक होईल असा भगवंतांचा अभिप्राय आहे.]

याकरितां स्थितप्रज्ञानेंदेखील कर्मयोगाचें आचरण किती आस्थापूर्वक केलें पाहिजे तें सांगतातः—

**सक्ताः कर्मण्यविद्वांसो यथा कुर्वंति भारत**
**कुर्याद्विद्वांस्तथाऽसक्तश्चिकीर्षुर्लोकसंग्रहम्** २५

**भारत ! अविद्वांसः कर्माणि सक्ताः यथा कुर्वंति, तथा लोकसंग्रहम् चिकीर्षुः असक्तः विद्वान् कुर्यात् ।**

अर्जुना ! अविद्वान् म्हणजे सामान्य लोक फलाच्या इच्छेनें (आस्थापूर्वक) कर्म करीत असतात, त्याप्रमाणेंच ज्याला लोकसंग्रहाचीच केवळ इच्छा उरलेली असते अशा, फलाविषयीं अनासक्त असलेल्या विद्वानानें म्हणजे स्थितप्रज्ञानें कर्तव्य कर्म (आस्थापूर्वक) केलें पाहिजे.

[अज्ञानी मनुष्यांचीं कर्मे व स्थितप्रज्ञाचीं कर्मे स्वरूपतः सारखींच असतात. अज्ञानी मनुष्य कर्माविषयीं कर्तृत्वाभिमानी व फलासक्त असतो. पण ज्ञानी मनुष्याचे ठिकाणीं हा अभिमान व आसक्ति मुळींच नसते. तथापि फलासक्त मनुष्य जशा तत्परतेनें कर्म करतो तशाच तत्परतेनें ज्ञानी मनुष्यानें लोकहिताचें कर्म केलें पाहिजे असें या श्लोकात भगवंतांनीं स्पष्ट बजावलें आहे.]

निष्कामबुद्धीच्या अशा स्थितप्रज्ञाच्या ठिकाणीं ही तत्परता कां असावयास पाहिजे त्याचें कारण सांगतातः—

**न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसंगिनाम्**
**जोषयेत्सर्वकर्माणि विद्वान्युक्तः समाचरन्** २६

**कर्मसंगिनाम् अज्ञानाम् बुद्धिभेदम् न जनयेत् । युक्तः विद्वान् सर्वकर्माणि समाचरन् जोषयेत् ।**

कर्मामध्यें आसक्त असलेल्या (अज्ञ) सामान्य लोकांचा (कर्माविषयीं) बुद्धिभेद म्हणजे गैरसमज (विद्वानानें आपल्या

अनियत वर्तनानें ) उत्पन्न करूं नये. योगयुक्त ज्ञानसंपन्न पुरुषानें सर्व कर्में स्वत: उत्तम रीतीनें आचरण करून ( जनतेला सन्मार्ग दाखविण्याकरितां सामान्य जनांकडून ) तीं करविलीं पाहिजेत; म्हणजे स्वतः-च्या उदाहरणानें त्यांची सत्कर्माचरणाकडे प्रवृत्ति वळविली पाहिजे.

[ श्रेष्ठ मनुष्याची कर्तव्यतत्परता सामान्यतः दोन कारणांनीं ढिली होते. एक कर्माच्या योगानें त्याला कांहीं मिळवावयाचें नसतें व दुसरें तो उच्च कोटींतील असल्याकारणानें सामान्य मनुष्याप्रमाणें त्याला कर्में बंधनकारक होत नाहींत. अशा कारणांनीं ज्ञानी मनुष्याची कर्तव्यतत्परता ढिली पडूं लागली म्हणजे सामान्य मनुष्यास त्याच्याविषयीं अलौकिक ( लोकविलक्षण )पणा वाटूं लागतो. ही अलौकिक कल्पनाच कर्मयोगातील बुद्धिभेदाचें मूळ कारण होय. अशी स्वतःविषयीं अलौकिक कल्पना जनतेमध्यें उत्पन्न होऊं नये याकरितां ज्ञानी माणसानें स्वतःची कर्तव्यतत्परता कडकपणानें राखणें जरूर असतें. याकरितां लोकसंग्रहाला विघातक अशा बुद्धिभेदाला कारणीभूत होणारा कर्माविषयींचा अव्यवस्थितपणा ज्ञानी मनुष्याच्या वर्तनांत असतां कामा नये असा भगवंतांचा कटाक्ष आहे. अशा पद्धतीनें लोकांत कर्तव्यजागृति उत्पन्न होऊन स्थित-प्रज्ञाचा लोकसंग्रहाचा मार्ग सुकर व परिणामकारक होतो.]

सामान्य लोक फलाविषयीं आसक्त कां असतात ते सांगतातः—

**प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः**
**अहंकारविमूढात्मा कर्ताऽहमिति मन्यते** २७

**सर्वशः कर्माणि प्रकृतेः गुणैः क्रियमाणानि । अहंकारविमूढात्मा, अहम् कर्ता इति मन्यते ।**

सर्व कर्में प्रकृतीच्या सत्त्वरजतमोगुणांकडून केलीं जातात. ( असें असतां ), मीपणानें ज्याचें अंत:करण मूढ म्हणजे विचारहीन झालेलें असतें, तो ह्या कर्मांचा मीच कर्ता आहे असें मानितो.

[ अध्याय २ श्लोक ४७ व अध्याय ३ श्लोक ५ यांतील कर्मविवेचनास अनु-सरूनच प्रस्तुत श्लोकाचें तात्पर्य आहे. सृष्टीची उत्पत्ति प्रकृतीच्या गुणापासून असल्यामुळें, व कर्म हा गुणाचा स्वाभाविक धर्मच असल्यामुळें, सर्व सृष्टि कर्म-मय आहे असें ठरतें. सृष्टींतच देह, इंद्रियें, मन व बुद्धि यांचाही अंतर्भाव होत

असल्यामुळें, ह्यांचेंही स्वाभाविक कर्म बंद रहात नाहीं. अध्याय २ श्लोक १६ ते ३० यांतील विवेचनावरून, आत्मा हा प्रत्यक्ष कर्मांचा कर्ता नसतो, असें सिद्ध झालें आहे. अहंप्रत्यय म्हणजे मी ही भावना ज्या वेळीं शुद्ध आत्मस्वरूपाविषयींच असते, तेव्हां त्यास अहंकार अशी संज्ञा असत नाहीं. परंतु देह, इंद्रियें, बुद्धि इत्यादि समूहाविषयीं हा अहंप्रत्यय असतो, तेव्हांच त्यास अहंकार अशी संज्ञा देण्यांत येते. या अहंकाराच्या योगानें म्हणजे जीवात्म्याच्या अज्ञानजन्य गैर-समजुतीमुळेंच देहेंद्रियांच्या उपभोगांशीं स्वतःचा संबंध जोडून ते उपभोगणारा मी आहे, असाही त्याचा चुकीचा ग्रह होतो. ह्या अज्ञानामुळें, उपभोगवासनाधीन झालेल्या जीवात्म्याची बुद्धि सदसद्विवेक करण्यास असमर्थ होते व तेणेंकरून उपभोगाप्रमाणेंच बुद्धींद्रियांचें कर्मही आपलें स्वतःचें समजून त्यांचा आपण साक्षात् कर्ता आहों, असेंही तो मानूं लागतो, त्यामुळेंच कर्मफलाविषयीं त्याच्या ठिकाणीं आसक्ति उत्पन्न होते.]

ह्याच्या उलट आत्मवेत्त्याची आसक्ति कां असत नाहीं तें सांगतातः—

**तत्त्ववित्तु महाबाहो गुणकर्मविभागयोः**
**गुणा गुणेषु वर्तंते इति मत्वा न सज्जते** २८

**महाबाहो ! तु गुणकर्म-विभागयोः तत्त्ववित्, 'गुणाः गुणेषु वर्तंते,' इति मत्वा न सज्जते ।**

परंतु अर्जुना ! गुण म्हणजे इंद्रियें, विषय इत्यादि ( प्रकृति गुणा-पासून उत्पन्न झालेले ) पदार्थ व कर्म म्हणजे संयोगवियोगादि व्यापार यांच्या विभागांचें म्हणजे वर्गांचें तत्त्व जाणणारा ( पदार्थ-विज्ञानसंपन्न ) तत्त्ववेत्ता 'गुणच गुणाचे ठिकाणीं वावरतात,' म्हणजे प्रकृतीचे गुणच कर्मरूपानें परिणत होतात असें ओळखून कर्मांचे ठिकाणीं आसक्त होत नाहीं.

[ वैदिक त्रिवृत्करण किंवा त्याच्या अलीकडील पंचीकरण याचा विचार केल्यास आकाशापासून पृथ्वीपर्यंतची भौतिक सृष्टि, आणि वनस्पतीपासून मनुष्यापर्यंतची जीवसृष्टि हे सर्व प्रकृतीच्या गुणांचेंच परिणत स्वरूप आहे असें वेदान्तशास्त्रानें सिद्ध केलें आहे. अर्थात् या सृष्टपदार्थांचा व्यापार म्हणजे कर्म हाही प्रकृतीचा गुण-परिणाम होय असें म्हणण्यास हरकत नाहीं. या दृष्टीनेंच पदार्थ व त्यांचे

व्यापार या दोहोंचेही प्रकृति-गुण हे मूलस्वरूप असल्यामुळें गुणच गुणांचे ठिकाणीं वावरत आहेत असें या श्लोकांत म्हटलें आहे, सृष्ट पदार्थांचें तात्त्विक वर्गीकरण पूर्णपणें समजेल तरच कर्तव्याभिमान व फलासक्ति नष्ट होते.]

**प्रकृतेर्गुणसंमूढाः सज्जंते गुणकर्मसु**
**तानकृत्स्नविदो मंदान् कृत्स्नविन्न विचालयेत्** २९

**प्रकृतेः गुणसंमूढाः गुणकर्मसु सज्जंते । तान् अकृत्स्नविदः मंदान्, कृत्स्नवित् न विचालयेत् ।**

**प्रकृतीच्या गुणांविषयीं अज्ञानी म्हणजे पदार्थ विज्ञान-शून्य असलेले पुरुष, गुणकर्मांतच म्हणजे विषयोपभोगांतच आसक्त असतात. अशा अर्धवट अविवेकी लोकांचा पूर्णज्ञानी (स्थितप्रज्ञ) पुरुषानें गैरसमज करूं नये.**

[गुणकर्माचें तत्त्वज्ञान नसल्यामुळें मनुष्याचे ठिकाणीं सदोष अहंकार उत्पन्न होतो. असले अहंकारी लोक कर्म करण्यांत कुशल असले तरी परमार्थदृष्ट्या ते अर्धवटच असतात. अशा अर्धवटांच्या फलासक्तीबरोबर कर्तव्यतत्परताही नष्ट होण्याचा संभव असतो. ही फलासक्ति नाहींशी व्हावी, पण तिच्याबरोबर कर्तव्य-तत्परता नाहींशी होऊं नये, याविषयीं तत्त्वज्ञानी माणसानें काळजी घेतली पाहिजे. मागें २५ व २६ व्या श्लोकांत आलेल्या विषयाचा संदर्भ येथें जोडून घेतला असून हें लोकसंग्रहाचें प्रकरण पुरें केलें आहे.]

ह्याप्रमाणें कर्मयोगाच्या आवश्यकतेचें विवेचन करून श्लोक ९ यांत केलेल्या विधानाचें निगमन करितातः—

**मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्याध्यात्मचेतसा**
**निराशीर्निर्ममो भूत्वा युध्यस्व विगतज्वरः** ३०

**अध्यात्मचेतसा, सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य, निराशीः निर्ममः भूत्वा विगतज्वरः (सन्) युध्यस्व ।**

**(म्हणून) शुद्धबुद्धीनें नियंत्रित केलेल्या अंतःकरणाच्या—(मनाच्या) योगानें (इंद्रियांकडून घडणारीं) सर्व कर्मे माझ्या—(परमेश्वराच्या) ठिकाणीं समर्पण करून, फलाशारहित व ममताशून्य होऊन, शोक-मोहरहित होत्साता (शांत चित्तानें) युद्ध कर.**

[ श्लोक ९ यांत, भगवदुपासनेच्या हेतूनें योगयुक्त बुद्धीनें कर्मयोग अवश्य आचरिला पाहिजे असें भगवंतांनीं जें विधान केलें आहे, त्याचें विवेचन यज्ञचक्र, कर्मयोगाचें मोक्षसाधनत्व व त्यास जनकादिकांचें उदाहरण, लोकसंग्रहाची आवश्यकता आणि बुद्धिभेदाचा निषेध ह्या क्रमानें सोपपत्तिक करून, शेवटीं ह्या श्लोकांत वरील विधानाचें निगमन केलें आहे. हा श्लोक बुद्धियोगाच्या पांचही अंशांस अनुलक्षून आहे. **कर्माणि संन्यस्य** या पदावरून **निस्त्रैगुण्य**, **अध्यात्मचेतसा** यानें **आत्मवान्**, **निराशीः** यानें **निर्योगक्षेमः**, **निर्ममः** यानें **निर्द्वंद्व** व **विगतज्वरः** यानें **नित्यसत्त्वस्थः** असे पांच अंश दाखविले आहेत. ह्या कर्मयोगाधिकरणात प्रतिपादन केलेला कर्मयोग हें बुद्धियोगाचेंच ( योगनिष्ठेचें ) दृश्य ( व्यावहारिक ) स्वरूप होय, असें सिद्ध होतें. ह्या कर्मयोगाधिकरणावरून, सृष्टिनियमानुसार सहज होत राहणारें कर्म बंद करणें जीवांच्या स्वाधीन नाहीं; तथापि त्याचा योग्य उपयोग करून घेण्याच्या बाबतींतमात्र जीवाला स्वातंत्र्य आहे. म्हणून त्यानें उपासनारूप यज्ञमय हेतूनें आपली बुद्धि शुद्ध करून, सहज घडणाऱ्या कर्मास नियत करणें म्हणजे योग्य वळण लावणें ( कर्मयोगाचें स्वरूप देणें ) अवश्य आहे हा कर्मयोग स्वहिताच्या दृष्टीनें साधकांस व लोकसंग्रहाच्या दृष्टीनें सिद्धांस यावज्जीव आवश्यक आहे, असें सिद्ध होतें.]

ह्याप्रमाणें बुद्धियोग प्राप्त होण्यापूर्वी अज्ञजनांनीं कसें वागावें तें सांगतातः—

**ये मे मतमिदं नित्यमनुतिष्ठंति मानवाः**
**श्रद्धावंतोऽनसूयंतो मुच्यंते तेऽपि कर्मभिः ३१**

**ये मानवाः अनसूयंतः श्रद्धावंतः मे इदम् मतम् नित्यम् अनुतिष्ठंति। ते अपि कर्मभिः मुच्यंते।**

जे (अज्ञ) लोक असूया म्हणजे दोषैकदृष्टि सोडून श्रद्धा म्हणजे आस्थेवाईकपणानें माझें हें मत नेहमीं आचरितात, ते देखील कर्मापासून म्हणजे कर्मबंधापासून मुक्त होतात.

[ बुद्धि शुद्ध होण्यापूर्वी घडणारीं कर्में श्रद्धायुक्त अंतःकरणानें (आस्थेवाईकपणानें) परमेश्वरार्पण करण्याची संवय मनाला लावली असतां, त्यानेंही बुद्धियोग प्राप्त होऊन कर्मयोग पूर्ण होतो.]

**ये त्वेतदभ्यसूयंतो नानुतिष्ठंति मे मतम्**
**सर्वज्ञानविमूढांस्तान्विद्धि नष्टानचेतसः ३२**

**ये तु अभ्यसूयंतः मे एतत् मतम् न अनुतिष्ठंति। तान् सर्वज्ञान-विमूढान् अचेतसः नष्टान् विद्धि।**

परंतु, जे दोषैकदृष्टि लोक माझ्या पूर्वोक्त मताचें आचरण करीत नाहींत, ते कोणत्याही ज्ञानाविषयीं अत्यंत मूर्ख ( अपात्र ) व विचार-शून्य, ( अतएव ) बुडाले असें समज.

[ ज्यांच्या अंगीं श्रद्धाही नाहीं व गुणग्राहकताही नाहीं त्यांना मात्र कर्मयोग प्राप्त होणें अगदीच असंभवनीय होय. यावरून नुसत्या सरळ मनाचीं श्रद्धावान् माणसें देखील कर्मयोग प्राप्त करून घेण्यास पात्र होतात, असें ठरतें.

श्लोक ३१ व ३२ यांमध्यें अनुकूल व प्रतिकूल फलश्रुति सांगून कर्मयोगाचें सामान्य विवेचन पुरें केलें आहे, अ० ३ श्लोक ९ यामध्यें या कर्मयोगाधिकरणाचें पहिलें विधान आलें आहे. तथापि त्याच्याच मागें म्हणजे ६ व्या श्लोकांत कर्म-योगाचें लक्षण आहे म्हणून तेथपासून कर्मयोगाच्या सामान्य विवेचनास सुरवात झाली आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. या प्रकरणांत मुख्यत्वेंकरून यज्ञचक्र व लोकसंग्रह असे दोन विषय आले आहेत. ते अत्यंत व्यापक व केवळ सार्वजनिक स्वरूपाचे असल्यामुळें त्यांत समष्टीच्या (समाजाच्या किंवा विश्वाच्या) धर्माचें प्रतिपादन झालें. परंतु व्यक्तीच्या धर्माचा व्हावा तसा स्पष्ट खुलासा झाला नाहीं. कर्मयोगाच्या सामान्य विवेचनांतून गीतेच्याच शब्दांनीं कर्मयोगाचें लक्षण पुढील-प्रमाणें तयार होतें. " **असक्त, यज्ञार्थ, व बुद्ध्यधिष्ठितमनःकृतज्ञानेंद्रिय-नियमनपूर्वक, कर्मेंद्रियाचरित कर्म** " (फलेच्छारहित, ईश्वरोपासनेच्या इच्छेनें युक्त अशा बुद्धीच्या कह्यांत असलेल्या मनानें ज्ञानेंद्रियांचें नियमन करून कर्मेंद्रियांनीं आचरलेलें कर्म ) हा कर्मयोग होय.

या लक्षणाचा विचार केल्यास कर्मयोग हा समष्टिधर्म आहे असें ठरतें. प्रत्येक मानवी व्यक्तीला हा धर्म अवश्य आहे, परंतु व्यक्तीचें कर्म मर्यादित स्वरूपाचें असल्यामुळें त्याच्या बाह्य स्वरूपांत वैचित्र्य आल्यावांचून रहात नाहीं, आणि म्हणूनच व्यक्तिधर्माचें क्षेत्र निश्चित करण्याकरितां वरील सामान्य कर्मयोगाच्या सामान्य लक्षणांत कांहीं फिरवाफिरव करावयास पाहिजे कीं काय असा साहजिकच प्रश्न उत्पन्न होतो. या प्रश्नाचा विचार करण्याकरितांच पुढील तीन श्लोकांचें प्रकरण आलें आहे. नाहीं तर विवेचन पुरें करून फलश्रुति सांगितल्यानंतर पुनः त्याच विषयाचा उल्लेख करणें अप्रशस्त होतें असा अप्रशस्तपणा गीतेंत कोठेंही दिसून

यावयाचा नाहीं. वरील सामान्य–विशेषाबद्दलचा प्रश्न समाधानकारक रीतीनें सोडविण्याकरितांच हें प्रकरण आलें आहे. ह्या तीन श्लोकांत प्रतिपादन केलेला विषय जमेस धरला नाहीं तर मर्यादित व्यक्तिधर्माचा प्रश्न तसाच शिल्लक राहून एकंदर शास्त्रार्थास थोडीशी उणीवच येईल शास्त्रार्थामध्यें अशी कोणत्याही प्रकारें उणीव राहूं नये या हेतूनेंच भगवंतांनी पुढील प्रकरण सुरू केलें आहे.]

प्रथम या सृष्टीत मनुष्यावर प्रकृतीचें पारतंत्र्य निदानपक्षीं कितपत राहील तें सांगतातः—

**सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि**
**प्रकृतिं यांति भूतानि निग्रहः किं करिष्यति ३३**

**ज्ञानवान् अपि स्वस्याः प्रकृतेः सदृशम् चेष्टते। भूतानि प्रकृतिम् यांति। निग्रहः किम् करिष्यति ?**

ज्ञानी मनुष्य देखील आपल्या प्रकृतिस्वभावाप्रमाणें वागतो. सामान्य प्राणिमात्र प्रकृतिवश होतात ( तेथें चेष्टेचा म्हणजे कर्माचा ) प्रतिबंध काय करणार ?

[ या श्लोकांतील प्रकृति शब्द हा फार महत्त्वाचा आहे, करतां त्याचाच प्रथम विचार केला पाहिजे, माया किंवा ईशशक्ति ही समष्टीची अगर विश्वाची प्रकृति होय आणि बुद्धि किंवा स्वभाव ही एका मनुष्याची ( व्यक्तीची ) प्रकृति होय. पूर्वजन्मार्जित कर्म, आनुवंशिक संस्कार, अभ्यास, शिक्षण, आणि संगति, या पांच कारणांनीं इहजन्मांतील मनुष्याची प्रकृति ( स्वभाव ) बनत असते. यांपैकीं पूर्वजन्मार्जित कर्म व आनुवंशिक संस्कार यांत कोणत्याही प्रकारें बदल होणें शक्य नसतें. परंतु पुढील तीन कारणें पहिल्या दोहोंपेक्षां वेगळ्या प्रकारचीं व जोरदार असल्यास प्रकृतीवर त्यांचीच छाप अधिक असते. याप्रमाणें या कारणांच्या वैषम्यानें मानवी स्वभावांत फारच विलक्षण वैचित्र्य दिसून येतें. तथापि या सर्व प्रकृति-वैचित्र्याचे मिळून, मूलप्रकृतीच्या गुणास अनुसरून, तीन वर्ग सहजच पडतात, आणि म्हणूनच मनुष्य पूर्ण ज्ञानी म्हणजे जीवन्मुक्त असला तरी त्याच्या चरित्रांत सात्त्विक, राजस किंवा तामस प्रकृतीची छटा दृग्गोचर होते. श्रीवामनावतार, रामचंद्र, कृष्ण किंवा परशुराम हीं प्राचीन पौराणिक अवतारचरित्रें या श्लोकांत सांगितलेल्या प्रकृतिसादृश्याच्या नियमाचीं ढळढळीत उदाहरणें होत. त्याचप्रमाणें ज्ञानोबाराय,

तुकाराममहाराज, समर्थ किंवा लोकमान्य टिळक या सत्पुरुषांची चरित्रेंदेखील वरील नियमास अनुसरूनच आहेत. यावरून व्यक्ति सिद्धावस्थेस पोंचली तरीदेखील तिच्या कर्मांत प्रकृतिसादृश्य शिल्लक राहणार असें ठरतें. अज्ञानी किंवा सामान्य प्राणी हे तर बोलून चालून प्रकृतिवशच असतात. अशा स्थितींत प्रकृतीशीं संबंध ठेवण्याचे बाबतींत अगर प्रकृतीसह कर्म करण्याचे बाबतींत कोणीं कितीही प्रतिबंध केला तरी काय उपयोग ? जोंपर्यंत या देहांत जीवाची वसती आहे, तोंपर्यंत प्रकृतीचें वळण कायमच राहणार असा भगवंतांचा रोखठोक सिद्धान्त आहे.]

या प्रकृतिपारतंत्र्यांत जीवाला कितपत स्वातंत्र्य असतें तें सांगतातः—

**इंद्रियस्येंद्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ**
**तयोर्न वशमागच्छेत्तौ ह्यस्य परिपंथिनौ** ३४

**इंद्रियस्य अर्थे इंद्रियस्य रागद्वेषौ व्यवस्थितौ। तयोः वशम् न आगच्छेत् ! हि तौ अस्य परिपंथिनौ।**

(शब्दादि) विषयांविषयीं इंद्रियांची आवडनावड निसर्गसिद्ध असते. (परंतु) त्या दोहोंच्याही आधीन होऊं नये. कारण, (रागद्वेष) हे दोघे ह्यांचे (जीवाचे किंवा त्याच्या उच्च ध्येयाचे) शत्रु (विघातक) असतात.

[ इंद्रियांचा अनुकूल विषयांशीं संयोग झाला असतां त्याबद्दल द्वेष म्हणजे तिट्कारा उत्पन्न होणें नैसर्गिक असतें. ह्याप्रमाणें कर्म घडणें व त्याबद्दल इंद्रियांच्याठिकाणीं रागद्वेष उत्पन्न होणें हें जरी अपरिहार्य असलें तथापि त्यांचा बुद्धीवर परिणाम होऊं देणें किंवा न देणें ह्या बाबतींत जीवास पूर्ण स्वातंत्र्य आहे. आणि ह्या स्वातंत्र्याचा उपयोग करून बुद्धि रागद्वेषांच्या आधीन होऊं न देतां, ती निर्द्वंद्व करून, व तिनें मनासह सर्व इंद्रियांवर नियमन ठेवून, स्वाभाविक घडत असलेल्या कर्मास नियत स्वरूप देणें, हाच बुद्धीचा उपयोग होय. म्हणून मनुष्यानें आपली बुद्धि रागद्वेषांच्या आधीन होऊं देतां कामा नये.]

मागें वर्णन केलेल्या कर्मयोगाच्या सामान्य लक्षणांत प्रकृतिस्वभाव जमेस धरला म्हणजे तो कर्मयोग व्यक्तीस लागू होतो. व्यक्तीच्या या धर्माचें महत्त्व किती आहे तें सांगतातः—

**श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात्**
**स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ३५**

**स्वनुष्ठितात् परधर्मात् विगुणः स्वधर्मः श्रेयान्। स्वधर्मे निधनम् श्रेयः। परधर्मः भयावहः।**

सुलभ रीतीनें आचरिलेल्या परधर्मापेक्षां, ( दिसण्यांत ) कमीप्रतीचा ( असला तरी ) स्वधर्मच श्रेयस्कर होय परधर्म हानिकारक असतो (म्हणून) स्वधर्मामध्यें मरण (देखील) बरें.

[ स्वधर्म म्हणजे आपल्या प्रकृतिस्वभावानुसार प्राप्त असलेलें कर्तव्य व परधर्म म्हणजे दुसऱ्याच्या प्रकृतिस्वभावानुसार त्याला प्राप्त असलेलें कर्तव्य होय. कर्मांचीं बाह्य स्वरूपें भिन्न भिन्न दिसत असल्यामुळें, बाह्यदृष्ट्या तरी त्यामध्यें तारतम्य उत्पन्न होणें अपरिहार्य आहे. परंतु हें तारतम्य आभासिक म्हणजे केवळ वरवरचें असल्यामुळें, रागद्वेषांच्या नादीं लागून किंवा वरून दिसणारा सुलभपणा किंवा कठिणपणा यावरून स्वधर्माचा त्याग व परधर्माचा स्वीकार करणें अत्यंत अनुचित होय. कारण, जगताला धारण पोषणाची जितकी आवश्यकता आहे, तितकीच अन्यायांच्या व दोषांच्या प्रतिकाराचीही आवश्यकता आहे. हें प्रतिकाराचें कर्म दिसण्यांत वाईट किंवा घोर व करण्यास कठीण वाटण्याचा संभव आहे. तथापि हें प्रतिकाराचें काम लोकहितास अत्यंत आवश्यक असल्यामुळें कोणीही कर्मयोगी स्वधर्म वाईट किंवा अवघड म्हणून त्याचा त्याग करण्यास तयार होणार नाहींत.

येथें **स्वधर्म** या शब्दाचें आणखी थोडें स्पष्टीकरण करणें जरूर आहे. मागें गीतेच्याच शब्दांनीं तयार केलेल्या सामान्य लक्षणांत शेवटच्या कर्म शब्दास **प्रकृतिसदृश** हें विशेषण योजिलें म्हणजे तेंच व्यक्तिधर्माचें विशेष लक्षण होतें. फलासक्तिरहित, व भगवदुपासनेच्या इच्छेनें युक्त अशा बुद्धीच्या कह्यांत असलेल्या मनानें ज्ञानेंद्रियांचें नियमन करून कर्मेंद्रियांनीं प्रकृतिसदृश आचरिलेलें कर्म म्हणजेच व्यक्तीचा स्वधर्म होय. यावरून समष्टिधर्मांतच व्यक्तीची इतिकर्तव्यता पूर्ण कशी होते हें चांगलेच लक्षांत येतें. व्यक्तीनें आपला धर्म ठरवितांना आपला स्वतःचा प्रकृतिस्वभाव जमेस धरण्यास हरकत नाहीं अशी गीताशास्त्राकडून व्यक्तीस सवलत मिळाली आहे. परंतु 'योगयुक्त बुद्धीनें स्वभावानुसार केलें जाणारें कर्म हाच स्वधर्म होय,' असें ठरल्यावर त्या स्वधर्माचरणांत व्यक्तीनें मरणाची देखील पर्वा बाळगतां कामा नये, असा गीताशास्त्रानें कडक निर्बंध घातला आहे.

यावरून योगयुक्त बुद्धीनें केलेलें प्रकृतिसदृश कर्म हाच स्वधर्म किंवा व्यक्तीचें सत्कर्म होय. याच्या उलटरीतीनें कर्म करणें म्हणजे परधर्म स्वीकारणें हेंच पाप होय. अशी व्याख्या सहजच ठरते.]

प्रकृतिस्वभावाची सवलत मिळाल्यानें व्यक्तिधर्म बराच सोपा आहे असें अर्जुनास वाटलें. त्याचा व्यक्तिधर्मावर पहिल्यापासूनच विशेष कटाक्ष होता. म्हणूनः—

**अर्जुन उवाच**

**अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पूरुषः**
**अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजितः ३६**

**अथ, वार्ष्णेय ! अयम् पूरुषः अनिच्छन् अपि बलात् नियोजितः इव, केन प्रयुक्तः पापम् चरति ।**

अर्जुन म्हणालाः—तर मग, हे कृष्णा ! हा मनुष्य स्वतःची इच्छा नसतांही, जणूंकाय जबरीनें ढकलल्यासारखा, कोणाच्या प्रेरणेनें पापाचरण करितो ?

[ स्वधर्मत्याग व परधर्मस्वीकार हें जर पाप आहे, तर मनुष्य असे पाप करावयास कां प्रवृत्त व्हावा ? अशी शंका येऊन अर्जुन विचारीत आहे; कारण कर्म घोर किंवा सौम्य कसेंही असलें तरी प्रकृतिस्वभावाची सवलत मिळाल्यावर त्याचा त्याग करण्याची गरजच उरत नाहीं. स्वभावानुसार कर्तव्याचरण सोपें व श्रेयस्कर ठरतें तर मनुष्याची पापाचरणाकडे प्रवृत्ति कां व्हावी ? यांतील बीज अर्जुनास कळावयास पाहिजे होतें. म्हणून त्यानें प्रश्न केला आहे ]

**श्रीभगवानुवाच**

**काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः**
**महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम् ३७**

**रजोगुणसमुद्भवः एषः क्रोधः एषः कामः महाशनः, महापाप्मा, इह एनम् वैरिणम् विद्धि ।**

श्रीभगवान् म्हणाले:— रजोगुणापासून उत्पन्न होणारा व ( प्रतिबंधामुळें ) क्रोधांत रूपांतर पावणारा हा काम ( उपभोगेच्छा ) अत्यंत खादाड ( कितीही उपभोग मिळाले तरी तृप्त न होणारा ) व महापातकी ( सर्व दुःखांना व अनर्थांना कारण होणारा ) आहे. येथें म्हणजे कर्मयोगांत ( साधकांचा ) हा वैरी आहे असें समज.

[ अर्थात् काम व क्रोध या विकारांचा बुद्धीला संपर्क होऊं देऊं नये. म्हणजे साधकानें आपली बुद्धि निर्द्वंद्व केली पाहिजे असें येथें भगवंतांनीं विधान केलें आहे ]

**धूमेनाव्रियते वन्हिर्यथाऽदर्शो मलेन च**
**यथोल्बेनावृतो गर्भस्तथा तेनेदमावृतम्** ३८

**यथा धूमेन वन्हिः आव्रियते, मलेन आदर्शः च, यथा उल्बेन गर्भः आवृतः, तथा तेन इदम् आवृतम् ।**

ज्याप्रमाणें, धुरानें अग्नि आच्छादित होतो, किंवा मळानें आरसा झांकून जातो, अथवा वारेनें गर्भ वेष्टित असतो त्याप्रमाणें ह्यानें ( कामानें ) हें ( ज्ञान ) व्यापून टाकिलें आहे.

**आवृतं ज्ञानमेतेन ज्ञानिनो नित्यवैरिणा**
**कामरूपेण कौंतेय दुष्पूरेणानलेन च** ३९

**कौंतेय ! दुष्पूरेण अनलेन, कामरूपेण च, एतेन, ज्ञानिनः नित्यवैरिणा ज्ञानम् आवृतम् ।**

अर्जुना ! ( इंधनानें कधींही न विझणाऱ्या ) अग्नीप्रमाणें ( उपभोगांनीं ) कधींही शांत न होणाऱ्या, व कामरूपी ( उपभोगतृष्णा हेंच ज्याचें स्वरूप आहे अशा ) ह्या ज्ञानी पुरुषाच्या नित्य वैऱ्यानें ज्ञान ( सदसद्विवेक ) आच्छादून टाकिलें आहे.

**इंद्रियाणि मनो बुद्धिरस्याधिष्ठानमुच्यते**
**एतैर्विमोहयत्येष ज्ञानमावृत्य देहिनम्** ४०

**इंद्रियाणि, मनः, बुद्धिः, अस्य अधिष्ठानम् उच्यते । एतैः ज्ञानम् आवृत्य, एषः देहिनम् विमोहयति ।**

इंद्रियें, मन व बुद्धि हीं ह्याचीं ( कामाचीं ) अधिष्ठानें ( आश्रयस्थानें ) म्हणतात ( आहेत ). ह्या स्थानांच्या आश्रयानें सदसद्विवेकास आच्छादून हा जीवाला मोहित करितो.

[ इंद्रियें, मन व बुद्धि यांचा आश्रय मिळाला तरच काम हा ज्ञानाला आच्छादित करण्यास समर्थ होतो. अर्थात् बुद्धि, मन व इंद्रियें यांतील उपभोगवासना

म्हणजे काम नष्ट झाल्यावर, मन, बुद्धि व इंद्रियें कायम राहूनही जीवाला मोह उत्पन्न होण्याचें कारण राहात नाहीं. ह्यावरून कर्मांची आसक्ति उत्पन्न होण्यास इंद्रियें, मन व बुद्धि हीं स्वतः कारण नसून, काम ( उपभोगवासना ) च सर्व पापांचें मूळ कारण होय. म्हणून त्यालाच तेवढें शत्रु म्हटलें आहे. ]

**तस्मात्त्वमिंद्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ**
**पाप्मानं प्रजहि ह्येनं ज्ञानविज्ञाननाशनम्** ४१

**तस्मात्, भरतर्षभ! त्वम् आदौ इंद्रियाणि नियम्य, एनम् पाप्मानम् ज्ञानविज्ञाननाशनम् प्रजहि हि।**

म्हणून, हे भरतकुलश्रेष्ठ अर्जुना! तूं प्रथम इंद्रियांचें नियमन करून ह्या पापी ज्ञानाचा ( आध्यात्मिक ज्ञानाचा ) व आधिभौतिक विज्ञानाचा ( व्यावहारिक ज्ञानाचा ) नाश करणाऱ्याला ( कामाला ) नाहींसा कर.

[ विषयांविषयीं रागद्वेषरूप द्वंद्व उत्पन्न होण्यास त्या विषयांचा उपभोग घेण्याची वासना म्हणजे काम हेंच मूळ कारण असल्यामुळें, ह्या ज्ञानाविज्ञानविघातक पापी कामाचें, म्हणजे रागद्वेषरूप द्वंद्वाचें, इंद्रियनिग्रहपूर्वक निर्मूलन करणें अवश्य आहे. म्हणून, तूं ह्या कामाचा म्हणजे रागद्वेषरूपी द्वंद्वाच्या मूळकारणाचा नाश करून आपली बुद्धि निर्द्वंद्व कर, ]

**इंद्रियाणि पराण्याहुरिंद्रियेभ्यः परं मनः**
**मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु सः** ४२

**इंद्रियाणि पराणि, ( इति ) आहुः इंद्रियेभ्यः मनः परम्, मनसः बुद्धिः तु परा, तु यः ( आत्मा ) सः बुद्धेः परतः।**

( विषयांपेक्षां ) इंद्रियें श्रेष्ठ, इंद्रियांपेक्षां मन श्रेष्ठ, मनापेक्षांही बुद्धि श्रेष्ठ, परंतु जो आत्मा तो बुद्धीहूनहि श्रेष्ठ आहे, असें (श्रुति) म्हणतात.

[ ४० व्या श्लोकांत इंद्रियें, मन व बुद्धि एवढीच कामाचीं आश्रयस्थानें सांगितलीं आहेत. ह्यावरून कामाचा अंमल प्रत्यक्ष आत्म्यावर चालत नसल्यामुळें, तो ह्या कामाचा नाश करण्यास समर्थ असतो. ]

**एवं बुद्धेः परं बुद्ध्वा संस्तभ्यात्मानमात्मना**
**जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदम्** ४३

**महाबाहो! एवम् बुद्धेः परम् बुद्ध्वा आत्मना आत्मानम् संस्तभ्य, दुरासदम् कामरूपम् शत्रुम् जहि ।**

अर्जुना! ह्याप्रमाणें बुद्धीहून श्रेष्ठ ( स्वतंत्र आणि स्वयंप्रकाश ) आत्म्याला ओळखून, त्या आत्मज्ञानानें बुद्धि स्थिर करून ( ह्या ) दुर्दमनीय कामरूपी शत्रूला ठार कर. ( म्हणजे अंतःकरणांत त्याला थारा देऊं नको. )

[ ३७ व्या श्लोकापासून येथपर्यंतच्या विवेचनाचा विचार केल्यास असें दिसतें कीं, एकंदर विकारात्मक द्वंद्वांचें उपभोगवासना हेंच मूळ आहे. अर्थात् बुद्धि निर्विकार करावयाची झाल्यास विकारांच्या मूळावरच घाव घालणें जरूर आहे आणि म्हणूनच सर्व पातकांचें मूळ जी उपभोगवासना ती अजीबात नष्ट करून तूं आपली बुद्धि निर्द्वंद्व कर असें येथें भगवंतांनीं ३७ व्या श्लोकाचें निगमन केलें आहे.]

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे कर्मयोगो नाम तृतीयोऽध्यायः ।**

ह्याप्रमाणें श्रीभगवंतांनीं गाइलेल्या उपनिषदांतील ब्रह्मविद्यांतर्गत कर्मयोगशास्त्राविषयींच्या श्रीकृष्ण व अर्जुन ह्यांच्या संवादांतील 'कर्म प्रकरण' या नांवाचा तिसरा अध्याय समाप्त झाला.

## रहस्यदीपिकेच्या तृतीयाध्यायाचा उपसंहार

### तिसऱ्या अध्यायांतील विषयानुक्रमणिका.


| | | |
|---|---|---|
| १ | अर्जुनाचा प्रश्न. ... ... ... | ( श्लोक १ व २ ) |
| २ | उत्तर ... ... ... ... | ( श्लोक ३ ) |
| ३ | सामान्य कर्ममीमांसा ... ... ... | ( श्लोक ४ ते ६ ) |
| ४ | कर्मयोगाचें लक्षण ... ... ... | ( श्लोक ७ ) |
| ५ | कर्मयोगाचें विधान ( प्रतिज्ञा ) ... ... | ( श्लोक ९ ) |
| ६ | यज्ञचक्र ... ... ... ... | ( श्लोक १० ते १९ ) |
| ७ | कर्मयोगाच्या मोक्षसाधनत्वाचें उदाहरण ... | ( श्लोक २० ) |
| ८ | लोकसंग्रहाचा निसर्गसिद्ध नियम ... ... | ( श्लोक २१ ) |

| | | |
|---|---|---|
| ९ | लोकसंग्रह... ... ... ... | ( श्लोक २२ ते २९ ) |
| १० | कर्मयोगाच्या प्रतिज्ञेचें निगमन ... ... | ( सिद्धांत ) ( ३० ) |
| ११ | कर्मयोगास अधिकारी ... ... | ( श्लोक ३१-३२ ) |
| १२ | सामुदायिक कर्माचें वैयक्तिक लक्षण ... | ( श्लोक ३३ ते ३५ ) |
| १३ | अर्जुनाचा प्रश्न ... ... ... | ( श्लोक ३६ ) |
| १४ | निर्द्वंद्वाधिकरण ... ... ... | ( श्लोक ३७ ते ४३ ) |


ह्या अध्यायाचे प्रारंभीं १ व २ श्लोकांत अर्जुनानें, कर्माच्या आवश्यकतेविषयीं केलेल्या प्रश्नाचें सविस्तर समाधान करण्याकरितां भगवंतांनीं ३ ऱ्या श्लोकांत प्रथम सांख्यनिष्ठा व योगनिष्ठा यांच्या बाह्यस्वरूपांतील फरक दाखवून, ४ थ्या श्लोकापासून कर्माच्या विवेचनास आरंभ केला आहे. श्लोक ४ ते ७ अखेर चार श्लोकांत प्रथम, करीत असलेलें कर्म टाकून देणें व नवीन कर्म करण्याचें बंद करणें ह्या दोन्ही गोष्टी नैष्कर्म्यसिद्धि प्राप्त होण्यास अगदींच निरुपयोगी आहेत असें दाखवून, सर्व सृष्टि प्रकृतिवश असल्यामुळें सर्वथैव कर्मत्याग होणें अशक्य असतां नुसतीं कर्मेंद्रियें दाबून ठेवून कर्मत्यागाचें ढोंग करणें अत्यंत निंद्य होय; परंतु शुद्ध बुद्धीच्या योगानें मनावर व तद्द्वारा इंद्रियांवर योग्य नियमन ठेवून जो कर्मयोगाचें आचरण करितो, तोच पुरुष श्रेष्ठ होय, असे सिद्ध केलें आहे. ह्याप्रमाणें कर्मयोगाचें श्रेष्ठत्व दाखवून, भगवदुपासनेच्या हेतूनें व योगयुक्त बुद्धीनें होणारा कर्मयोग अवश्य आचरिला पाहिजे, असें विधान श्लोक ९ यांत भगवंतांनीं केलें आहे. श्लोक १० ते १३ अखेर चार श्लोकांत यज्ञ म्हणजे उपासनात्मक धर्म मानवांच्या उत्पत्ती-बरोबर ईश्वरानें उत्पन्न केलेला असून, त्या धर्मानेंच ऐहिक व पारमार्थिक सर्व आकांक्षा पूर्ण होतील, असें ईश्वरानेंच सांगितलें असल्याचें वर्णन केलें आहे. मानवी प्राण्यास ईश्वरानें केलेली ही आज्ञा ही ईश्वराची नुसती लहर नसून, ती किती यथार्थ आहे व तदनुसार वागण्यांतच मानवी प्राण्यांचें कसें हित आहे, हें दाखविण्याकरितां श्लोक १४ ते १६ अखेर तीन श्लोकांत एका प्रकारच्या यज्ञाची परंपरा व त्या परंपरेचाच क्रमरूप परस्पर संबंध दाखवून, हें यज्ञचक्र चालू ठेवण्याची प्रत्येकावर असलेली जबाबदारी कोणासही कोणत्याही सबबीनें केव्हांही टाळतां येणें शक्य नाहीं, इतकेंच नव्हे, पण असें यज्ञचक्र न चालविणाऱ्या मनुष्यास ह्या जगांत जिवंत राहण्याचादेखील हक्क नाहीं असें स्पष्ट सांगितलें आहे. जीवन्मुक्त पुरुषाच्या कर्मयोगांत स्वतःचा स्वार्थ कांहींच नसतो, तथापि निष्काम-

बुद्धीनें होणारा कर्मयोग लोककल्याणकारक होत असल्यामुळें स्थितप्रज्ञ पुरुष असक्त बुद्धीनें हे लोकहितकारक यज्ञचक्र सुरळीत चालेल असेंच कर्म करीत राहतात. असें १७ ते १९ अखेर तीन श्लोकांत सिद्ध करून २० व्या श्लोकांत जनकादिकांच्या उदाहरणानें, कर्मयोग हे मोक्षाचें निश्चित साधन होय असें ठरविलें आहे. पुढें श्लोक २१ ते २५ अखेर पांच श्लोकांत प्रत्येक विचारी श्रेष्ठ मनुष्यानें आपल्या अनुयायांस योग्य मार्ग लावून देण्याकरितां, स्वतः कर्तव्यतत्पर राहाणें किती आवश्यक आहे व तसें तो न करील तर, सामान्य जनसमूहाचा त्याच्या निरर्गल वर्तनानें कसा अधःपात होतो आणि ह्या अधःपाताची जबाबदारी विचारी म्हणजे श्रेष्ठ मनुष्यावरच कशी येते, हें भगवंतांनीं स्वतःच्या उदाहरणानें सिद्ध करून दाखविलें आहे. सामान्य लोकांचें विहिताचरण जरी सकाम असलें तरी, कर्म हें स्वरूपतः त्याज्य आहे असा भलताच गैरसमज श्रेष्ठ पुरुषानें आपल्या वर्तनामुळें उत्पन्न होऊं देतां कामा नये. कारण, कर्मे स्वरूपतः त्याज्य नसून अंतःकरणांतील भोगवासना मात्र त्याज्य आहेत, हें तत्त्व सामान्य जनांच्या मनावर बिंबविणें हेंच श्रेष्ठांचें कर्तव्य होय. श्रेष्ठांच्या कर्मयोगाचरणानें हें तत्त्व सामान्य जनांना जसें पटतें, तसें इतर कोणत्याही रीतीनें पटणें शक्य नसतें, अज्ञ व स्थितप्रज्ञ यांच्या बाह्य वर्तनांत जरी विशेष फरक दिसला नाहीं तथापि सामान्य मनुष्य अहंकारपूर्वक फलाच्या हेतूनें कर्मे करितो व स्थितप्रज्ञ लोकसंग्रहाकरितां निष्काम व निरहंकारबुद्धीनें कर्मे करीत असतो, हा त्या दोघांत मोठा फरक आहे. ह्याप्रमाणें श्लोक २६ ते ३० अखेर लोकसंग्रहाची आवश्यकता व बुद्धिभेदाचे दुष्परिणाम दाखवून कर्मयोगाचें दृढीकरण केलें आहे. सारांश, जीवन्मुक्तावर लोकसंग्रह जबरीनें लादलेला नसून त्याच्या नितांत शुद्ध बुद्धीचा तो स्वभावच होय, म्हणजे लोकसंग्रहार्थ कर्मयोगाचरण हेंच स्थितप्रज्ञ जीवन्मुक्ताचें लक्षण आहे असें ठरतें. ह्याप्रमाणें अ० २ श्लोक ४५ यांत सांगितलेल्या संपूर्ण बुद्धियोगाचें व्यावहारिक स्वरूप कसें असतें, हें भगवंतांनीं ह्या कर्मयोगाधिकरणांत स्पष्ट दाखविलें आहे. ह्यावरून बुद्धियोग व कर्मयोग ह्या एकाच योगनिष्ठेच्या तात्विक व व्यावहारिक स्वरूपबोधक दोन संज्ञा होत, हें उघड आहे. यानंतर श्लोक ३१ व ३२ यांत कर्मयोगास अनधिकारी अज्ञ मनुष्यानें सरळ मनानें श्रद्धापूर्वक विहित कर्मे करीत राहून तीं परमेश्वरास समर्पण करावीत म्हणजे तो क्रमाक्रमानें कर्मयोगाचा अधिकारी

होतो. परंतु श्रद्धा व सरळपणा देखील ज्याच्या अंगीं नसेल तो मात्र कर्मयोगास अगदींच अपात्र होय असें सांगितलें आहे. याप्रमाणें लोकसंग्रहकारक कर्मयोगाचा समष्टिधर्म वर्णन करून पुढील तीन श्लोकांत म्हणजे ३३ ते ३५ अखेरपर्यंत कर्मयोगांतील व्यक्तिधर्माचें स्वरूप थोडक्यांत सांगितलें आहे. कर्तव्य किंवा अकर्तव्य याचा निर्णय करतांना समाज, राष्ट्र किंवा लोक यांच्या हिताचा विचार करणें अवश्य असतें. आपलें कर्म लोकहितकारक असेल तरच तें अवश्य कर्तव्य असें ठरेल. म्हणजे मनुष्यानें साधकावस्थेंत स्वतःच्या आध्यात्मिक उन्नतीस प्राधान्य द्यावें हें खरें, पण त्याच्या आध्यात्मिक उन्नतीचा मार्ग इतरांच्या बुद्धिभेदास कारणीभूत होतां कामा नये. इतकेंच काय, पण स्वतःच्या आध्यात्मिक उन्नतीबरोबरच लोकहिताकडे देखील त्यानें लक्ष देणें जरूर आहे. असें लोकहिताकडे लक्ष पुरविलें तरच साधकाला पारमार्थिक दृष्ट्या कर्मयोग फलद्रूप होईल. यावरून समष्टिधर्माकडे दुर्लक्ष केल्यास कर्मयोग व्यक्तीला मोक्षदायक होत नाहीं असें ठरतें व त्याबरोबरच व्यक्तिस्वातंत्र्याचें क्षेत्रदेखील मर्यादित होतें, अशी व्यक्तिस्वातंत्र्याला मर्यादा घातल्यामुळें व्यक्तीचें स्वातंत्र्य अजिबात नष्ट होतें असें समजणें बरोबर नाहीं. कारण मर्यादित स्वातंत्र्य म्हणजे केवळ पारतंत्र्य नव्हे. शुद्ध आत्मतत्त्व पूर्णपणें स्वतंत्र असलें तरी देहादि संघातासहवर्तमान बनलेली व्यक्ति पूर्ण स्वतंत्र नाहीं. समष्टि किंवा समाजधर्म ( माणुसकी ) व्यक्तींच्या स्वातंत्र्यास नियामक असतो. तथापि प्रकृतिस्वभावाचे बाबतींत मात्र गीताशास्त्रानें व्यक्तीला चांगलीच मोकळीक दिली आहे. स्थितप्रज्ञ पुरुषाची प्रकृति मूळची सात्त्विक असेल तर तो शास्त्रीय संशोधनानें ज्ञानसंवर्धन करील, पण स्थितप्रज्ञाची प्रकृति मूळची राजस असली तर तो राजकारणासारख्या मुत्सद्दीपणाच्या मार्गानें जगांत न्यायाचा उत्कर्ष घडवून आणील. स्थितप्रज्ञाच्या प्रकृतीचें वळण तमोगुणाचें असलें तर तो शंकराप्रमाणें दुष्टांचा संहार करण्यास तयार होईल. याप्रमाणें व्यक्तीला प्रकृतिसादृश्याची मोकळीक देऊन शुद्धबुद्धिनियंत्रित स्वभावानुसार प्राप्त झालेलें कर्तव्य मात्र मनुष्यानें केलेंच पाहिजे. तेथें प्राणाची देखील पर्वा करतां कामा नये असें गीताशास्त्रानें व्यक्तीला निक्षून बजाविलें आहे. येथपर्यंतच्या विवेचनांत आलेले लोकहित किंवा लोककल्याण हे शब्द ईश्वरोपासनेतच अंतर्भूत होत असल्यामुळें ईश्वरोपासनेच्या म्हणजे लोककल्याणाच्या हेतूनें स्वभावानुसार केलेलें प्राप्तकर्म हेंच पुण्य किंवा स्वधर्म होय असें ठरतें. आणि अर्थात् परधर्माला पाप ही संज्ञा साह-

जिक प्राप्त होते, हें लक्षांत आल्याबरोबर अर्जुनानें प्रश्न केला आहे. कारण, वैतागानें उत्पन्न झालेली अर्जुनाची संन्यासवृत्ति हा त्याच्या व्यक्तिविषयक कल्पनेचाच परिणाम होता. अध्यायाच्या प्रारंभीं केलेल्या अर्जुनाच्या प्रश्नाचें उत्तर भगवंतांनीं येथपर्यंतच्या विवेचनांत संपूर्ण दिलें आहे. त्याचा अभिप्राय असा कीं, कर्मयोगांतील बुद्धि व कर्म हीं एकाच निष्ठेचीं दोन स्वरूपें असल्यामुळें त्याच्याविषयींची उच्चनीच भावाची कल्पना चुकीची आहे. अध्याय २ श्लोक ४९ यांत आलेल्या तुलनेंतील कर्म शब्द सकाम कर्म याअर्थीं आहे. कर्माचा घोरपणा किंवा सौम्यपणा कर्त्याच्या प्रकृतिस्वभावावर अवलंबून आहे. एकाचें कर्म दुसऱ्याला घोर वाटलें तरी तेवढ्यानें तें पाप आहे असें म्हणतां यावयाचें नाहीं. कर्मयोगांत प्रकृतिस्वभावास अनुसरून कर्म करण्याची मुभा असेल तर मनुष्याची प्रवृत्ति पापाचरणाकडे कां व्हावी? भगवंतांनीं याचें उत्तर असें दिलें आहे कीं, कर्माच्या बाह्य स्वरूपांत पाप नसून त्याचें बीज उपभोगवासनेंत आहे. या उपभोगवासनेमुळेंच मनुष्याच्या अंतःकरणांत अनेक प्रकारचे विकार उत्पन्न होतात. अशा विकारवश बुद्धीनें केलेलें प्रत्येक कर्म मग तें कितीही सौम्य किंवा पुण्यरूप असलें तरी तें पापच ठरतें. म्हणून साधकानें आपली बुद्धि निर्द्वंद्व (निर्विकार) केली पाहिजे व विकारांचीं हीं द्वंद्वें अजिबात नष्ट होण्याकरितां त्या सर्वांचें मूळ जी उपभोगवासना तिचें निर्मूलन करणें अवश्य आहे. आत्मज्ञान हें बुद्धींतील उपभोगवासना नष्ट करण्याचें उत्कृष्ट साधन होय. ही बुद्धीतील उपभोगवासना जसजशी कमी होईल तसतशी बुद्धींतील शुभेच्छा म्हणजे ईश्वरोपासनेची इच्छा वृद्धिंगत होऊन बुद्धियोग पूर्ण होईल. सारांश, भगवदुपासनेच्या हेतूनें साधकावस्थेंत मोक्षप्राप्तीकरितां व सिद्धावस्थेंत लोकसंग्रहाकरितां निष्काम कर्मयोगाचें आचरण यावज्जीव अव्याहत चालविणें अवश्य आहे. आणि असा कर्मयोग सिद्ध होण्यास प्रथम बुद्धि शुद्ध होण्यासाठीं ती उपाधिरहित म्हणजे निर्द्वंद्व व्हावी लागते.

---

# चतुर्थोऽध्यायः ।

तिसऱ्या अध्यायांतील कर्मयोगाधिकरणांत यज्ञाच्या ( उपासनेच्या ) उद्देशानें कर्मयोगाचरण करावयास सांगितलें आहे व त्यांत उदाहरणार्थ एका द्रव्यमय यज्ञ-चक्राचेंही वर्णन केलें आहे. परंतु कर्मयोगास अवश्य असलेल्या यज्ञाच्या स्वरूपा-विषयीं विस्तृत विवेचन तेथें झालेलें नाहीं. दुसऱ्या अध्यायांतील आत्मज्ञानाधि-करणावरून व बुद्धियोगाधिकरणांतील **आत्मवान्, मत्परः** इत्यादि पदांवरून सूचित झालेल्या व कर्मयोगांत प्रयोजनरूपानें अवश्य असलेल्या उपासनास्वरूपाचें विस्तृत विवेचन करणें आणि अंतःकरणांतील उपभोगवासनांचा त्याग करून उपासनामय बुद्धीचें म्हणजे निस्त्रैगुण्याचें स्पष्टीकरण करणें हा ह्या चौथ्या अध्यायांतील प्रतिपाद्य विषय आहे. तिसऱ्या अध्यायात वर्णन केलेला कर्मयोग हेंच वैदिक धर्माचें रहस्य असून त्याचें सनातनत्व दाखविण्याकरितां त्याची परंपरा भगवान् सांगतातः—

**श्रीभगवानुवाच**

**इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम्**
**विवस्वान्मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवेऽब्रवीत्** १

**इमम् अव्ययम् योगम् अहम् विवस्वते प्रोक्तवान्। विवस्वान् मनवे प्राह । मनुः इक्ष्वाकवे अब्रवीत् ।**

श्रीभगवान् म्हणालेः—( अर्जुना ) हा अव्यय ( त्रिकालाबाधित असा ) योग ( कर्मयोग ) मीं सूर्याला सांगितला, सूर्यानें मनूला सांगितला ( व ) मनूनें इक्ष्वाकूला सांगितला.

**एवं परंपराप्राप्तमिमं राजर्षयो विदुः**
**स कालेनेह महता योगो नष्टः परंतप** २

**परंतप ! एवम् परंपराप्राप्तम् इमम् ( योगम् ) राजर्षयः विदुः । महता कालेन सः योगः इह नष्टः ।**

अर्जुना ! ह्याप्रमाणें परंपरेनें चाललेला हा कर्मयोग ( पुष्कळ ) राजे व ऋषि जाणत होते. ( परंतु ) दीर्घकालानंतर तो कर्मयोग ह्या लोकीं लुप्त झाला.

[ कर्मयोगास लागणारी बुद्धि हा मानवी स्वभावाचा मध्य आहे. आणि संन्यास किंवा भयंकर उपभोगतृष्णा हीं त्या मानवी स्वभावाचीं परस्परविरोधी दोन टोकें आहेत. यांपैकीं कोणत्यातरी एका टोकाकडे मानवी स्वभाव ओढ खात असल्यामुळें कर्मयोगाचा सुवर्णमध्य कायम रहाणें बरेंच अवघड असतें. समाजांतील ऋषि, आचार्य किंवा लोकनायक, यांच्या चरित्रांची परंपरा कर्मयोगाला अनुकूल अशी जोंपर्यंत चालू रहाते तोंपर्यंतच समाजाची दृष्टि या कर्मयोगाच्या दिशेकडे कायम असते; परंतु लोकनायकांच्या चरित्रपरंपरेंत अंमळ चलबिचल झाल्यास समाजाच्या मनोवृत्तीचा लंबक वर सांगितल्याप्रमाणें कोणत्या तरी एका टोंकाला जाणें अपरिहार्य असतें. अशा स्थितींत बहुजनसमाजाची प्रवृत्ति उपभोगपरायण झाली किंवा संन्यासपर झाली तरी कर्मयोगाचा मध्य सुटल्यावांचून रहात नाहीं. आणि या कारणानेंच कर्मयोगाची परंपरा नष्ट होते. मानवीस्वभावांतील हा दोष लक्षांत घेतल्यास कर्मयोग नष्ट झाला तरी त्याचें अव्ययत्व कसें अबाधित झालें हें सहज समजण्याजोगें आहे.]

**स एवायं मया तेऽद्य योगः प्रोक्तः पुरातनः**
**भक्तोऽसि मे सखा चेति रहस्यं ह्येतदुत्तमम्** ३

**हि, एतत् उत्तमम् रहस्यम्, मे भक्तः सखा च असि इति, सः एव अयम् पुरातनः योगः मया ते अद्य प्रोक्तः।**

हें ( वैदिकधर्माचें ) उत्कृष्ट रहस्य असल्यामुळें व तूं माझा भक्त व जिवलग मित्र आहेस म्हणून, तोच हा सनातन कर्मयोग मीं तुला आज सांगितला आहे.

आपल्यासमोर असलेल्या श्रीकृष्णानेंच पुरातन सूर्यनारायणाला हा योग सांगितल्याचें ऐकून, कालविरोधाच्या शंकेनें अर्जुन विचारितोः—

**अर्जुन उवाच**

**अपरं भवतो जन्म परं जन्म विवस्वतः**
**कथमेतद्विजानीयां त्वमादौ प्रोक्तवानिति** ४

**विवस्वतः जन्म परम्। भवतः जन्म अपरम्। त्वम् आदौ प्रोक्तवान् इति, एतत् कथम् विजानीयाम् ?**

अर्जुन म्हणाला:—( श्रीकृष्णा ) सूर्याचा जन्म ( किती तरी ) प्राचीन ( आणि ) तुझा जन्म ( अगदीं ) अर्वाचीन. ( असें असतां ) तूं प्रथम ( हा योग सूर्याला ) सांगितलास असें मीं कसें समजावें ?

[ पूर्वी भगवंतांनीं **मत्परः, मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्य**; इत्यादि वाक्यांत आपल्या ईश्वरत्वाचा मोघम उल्लेख केलेला अर्जुनाच्या ध्यानांत असून, त्याबद्दल त्याला स्पष्ट खुलासा करून घ्यावयाचाच होता. म्हणून ह्या ठिकाणी त्याच गोष्टीचा पुन्हा स्पष्ट उल्लेख झालेला ऐकून त्याचा खुलासा नीट समजून घेण्याकरितां, त्यानें भगवंतांस हा प्रश्न विचारिला आहे.]

अर्जुनाच्या वरील प्रश्नाचें उत्तर देतांना जीवात्मा व परमात्मा यांमधील उपाधि-जन्य भेद प्रथम सांगून, भगवंतांनीं परमात्मस्वरूपाचें विवेचन केलें आहे:—

**श्रीभगवानुवाच**

**बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन**
**तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परंतप ५**

**अर्जुन ! मे तव च बहूनि जन्मानि व्यतीतानि । परंतप ! तानि सर्वाणि अहम् वेद । त्वम् न वेत्थ ।**

श्रीभगवान् म्हणाले: — अर्जुना! माझे व तुझे ( आजपर्यंत ) पुष्कळ जन्म होऊन गेले आहेत. हे परंतपा (अर्जुना), त्या सर्वांचें ( सर्व जन्मांचें ) मला ज्ञान आहे, परन्तु तुला ( मात्र ) ज्ञान नाहीं. ( स्मरण नाहीं.)

[ परमात्मा व जीवात्मा ह्या दोहोंसही मूळ प्रकृतीच्या ( मायेच्या ) उपाधीचा संबंध आहे. परंतु जीवात्मा फलोपभोगामुळें प्रकृतीच्या स्वाधीन होऊन किंचिज्ज्ञ ( ज्याचें ज्ञान आकुंचित झालें आहे असा ) बनतो आणि परमात्मा फलोपभोग-रहित असल्यामुळें प्रकृतीस ( मायोपाधीस ) स्वाधीन ठेवून सर्वज्ञ राहतो. परमात्म्याच्या ह्या जन्माचें म्हणजे अवतारांचें ज्ञान होणें जीवाला अवश्य आहे असें येथें भगवंतांनीं विधान केलें आहे.]

**अजोऽपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोऽपि सन्**
**प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममायया ६**

**अजः अव्ययात्मा सन् अपि, भूतानाम् ईश्वरः सन् अपि, आत्म-मायया स्वाम् प्रकृतिम् अधिष्ठाय संभवामि।**

मी जन्मरहित व ज्याच्या स्वरूपांत फरक होत नाहीं असा असूनही व (सर्व) प्राणिमात्रांचा प्रभु असूनही ईश्वरीशक्तीनें आपल्या प्रकृतीस वश करून घेऊन व्यक्त होतों.

[ अव्यक्त परमात्मा आपल्या चैतन्यशक्तीनें आपल्याच मूळ प्रकृतीचें म्हणजे जडस्वरूपाचें साह्य घेऊन व्यक्त म्हणजे नामरूपात्मक स्वरूप धारण करितो.]

परमात्मा ह्याप्रमाणे व्यक्त स्वरूप केव्हां धारण करितो तें सांगतातः—

**यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदाऽत्मानं सृजाम्यहम् ७**

**हि, भारत! यदा यदा धर्मस्य ग्लानिः, अधर्मस्य अभ्युत्थानम् भवति तदा अहम् आत्मानम् सृजामि।**

कारण अर्जुना! जेव्हां जेव्हां (उपासनात्मक) धर्म निस्तेज होतो व अधर्म (नास्तिकपणा) वाढतो, तेव्हां तेव्हां मी स्वतःला उत्पन्न करितों. (व्यक्त स्वरूप,—अवतार धारण करितों.)

[ उपासना व तन्मूलक दैवी संपत्ति निस्तेज होऊन त्यांची जगताच्या धारण-पोषणाची कार्यक्षमता कमी होऊं लागते आणि त्याच्या उलट नास्तिकपणा व त्या-बरोबरच उत्पन्न झालेली आसुरी संपत्ति वाढूं लागते व तेणेंकरून जनतेचा अधःपात होण्याचा प्रसंग येतो; तेव्हां, परमात्मा तत्कालीन परिस्थित्यनुरूप कोणत्या तरी विभूतीच्या रूपानें प्रगट होतो.]

असे अवतार घेण्यांत परमात्म्याचा उद्देश काय असतो तें सांगतातः—

**परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम्**
**धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ८)**

**साधूनाम् परित्राणाय, दुष्कृताम् विनाशाय च धर्मसंस्थापनार्थाय, युगे युगे संभवामि।**

(सत्कर्माचरणी) सज्जनांच्या संरक्षणाकरितां व (दुराचारी) दुर्जनांच्या नाशाकरितां (म्हणजे) धर्मसंस्थापनेकरितां मी वेळोवेळीं प्रगट होतों.

ईश्वराचे अवतारप्रसंग व हेतु यांच्या विवेचनाचें प्रयोजन सांगतात:—

**जन्म कर्म च मे दिव्यमेवं यो वेत्ति तत्त्वतः**
**त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन** ९

**अर्जुन! एवम् मे दिव्यम् जन्म कर्म च यः तत्वतः वेत्ति सः देहम् त्यक्त्वा पुनः जन्म न एति । माम् एति ।**

अर्जुना! ह्याप्रमाणें माझें दिव्य जन्म व कर्म जो यथार्थ जाणतो, तो हा देह सोडल्यावर पुन: जन्म पावत नाहीं (व) मला येऊन मिळतो.

[या श्लोकांत आलेला तत्त्वतः हा शब्द फार महत्त्वाचा आहे. श्रेष्ठ पुरुषांच्या चरित्राचा चांगला काळजीपूर्वक अभ्यास करून, त्यापासून योग्य तो बोध घेण्याकरितां मनुष्यानें आपली दृष्टि सात्त्विक करणें अत्यंत जरूर आहे. उदाहरणार्थ—श्रीकृष्णचरित्रांत आढळून येणाऱ्या अनेक चमत्कारिक गोष्टींची मीमांसा करतांना अवताराचा हेतु (प्रसंग) व परमेश्वराचें स्वरूप, हीं तत्त्वें नेहमीं डोळ्यांपुढें ठेवावयास पाहिजेत. अवतारी पुरुषाच्या चरित्राचा अभ्यास करावयाचा म्हणजे त्याच्या चरित्राशीं ज्यांचा संबंध येतो त्या सर्व व्यक्तींच्या चरित्रांचा अभ्यास करणें ओघानेंच प्राप्त होतें. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे अवतारी पुरुषाचें चरित्र हा राष्ट्राचा इतिहासच असतो असें म्हणण्यास हरकत नाहीं. अशा इतिहासाचा तात्त्विक दृष्टया अभ्यास करणें परमार्थामध्यें देखील अत्यंत महत्त्वाचें आहे.

ईश्वराचा जन्म व कर्म तत्त्वतः जाणावयाचा म्हणजे त्याचा हेतु व चरित्र ओळखून त्याप्रमाणें स्वतःचें वर्तन ठेवावयाचें. ज्याप्रमाणें समष्टीच्या कल्याणाकरितांच ईश्वराचें चरित्र असतें, त्याप्रमाणें स्वतःचें वर्तन देखील लोककल्याणाकरितांच असलें पाहिजे. हेंच ईश्वरावताराचें तात्त्विक ज्ञान होय. या ज्ञानानें जीवाची बंधनिवृत्ति होऊन त्याला ईश्वरप्राप्ति होते, असें येथें भगवंतानी ५व्या श्लोकांतील विधानाचें निगमन केलें आहे.]

ह्या ज्ञानपूर्वक उपासनेनें कर्मयोग पूर्ण होऊन भगवत्प्राप्ति कशी होते, तें सांगतात:—

**वीतरागभयक्रोधा मन्मया मामुपाश्रिताः**
**बहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागताः** १०

**ज्ञानतपसा वीतरागभयक्रोधाः पूताः मन्मयाः माम् उपाश्रिताः बहवः मद्भावम् आगताः ।**

ज्ञानयुक्त नियत कर्मानें. ज्यांचे विषयानुराग, भीति व क्रोध (इत्यादि विकार) नष्ट झाले आहेत असे, (अतएव) शुद्ध झालेले, मीच ज्यांना श्रेष्ठ वाटत आहें व ज्यांनी माझाच आश्रय केला आहे असे अनेक (स्थितप्रज्ञ) माझ्या स्वरूपाला (परमात्मस्वरूपाला) प्राप्त झाले आहेत.

[ज्ञानपूर्वक (म्ह० ईश्वराच्या अवतारचरित्राचें मागील श्लोकांत सांगितल्या-प्रमाणें तात्त्विक ज्ञान) नियमित सदाचरण या विशिष्ट साधनानें मनुष्याची आध्यात्मिक उन्नति पूर्ण होऊन त्याला परमात्मप्राप्ति होते. असें येथें सांगितलें आहे. यावरून शुद्ध हेतूनें प्रयत्न केल्यास मनुष्य अज्ञानबंधांतून मुक्त होतो असा हा स्वावलंबनाचा मार्ग भगवंतांनीं उपदेशिला आहे, हें सहजच दिसून येतें. या स्वावलंबनाच्या मार्गांतही आदौ, मध्यें व अंतीं ईश्वराचें अधि-ष्ठान अवश्य आहे असें या श्लोकांत स्पष्ट दर्शविलें आहे. ज्ञानयुक्त, बुद्धिनियत कर्म हें मोक्षोपयोगी आहे, असें येथें विधान केलें आहे.]

येथील ज्ञान शब्दांत अवतारी चरित्रांचा म्हणजे इतिहासज्ञानाचा समावेश आहे

ह्याप्रमाणें भगवत्प्राप्ति होणें किंवा न होणें हें ज्याच्या त्याच्या अंगीकृत मार्गावर अवलंबून आहे. असें सांगतातः––

**ये यथा मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहम्**
**ममवर्त्मानुवर्तंत मनुष्या पार्थ सर्वशः** ११

**पार्थ ! ये यथा माम् प्रपद्यंते, तान् अहम् तथा एव भजामि। सर्वशः मनुष्याः मम वर्त्म अनुवर्तंते।**

अर्जुना ! जे ज्या हेतूनें मजकडे येतात त्यांना तसेंच फल मी देतों. सर्व लोक माझ्याच मार्गाला (रीतीला) अनुसरतात.

[**'जशास तसें'** हा न्याय मनुष्याच्या रोजच्या व्यवहारांत तर आढळून येतोच, परंतु तो थोड्याबहुत फरकानें परमार्थांत देखील स्वीकारिला जातो, असें या श्लोकावरून ठरतें. जशा प्रकारच्या हेतूनें मनुष्य परमेश्वराची उपासना करतो तद-नुसार परमेश्वर त्याला फल देतो. हा नियम फारच मोघम आहे. तथापि **'परि-त्राणाय साधूनाम्'** (अ० ४, श्लोक ८) या वाक्याचा विचार केल्यास धर्म्य हेतूनें उपासना केली तरच ईश्वरकृपेनें मनुष्याची ती उपासना सफल होते. कारण-

धर्माची उन्नतीच ईश्वरास अभिप्रेत आहे. साधकाचा हेतु ज्या मानानें उच्च दर्जाचा असेल त्या मानानेंच ईश्वर त्याचा अंगीकार करतो. मनुष्याचा हेतु जर कनिष्ठ प्रतीचा असेल तर त्याला ईश्वरीकृपेचें पाठबल मिळत नाहीं; हें निराळें सांगावयास नको. दुसरा आपल्याशीं जसा वागतो, तसेंच आपणही त्याशीं वागावें ही रीत स्वाभाविक दिसते. ह्या स्वाभाविक नियमांचा विचार केला तर ईश्वरप्राप्ति लवकर किंवा उशीरां होणें न अगर होणें हें ईश्वराकडे नसून साधकाच्या बौद्धिक उन्नतीवर किंवा अवनतीवर अवलंबून आहे असें ठरतें यावर असा प्रश्न उत्पन्न होतो कीं, सुष्ट व दुष्ट हा भेद मनुष्यलोकांत असला तथापि परमेश्वर साधूंनाच कां संरक्षितो ? व दुष्टांचाच कां नाश करतो ? या प्रश्नाचें उत्तर देखील प्रस्तुत श्लोकांतून निघतें. ईश्वराचें संरक्षण व त्यानें केलेला संहार याला देखील साधूंचें किंवा दुष्टांचें वर्तनच कारणीभूत होत असतें. श्रीरामचंद्रानीं बिभीषणाचें संरक्षण केलें व रावणाचा नाश केला, याचें कारण देखील बिभीषणाचें व रावणाचें वर्तनच होय, असें दाखवितां येतें.]

मनुष्यलोकांतच कर्माचें फल लवकर कां मिळतें तें सांगतातः—

**कांक्षंतः कर्मणां सिद्धिं यजंत इह देवताः**
**क्षिप्रं हि मानुषे लोके सिद्धिर्भवति कर्मजा १२**

**कर्मणाम् सिद्धिम् कांक्षंतः इह देवताः यजंते। हि मानुषे लोके कर्मजा सिद्धिः क्षिप्रम् भवति।**

कर्माची सिद्धि ( उपभोगात्मक फल ) इच्छिणारे ( लोक ) येथें ( इतर ) देवतांची उपासना करितात, कारण मनुष्यलोकांमध्यें (मानवीसमाजामध्यें) कर्मजन्य सिद्धि (फल) लवकर होते ( मिळतें ).

[ बुद्धि निस्वार्थ झाल्याखेरीज खरी निष्काम उपासना करितां येत नाहीं व निष्काम उपासनेच्या अभावीं ईश्वरप्राप्ति होणें अशक्य आहे. स्वार्थत्यागांतील स्वावलंबनाचा असा हा सरळ मार्ग स्वार्थपरायण लोकांना बिकट व परावलंबी वाटल्यास फारसें नवल नाहीं. असे स्वार्थपरायण लोक शुद्ध ईश्वरोपासनेच्या नादीं न लागतां सकाम कर्माचा रोखठोक व्यापार करण्याकडेच धाव घेतात. मनुष्यलोकांत ( मानवीसमाजांत ) कर्माचें फल लवकर मिळत असल्यामुळें सामान्य जनतेची उपभोगवासना तृप्त करण्याकरितांच कर्माकडे प्रवृत्ति वळते.]

वर्णव्यवस्था परमेश्वरानें उत्पन्न केली असून त्या व्यवस्थेचा कर्ता परमेश्वर कसा होत नाहीं तें सांगतातः—

**चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः**
**तस्य कर्तारमपि मां विध्यकर्तारमव्ययम्** १३

**चातुर्वर्ण्यम् मया गुणकर्मविभागशः सृष्टम्। माम् तस्य कर्तारम् अपि, अव्ययम् अकर्तारम् विद्धि।**

चार वर्णांची व्यवस्था मीं (त्यांच्या त्यांच्या) गुणकर्मांच्या विभागावरून बनविली आहे. मी तिचा (वर्णव्यवस्थेचा) कर्ता असलों तरी, अव्यय (ज्याच्या ठिकाणीं वैषम्य नाहीं) असा (परमेश्वर) अकर्ता (आहे असें) समज.

[ज्ञानपूर्वक कर्मांचा उपासनेंतच अंतर्भाव होत असल्यामुळें, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र ह्या वर्णांचीं स्वभावप्राप्त नियतकर्में ज्ञानपूर्वक होत असतील तर त्याही सर्व उपासनाच होत. ह्या उपासनांमध्यें (वर्णधर्मांमध्यें) दिसून येणाऱ्या वैचित्र्यास ज्यांचीं त्यांचीं गुणकर्में म्हणजे स्वभावच कारण होतात म्हणजे प्रत्येक वर्णाचे स्वभाव व गुण भिन्न भिन्न असल्यामुळें तदनुसार त्यांच्या हातून घडणारीं कर्में (उपासना) हीं भिन्न भिन्न स्वरूपाचीं असणें साहजिकच आहे. ह्या वैचित्र्याची जबाबदारी परमेश्वरावर नाहीं. म्हणूनच परमेश्वर ह्या वर्णव्यवस्थेचा प्रत्यक्ष कर्ता होत नाहीं. सारांश, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हा वर्णभेद नुसत्या जन्मानें किंवा परमेश्वराच्या रागद्वेषानें उत्पन्न होत नसून, त्यास ज्याचें त्याचें स्वाभाविक गुणकर्मच कारण आहे असें ठरतें. ह्यावरून वर्ण हे जन्मसिद्ध नसून गुणकर्मसिद्ध असावे असें दिसतें. व महाभारत वनपर्व अध्याय १८० यांतील सर्प–(नहुप) युधिष्ठिर संवादात पुण्यश्लोक युधिष्ठिरानें हेंच तत्त्व मान्य केलें आहे. (बृ.दा. १।१४।०, खंड १६).]

उपासनेचा हेतु जर स्वार्थपर असेल तर त्याला परमात्म्याचें साहाय्य पाहिजे. तितकें मिळत नाहीं. म्हणूनच—

**न मां कर्माणि लिंपंति न मे कर्मफले स्पृहा**
**इति मां योऽभिजानाति कर्मभिर्न स बध्यते** १४

**मे कर्मफले स्पृहा न। माम् कर्माणि न लिंपति। इति यः माम् अभिजानाति, सः कर्मभिः न बध्यते।**

मला कर्मांच्या फलांविषयीं आसक्ति नसल्यामुळें, मला कर्में लिप्त (बद्ध) करीत नाहींत. ह्याप्रमाणें जो मला ओळखतो तो (ही) कर्मांनीं बद्ध होत नाहीं.

[ईश्वर जीं कर्में करितो, त्यांच्या फलाविषयीं त्याला आसक्ति असत नाहीं, म्हणून त्या कर्मांचें कर्तृत्वही ईश्वराकडे येत नाहीं, ह्यावरून फलासक्ति हीच कर्तृत्वाला, म्हणजे कर्माची जबाबदारी तें कर्म करणारावर पडण्याला कारण होत असते.]

**एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूर्वैरपि मुमुक्षुभिः**
**कुरु कर्मैव तस्मात्त्वं पूर्वैः पूर्वतरं कृतम्** १५

**पूर्वैः मुमुक्षुभिः अपि एवम् ज्ञात्वा कर्म कृतम्। तस्मात् पूर्वैः पूर्वतरम् कृतम् एव कर्म त्वम् कुरु।**

पूर्वींच्या मुमुक्षूंनीं (मोक्षाची इच्छा करणारांनीं) देखील ह्याप्रमाणें ज्ञानसंपादन करून कर्माचरण केलें आहे म्हणून, (तुझ्या) पूर्वजांनीं प्राचीन काळापासून आचरण केलेलेंच कर्म तूं (परमात्मज्ञानपूर्वक) आचरण कर.

[स्वभावतः व कुलपरंपरेनें प्राप्त असलेलें कर्मच, ज्ञानरूप उपासनापूर्वक आचरण केलें पाहिजे. मोक्षप्राप्तीकरितां कर्म बदलण्याचें कारण नाहीं. या श्लोकांतील ज्ञात्वा या पदांत इतिहास व समाजशास्त्राचें मूलतत्त्व व चातुर्वर्ण्याचें महत्त्व वगैरे विषय परमात्मस्वरूप ज्ञानाबरोबर अभिप्रेत आहेत. ह्याप्रमाणें ज्ञानपूर्वक केलेलें कर्म मोक्षोपयोगी होतें. ईश्वराप्रमाणेंच मनुष्यासदेखील कर्म करून अलिप्त रहाणें शक्य आहे. कुलपरंपरा स्वभावोत्पादक असल्यामुळें ईश्वरी ज्ञान संपादन करून व ईश्वराच्या हेतूंस अनुसरून परंपरागत म्हणजे स्वाभाविक कर्म करणें मुमुक्षूंना मोक्षदायकच आहे, असें येथें भगवंतांनीं १० व्या श्लोकाचें निगमन केलें आहे.]

येथें पूर्वजांनीं पूर्वी केलेलें कर्मच तूं कर असें सांगितलें आहे. त्यावरून कर्माचें स्वरूप निश्चित करावयास पूर्वजांचें अनुकरण एवढेंच एक साधन नसून इतर साधनें देखील कर्माचें स्वरूप ठरविण्यास अवश्य आहेत. तें सांगतातः—

**किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः**
**तत्ते कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात्** १६

**कर्म किम्, अकर्म किम्, इति अत्र कवयः अपि मोहिताः। यत् ज्ञात्वा अशुभात् मोक्ष्यसे, तत् कर्म ते प्रवक्ष्यामि।**

कर्म कोणतें व अकर्म (कर्मशून्यत्व) कोणतें याविषयीं ज्ञाते देखील मोहित (भ्रांत) झाले आहेत. जें जाणल्यानें तूं दुःखापासून (कर्मबंधापासून) मुक्त होशील, तें कर्म (कर्माकर्माचें स्वरूप) मी तुला (सविस्तर) सांगतों.

[ कर्माकर्माचें स्वरूप ठरविण्याचें तत्त्व दृष्टीच्या अगदीच उलट असल्यामुळें, विचारी मनुष्यांचीदेखील त्या बाबतींत नजरचूक होण्याचा संभव असतो.]

**कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं च विकर्मणः**
**अकर्मणश्च बोद्धव्यं गहना कर्मणो गतिः** १७

**कर्मणः बोद्धव्यम्, विकर्मणः च बोद्धव्यम्, अकर्मणः च अपि बोद्धव्यम्, हि कर्मणः गतिः गहना।**

कर्माचा विचार करणें अवश्य आहे, विकर्माचा (वाईट कर्माचा) विचार करणें अवश्य आहे, आणि अकर्माचा देखील विचार करणें अवश्य आहे; कारण, कर्माचें तत्त्व खोल आहे.

[ कर्म म्हणजे बाह्यतः दृग्गोचर होणारी क्रिया, विकर्म म्हणजे दिसण्यांत वाईट दिसणारें कर्म आणि अकर्म म्हणजे बाह्यतः कर्माचा अभाव अशीं कर्माच्या बाबतींत तीन स्वरूपें व्यवहारांत दिसून येतात. ह्यांपैकीं विकर्माचा कर्म व अकर्म ह्या दोहोंतही प्रसंगविशेषीं अंतर्भाव होण्यासारखा असल्यामुळें कर्माकर्मांच्या तात्त्विक विवेचनांतच ह्या विकर्माचाही निर्णय होण्यासारखा आहे. म्हणून त्याचें पृथक् विवेचन गीतेंत केलेलें नाहीं.]

**कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः**
**स बुद्धिमान् मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत्** १८

**यः कर्मणि अकर्म, यः च अकर्मणि कर्म पश्येत् सः मनुष्येषु बुद्धिमान्, सः युक्तः, सः कृत्स्नकर्मकृत्।**

जो कर्मामध्यें अकर्म पाहतो आणि अकर्मामध्यें कर्म पाहतो, तो

(सर्व) मनुष्यांत बुद्धिमान् (होय.) तो (च) कर्मयोगी व यथासांग कर्म करणारा (होय).

[ इंद्रियें, मन व बुद्धि यांचा कर्म हा स्वभावच असल्यामुळें, तें कर्म चालू ठेवण्याकरितां म्हणून, जीवात्म्यास निराळें कांहींही करावें लागत नाहीं. कारण त्याचें देहांतील अस्तित्वच हें कर्म चालू राहण्यास पुरें असतें. ह्याप्रमाणें इंद्रियें, मन व बुद्धि यांचें स्वाभाविक कर्मच उपासनात्मक हेतूनें शुद्ध-बुद्धीच्या नियंत्रणाखालीं नियत मुक्त असतें, तेव्हां तें बाह्यतः जरी कर्म दिसत असलें तरी तें कर्म निष्काम, अतएव बंधनकारक नसल्यामुळें जीवात्म्याचें अकर्मच होय. परंतु फलभोगाच्या इच्छेनें किंवा स्वच्छंदतः कर्मत्यागाच्या इच्छेनें जीवात्मा, इंद्रियें मन व बुद्धि यांचें स्वाभाविक कर्म बंद करील तर बाह्यतः दिसणारा कर्माचा अभाव देखील फलासक्तिपूर्वक कर्माप्रमाणें जीवात्म्याचें कर्मच होय. कारण, फलासक्तिपूर्वक घडणारें कर्म किंवा कर्मत्याग जीवात्म्यास बंधकारक होतो, त्याप्रमाणेंच स्वच्छंदतः कर्मत्याग हा संन्यासमार्गाच्या दृष्टीनें जीवात्म्यास बंधक नसला तरी लोकसंग्रहाच्या दृष्टीनें हानिकारक होतो. ह्यावरून, उपासनात्मक हेतूनें शुद्ध झालेल्या बुद्धीकडून नियत झालेलें कर्म हेंच बंधरहित कर्म म्हणजे तत्त्वतः अकर्मच होय. येथें **कर्म** म्हणजे **बंधनोत्पादक क्रिया** व **अकर्म** म्हणजे **बंधनिवर्तक क्रिया** असा अर्थ अभिप्रेत आहे. पांचव्या श्लोकापासून येथपर्यंतच्या विवेचनाचा विचार केल्यास असा निष्कर्ष निघतो कीं, ईश्वरीज्ञान संपादन करून शुद्ध बुद्धीनें लोकहितार्थ केलेल्या स्वभावनियत किंवा परंपराप्राप्त कर्मासच अकर्म म्हणजे बंधनिवर्तक व मोक्षदायक अकर्म समजावें. आणि उलट बाह्यतः कर्माभाव दिसला तरी तें बंधनोत्पादक कर्म समजावें. यावरून बुद्धींतील त्रिगुणात्मक उपभोगवासना नाहींशी करून परमात्म्याच्या ज्ञानमय उपासनेची इच्छा दृढतर करणें म्हणजे बुद्धि निस्त्रैगुण्य करणें, हेंच अकर्माचें बीज होय असें येथें भगवंतांनीं विधान केलें आहे.]

ह्याच अर्थाचें स्पष्टीकरण करितातः—

**यस्य सर्वे समारंभाः कामसंकल्पवर्जिताः**
**ज्ञानाग्निदग्धकर्माणं तमाहुः पंडितं बुधाः** १९

**यस्य सर्वे समारंभाः कामसंकल्पवर्जिताः तम् ज्ञानाग्निदग्धकर्माणम् बुधाः पंडितम् आहुः ।**

ज्याचे सर्व आरंभ ( सर्व कर्मांचे आरंभ ) उपभोगतृष्णेच्या उद्देशानें रहित असतात ( त्यांत उपभोगाचा उद्देश नसतो ), ज्ञानरूपी अग्नीनें ज्याचीं कर्में ( कर्मबंधनें ) जळून गेलेलीं असतात, त्याला सुज्ञ लोक पंडित ( शुद्धबुद्धिमान् ) म्हणतात.

[ उपभोगात्मक वासनांचा त्याग करून, उपासनामय उद्देशानें घडणारें कर्म हेंच अकर्म होय. केवळ स्वरूपतः कर्मत्याग करणें हें अकर्म नव्हे. ह्याप्रमाण काम-संकल्पांचा म्हणजे उपभोगवासनांचा त्याग करून उपासनामय शुद्ध हेतु ठेवणें हेंच बुद्धीचें निस्त्रैगुण्य होय.]

**त्यक्त्वा कर्मफलासंगं नित्यतृप्तो निराश्रयः**
**कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि नैव किंचित् करोति सः २०**

**कर्मफलासंगम् त्यक्त्वा, नित्यतृप्तः निराश्रयः कर्मणि अभिप्रवृत्तः अपि सः किंचित् न करोति एव ।**

कर्माच्या फलाविषयींची आसक्ति सोडून, त्याविषयीं नेहमीं तृप्त असणारा ( कर्मफलाविषयीं ) ज्याच्या मनाला कधींही तळमळ लागत नाहीं असा ) स्वावलंबी ( पुरुष ) कर्माचे ठिकाणीं तत्पर ( दिसत असला ) तथापि तो कांहींच करीत नाहीं. ( म्हणजे त्याचें तें कर्म तत्त्वतः अकर्मच ठरतें.)

[ या श्लोकांत तृप्ति व स्वावलंबन हे दोन सद्गुण अकर्माचें साधन म्हणून दाखविले आहेत.]

उपासना किंवा सामाजिक व्यवहार या बाबतींत कर्म करून देखील वरील दोन श्लोकांत वर्णिलेला पुरुष पूर्ण अलिप्त राहूं शकतो. पण स्नानभोजनासारख्या केवळ शारीरिक (व्यक्तिधर्मामध्यें) कर्मामध्येंदेखील तो पूर्ण अलिप्त कसा राहूं शकतो तें सांगतातः—

**निराशीर्यतचित्तात्मा त्यक्तसर्वपरिग्रहः**
**शारीरं केवलं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् २१**

**निराशीः, त्यक्तसर्वपरिग्रहः यतचित्तात्मा केवलम् शारीरम् कर्म कुर्वन् किल्बिषम् न आप्नोति ।**

उपभोगवासनारहित झालेला, विलाससामग्रीचा त्याग केलेला,

( शुद्धबुद्धीनें ) ज्याचें अंतःकरण व इंद्रियें नियत झालीं आहेत असा पुरुष शारीरिक म्हणजे शरीराचें ( स्नान, भोजन वगैरे ) कर्म करण्यानें बंध पावत नाहीं.

[ भोगेच्छा व विलासाची सामग्री यांचा मनापासून त्याग केल्याखेरीज स्नान-भोजनासारखीं कर्मे केवळ शारीरिक म्हणतां येत नाहीत. आपल्या बौद्धिक उन्नतीस अवश्य तितकी शरीराची शुद्धि व तेजस्विता कायम राखण्याकरितांच जें करावें लागतें तेंच केवळ शारीरिक होय व तशाप्रकारचें कर्म बंधकारक होत नाहीं. आणि म्हणूनच इतर कर्मांप्रमाणेंच स्थितप्रज्ञाचें केवळ शारीरिक कर्मदेखील पूर्ण निष्काम असतें, असें ठरतें. योग्य व आवश्यक अशा व्यक्तिधर्माचा अकर्मांत कसा समावेश होतो तें येथें स्पष्ट दाखवून विलाससामग्रीचा संग्रह न करणें ( अपरिग्रह ) व आत्मसंयमन हीं अकर्माचीं आणखी दोन साधनें दाखविलीं आहेत.]

याप्रमाणें कर्मांतील अकर्माचें भागशः विवेचन करून पुनः सामान्य विवेचन करतातः—

**यदृच्छालाभसंतुष्टो द्वंद्वातीतो विमत्सरः**
**समः सिद्धावसिद्धौ च कृत्वापि न निबध्यते** २२

**यदृच्छालाभसंतुष्टः द्वंद्वातीतः विमत्सरः सिद्धौ असिद्धौ च समः, कृत्वा अपि न निबध्यते ।**

सहज प्राप्त होणाऱ्या वस्तूंनीं संतुष्ट होणारा, निर्द्वंद्व, ( सुख-दुःखादि द्वंद्वांनीं विचलित न होणारा ), सरलहृदयी (व) यशाप-यशाविषयीं समबुद्धि झालेला (पुरुष) कर्में करून देखील (त्या योगानें) बद्ध होत नाहीं.

[ या श्लोकांत कर्म, बंधरहित किंवा बंधक होणें हें त्याच्या स्वरूपावर अव-लंबून नसून कर्त्याच्या बुद्धीवर अवलंबून आहे. हा सिद्धान्त येथें पुरा केला आहे. व पूर्वीप्रमाणें या श्लोकांतही निर्द्वंद्व, निर्मत्सर व समत्व या तीन अकर्माच्या साधनांचा निर्देश केला आहे.]

**गतसंगस्य मुक्तस्य ज्ञानावस्थितचेतसः**
**यज्ञायाचरतः कर्म समग्रं प्रविलीयते** २३

**गतसंगस्य मुक्तस्य ज्ञानावस्थितचेतसः यज्ञाय कर्म आचरतः समग्रम् प्रविलीयते ।**

ज्याची फलासक्ति (फलाविषयीं आग्रहबुद्धि) नष्ट झाली आहे (अर्थात्) कर्मबंधापासून जो मुक्त झाला आहे (आणि) ज्याचें अंतःकरण परमात्मज्ञानाचे ठिकाणीं स्थिर झालें आहे अशा उपासनेच्या हेतूनें कर्माचरण करणाऱ्या (पुरुषा)चें सर्व कर्म (उपासनेंत) लीन होतें, म्हणजे उपासनामय होतें.

[ कर्म मग तें पारमार्थिक असो कीं व्यावहारिक असो, त्याला ईश्वराचें अधिष्ठान अवश्य पाहिजे, असें सर्व शास्त्रकारांचे व साधुसंतांचेंही सांगणें आहे. परंतु ईश्वराचें अधिष्ठान म्हणजे काय याचा साधारणतः सामान्य मनुष्य विचार करीत नाहीं. जिज्ञासु मनुष्यानें प्रस्तुत प्रकरणाचा काळजीपूर्वक अभ्यास केल्यास ईश्वराधिष्ठान म्हणजे काय हें त्याच्या सहज लक्षांत येईल या प्रकरणात अकर्माचें स्वरूप स्पष्ट करण्याकरितां जे नियम व सद्गुण सांगितले आहेत त्याचा एकत्र विचार केल्यास या प्रकरणांतील अकर्म म्हणजेच कर्माला अवश्य असणारें ईश्वराचें अधिष्ठान होय असें सिद्ध होतें प्रस्तुत श्लोकांतील '**यज्ञायाचरतः कर्म**' या वाक्यावरून त्याचा अधिकच स्पष्ट खुलासा होत आहे. **वासनात्याग, तृप्ति, स्वावलंबन, आत्मसंयमन, अपरिग्रह, चित्ताचा निर्विकारपणा** (निर्द्वंद्व), **सरलहृदय, व समत्व** या सद्गुणनीं युक्त असलेल्या अन्तःकरणानें व ईश्वरोपासनेच्या हेतूने वैयक्तिक किंवा सामाजिक कर्म ( आश्रमधर्म व वर्णधर्म ) आचरण करणें म्हणजे खरें अकर्म किंवा ईश्वराचें अधिष्ठान असलेलें सत्कर्म होय असें निर्विवाद सिद्ध होतें. या श्लोकांत अ० ३, श्लोक ९ यात केलेल्या कर्मयोगाधिकरणांतील विधानाच्या '**यथार्थत्व**' ह्या अंशाचा अनुवाद करून मागील १८ व्या श्लोकांतील विधानाचें निगमन केलें आहे. साराश, उपासनेच्या हेतूनें म्हणजे निस्त्रैगुण्यबुद्धीनें नियतकर्म केलें असतां तें सर्व कर्म बंधरहित अतएव अकर्मच होय असें सिद्ध होतें.]

अशा प्रकारचें उपासनामय नियतकर्मच ज्ञानमय कसें ठरतें तें सांगतातः—

**ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम्**
**ब्रह्मैव तेन गंतव्यं ब्रह्मकर्मसमाधिना** २४

**ब्रह्म अर्पणम्, ब्रह्म हविः ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम् ब्रह्म, कर्मसमाधिना तेन ब्रह्म एव गंतव्यम् ।**

ब्रह्म हेंच अर्पण म्हणजे ज्याला समर्पण करावयाचें ती देवता, ब्रह्म हेंच हवि म्हणजे हवनद्रव्य, ब्रह्मरूप अग्नीमध्यें ब्रह्मरूप कर्त्यानें केलेली हवनक्रिया (आहुति टाकणें) ब्रह्मच, (आप्रमाणें) कर्माविषयीं ज्याची समबुद्धि झाली आहे, त्याला ब्रह्मच प्राप्त व्हावयाचें.

[ ह्या श्लोकांत द्रव्यमय यज्ञांतील देवता, द्रव्य, (तूप वगैरे) अग्नि, यज्ञकर्ता, हवनक्रिया व फल अशा सहा गोष्टी ब्रह्मरूपानें सांगितल्या आहेत. सर्वत्र अविनाशी ब्रह्मतत्त्व अंतर्बाह्य भरलेलें आहे. (अ० २, श्लोक १६यावरील विवरण पहा) असें सम्यक् ज्ञान ज्याला झालें तो स्थितप्रज्ञ तत्त्ववेत्ता लोकसंग्रहाकरितां जीं जीं कर्मे करितो त्या प्रत्येक कर्मांत स्वतःसुद्धां सर्व ठिकाणीं एकच आत्मतत्त्व भरलेलें आहे, ही गोष्ट तो केव्हांही विसरत नाहीं. उदाहरणार्थ, लोखंडाच्या हातोड्यानें लोखंडाचाच तुकडा ठोकून लोखंडी मोळा तयार होतो, तेथें कार्य, कारण, अधिकरण साधन इत्यादिकांस त्यांच्या त्यांच्या भिन्न आकारावरून निरनिराळीं नांवें प्राप्त झालीं असलीं तरी त्या सर्वांत लोखंड हें एकच तत्त्व आहे ही गोष्ट कोणी कधीं विसरत नाही. त्याप्रमाणें स्थितप्रज्ञ कर्मयोगी लोकसंग्रहार्थ जें जें कर्म करीत असेल त्यातील प्रत्येक गोष्टींत परमात्मतत्त्व भरलें आहे हा त्याचा प्रत्यय व तज्जन्य समबुद्धि (समाधि) कायम असल्यामुळे तत्पूर्वक केलेलें प्रत्येक कर्म हें कर्म नसून ज्ञानच होय, असें सिद्ध होतें. यावरून मागील श्लोकांत वर्णिलेल्या उपासनामय कर्मासच येथें भगवंतांनीं ज्ञानयज्ञ ठरविलें आहे.]

हा ज्ञानयज्ञ सर्व यज्ञांत श्रेष्ठ होय असें तुलनेनें दाखविण्याकरितां इतर यज्ञांचें थोडक्यांत दिग्दर्शन करितातः—

**दैवमेवापरे यज्ञं योगिनः पर्युपासते**
**ब्रह्माग्नावपरे यज्ञं यज्ञेनैवोपजुव्हति** २५

**अपरे योगिनः दैवम् एव यज्ञम् पर्युपासते । अपरे, ब्रह्माग्नौ यज्ञेन एव यज्ञम् उपजुव्हति ।**

कांहीं योगी (श्रेयस्काम पुरुष) केवळ देवतांच्याच उद्देशानें यज्ञोपासना करितात. (हा द्रव्यमय यज्ञ होय.) दुसरे कांहीं योगी वेदरूप

अग्नीमध्यें यज्ञाच्या म्हणजे अध्ययनाच्या योगानें यज्ञाप्रत ( परमेश्वराप्रत ) यज्ञ करितात म्हणजे उपासना करतात. (ह्यालाच गीतेंत पुढें स्वाध्याययज्ञ व इतर स्मृतीमध्यें ब्रह्मयज्ञ असें म्हटलें आहे.)

**श्रोत्रादीनींद्रियाण्यन्ये संयमाग्निषु जुव्हति**
**शब्दादीन्विषयानन्य इंद्रियाग्निषु जुव्हति** २६

**अन्ये श्रोत्रादीनि इंद्रियाणि संयमाग्निषु जुव्हति । अन्ये शब्दादीन् विषयान् इंद्रियाग्निषु जुव्हति ।**

कांहीं (योगी) श्रोत्र आदिकरून ज्ञानेंद्रियांचा संयमनरूप अग्नींत होम करितात. (सर्व ज्ञानेंद्रियांचा निरोध करितात.) दुसरे कांहीं ( योगी ) शब्दादि विषयांचा ज्ञानेंद्रियरूप अग्नींत होम करितात. ( ज्ञानेंद्रियांचा निरोध करून तद्द्वारा होणारें विषयसेवन बंद करितात, व हा यज्ञ समजतात. हे दोन्ही तपोयज्ञ होत.)

**सर्वाणींद्रियकर्माणि प्राणकर्माणि चापरे**
**आत्मसंयमयोगाग्नौ जुव्हति ज्ञानदीपिते** २७

**अपरे ज्ञानदीपिते आत्मसंयमयोगाग्नौ सर्वाणि इंद्रियकर्माणि प्राणकर्माणि च, जुव्हति ।**

आणखी दुसरे (योगी) आत्मज्ञानानें प्रदीप्त केलेल्या चित्तवृत्तिनिरोधात्मक योगरूपी अग्नींत सर्व इंद्रियांच्या कर्मांचा व सर्व प्राणांच्या कर्मांचा होम करितात. (इंद्रियांचीं व प्राणवायूंचीं सर्व कर्में बंद करून चित्तानें एकाग्रतेनें आत्मज्ञानपूर्वक ध्यानधारणा करितात. हा सर्व कर्मसंन्यासरूपी योगयज्ञ होय.)

**द्रव्ययज्ञास्तपोयज्ञा योगयज्ञास्तथापरे**
**स्वाध्यायज्ञानयज्ञाश्च यतयः संशितव्रताः** २८

**द्रव्ययज्ञाः तपोयज्ञाः योगयज्ञाः स्वाध्यायज्ञानयज्ञाश्चः च तथा अपरे संशितव्रताः यतयः ( संति ) ।**

द्रव्यानें यज्ञ (उपासना) करणारे, तपश्चर्येनें यज्ञ करणारे, ध्यान-

योगानें यज्ञ करणारे, वेदाध्ययनानें यज्ञ करणारे व ज्ञानानें ( ज्ञान दान किंवा संपादन करणें हा ) यज्ञ करणारे, त्याचप्रमाणें दुसरे दृढमति ( कडक नियम पाळणारे ) योगी ( आहेत. )

**अपाने जुव्हति प्राणं प्राणेऽपानं तथाऽपरे**
**प्राणापानगती रुध्वा प्राणायामपरायणाः　　२९**

**अपरे प्राणायामपरायणाः प्राणापानगती रुध्वा, अपाने प्राणम्, तथा प्राणे अपानम् जुव्हति ।**

आणखी दुसरे प्राणायामांत निमग्न असणारे ( योगी ) प्राणवायु व अपानवायु यांच्या गति बंद करून अपानवायूमध्यें प्राणवायूचा व प्राणवायूमध्यें अपानवायूचा होम करितात. ( ह्याचाही तपोयज्ञांतच अंतर्भाव होतो. )

**अपरे नियताहाराः प्राणान्प्राणेषु जुव्हति**
**सर्वेऽप्येते यज्ञविदो यज्ञक्षपितकल्मषाः　　३०**

**अपरे नियताहाराः प्राणान् प्राणेषु जुव्हति । एते सर्वे अपि यज्ञविदः, यज्ञक्षपितकल्मषाः ।**

दुसरे कांहीं ( योगी ) आहारांचें नियमन करून प्राणांचा प्राणवायूंत होम करितात ( उपोषणादिकांनीं देह व इंद्रियवृत्ति क्षीण करितात. हाही तपोयज्ञच होतो ) हे सर्वही ( श्लोक २४ पासून येथपर्यंत वर्णन केलेले ) यज्ञवेत्ते असून, यज्ञाच्या ( उपासनेच्या ) योगानें निष्पाप झालेले असतात.

**यज्ञशिष्टामृतभुजो यांति ब्रह्म सनातनम्**
**नायं लोकोऽस्त्ययज्ञस्य कुतोऽन्यः कुरुसत्तम　　३१**

**यज्ञशिष्टामृतभुजः सनातनम् ब्रह्म यांति । कुरुसत्तम ! अयज्ञस्य अयं लोकः न अस्ति, अन्यः कुतः ।**

यज्ञाचें अवशिष्ट ( यज्ञ करून उरलेलें ) तेंच अमृत होय. ह्या अमृताचा उपभोग घेणारे ( योगी ) अविनाशी ब्रह्माला प्राप्त होतात.

अर्जुना, ( कोणत्याही प्रकारचा ) यज्ञ ( उपासना ) न करणारास इहलोकही साध्य नसतो. मग परलोक कोठून मिळणार ?

[ ह्या श्लोकांत व पूर्वी अ. ३, श्लोक १३ यांतही 'यज्ञशिष्ट' हा शब्द आला आहे. 'विघसोभुक्तशेषंतु यज्ञशेषं तथाऽमृतम्' ( मनु, अ. ३ श्लोक २८५ ) अतिथिभोजनानंतर उरलेलें अन्न हें '**विघस**' व यज्ञ करून उरलेलें (द्रव्य)'**अमृत**' होय. याप्रमाणें विघस किंवा अमृत हेंच नित्य सेवन करावें असें मनूचें वचन आहे. या धर्मशास्त्राच्या नियमाप्रमाणेंच वरील दोन्ही ठिकाणीं भगवंतांनीं यज्ञशेषसेवनाचें महत्त्व सांगितलें आहे. ह्यावरून, स्थितप्रज्ञ कर्मयोग्यांचीं सर्व कर्में यज्ञमय म्हणजे उपासनामय असल्यामुळें त्यांचें विषयसेवन हें अमृतसेवनच होय, असें सिद्ध होतें. अयज्ञ म्हणजे सकाम किंवा निष्काम इत्यादि कोणत्याही प्रकारानें यज्ञ म्हणजे भगवदुपासना न करणारा केवळ स्वार्थपरायण मनुष्य अघाशी होय. कारण आपल्या द्रव्याचा विनियोग कोणत्याही रीतीनें उपासनेकडे अंशतः देखील न करितां त्याचा स्वतःच्या उपभोगाकडेच विनियोग केल्यास तें द्रव्य म्हणजे मूर्तिमंत अघ म्हणजे पापच होय. अशा पातकी मनुष्यास ऐहिक सुख सुद्धां मिळत नाहीं. मग पारमार्थिक सुखाविषयीं तर शंकाच नको ! ]

**एवं बहुविधा यज्ञा वितता ब्रह्मणो मुखे**
**कर्मजान्विद्धि तान्सर्वानेवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे ३२**

**एवम् बहुविधाः यज्ञाः ब्रह्मणः मुखे वितताः । तान् सर्वान् कर्मजान् विद्धि । एवम् ज्ञात्वा विमोक्ष्यसे ।**

अशा अनेक प्रकारच्या यज्ञांचा विस्तार ब्रह्ममुखांत म्हणजे वेदांत केलेला आहे. ते सर्व यज्ञ, कर्मानेंच संपादन होणारे आहेत, असें जाण. असें जाणल्यानें तूं मुक्त होशील.

[ कर्मावांचून कोणतीही उपासना होणें शक्य नाहीं. यावरून प्रत्येक उपासनेंत कर्माचें महत्त्व कसें व किती आहे, हें समजणें अवश्य आहे. ह्याप्रमाणें ज्याला कर्मतत्त्वाचें ज्ञान झालेलें असतें, तोच कर्मबंधापासून मुक्त होतो.]

**श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परंतप**
**सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते ३३**

**परंतप, पार्थ ! द्रव्यमयात् यज्ञात् ज्ञानयज्ञः श्रेयान्। सर्वम् अखि-
लम् कर्म ज्ञाने परिसमाप्यते।**

परंतपा, अर्जुना ! द्रव्यमयादि यज्ञापेक्षां ज्ञानयज्ञ श्रेयस्कर होय. ( कारण, ह्या ज्ञानयज्ञामध्यें ) सर्व व अखिल म्हणजे बंधशून्य कर्मांचें ज्ञानांत पर्यवसान होतें.

[ श्लोक २४ ते ३० अखेर निरनिराळ्या अनेक यज्ञांचें थोडक्यांत वर्णन दिलें असून, त्यांतच २८ व्या श्लोकांत सर्व यज्ञांचें परिगणन केलें आहे. ह्या २८ व्या श्लोकाच्यामागें व पुढें वर्णन केलेल्या सर्व यज्ञांचा ह्या २८ व्या श्लोकांतील पांच यज्ञांतच अंतर्भाव होतो. ह्या सर्व यज्ञांची ज्ञानयज्ञाशीं तुलना विवक्षित असल्या-मुळें, ह्या तुलनेच्या श्लोकांत परिगणनश्लोकांतील पहिल्या द्रव्ययज्ञाचा तेवढा उल्लेख करून, त्याबरोबरच त्यापुढील तीनही यज्ञ उपलक्षणानें पहिल्या द्रव्य-यज्ञांतच समाविष्ट करून, त्या चारी यज्ञांची ज्ञानयज्ञाशीं तुलना केली आहे. आणि ज्यांत सर्व कर्मांचें पर्यवसान होतें, तो ज्ञानयज्ञच इतर सर्व यज्ञांपेक्षां श्रेयस्कर होय असें भगवंतांनीं येथें विधान केलें आहे.]

हें ज्ञान संपादन करण्याचीं साधनें सांगतात:—

**तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया**
**उपदेक्ष्यंति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ३४**

**ज्ञानिनः तत्त्वदर्शिनः ते प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया तत् ज्ञानम्
उपदेक्ष्यंति, ( इति ) विद्धि।**

विद्वान् तत्त्ववेत्ते ते ( गुरू ) नमस्काराच्या योगानें ( नम्रतापूर्वक ) प्रश्नानें, ( आणि ) सेवा केल्यानें ( प्रसन्न होऊन ) तें ( ज्ञान ) सच्छिष्याला उपदेशितात. ( सांगतात ) हें ध्यानांत ठेव.

[ या श्लोकांत प्रणिपात, परिप्रश्न व सेवा या तीन पदांनीं तीन प्रकारच्या सद्‌गुणांची शिष्याला आवश्यकता दाखविली आहे. त्यांत परिप्रश्न हा मुख्य असून बाकीचे दोन तदनुषंगिक आहेत हें प्रश्नोपनिषदांतील **यथाकाम प्रश्नान् पृच्छथ** (२) या वाक्यावरून उघड होण्याजोगें आहे.]

ह्या ज्ञानाचें महत्त्व सांगतातः—

**यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पांडव**
**येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि ३५**

**पांडव ! यत् ज्ञात्वा एवम् पुनः मोहम् न यास्यसि। येन अशेषेण भूतानि आत्मनि अथो मयि द्रक्ष्यसि।**

अर्जुना ! जें ( हें ) ज्ञान संपादन केल्यावर तुला असा ( आतां-प्रमाणें ) पुन्हा मोह उत्पन्न होणार नाहीं. ज्या ( ह्या ) ज्ञानाच्या योगानें संपूर्ण सृष्टि आत्मतत्त्वाच्या ठिकाणीं किंवा माझ्या म्हणजे परमात्म्याच्या ठिकाणी पाहशील.

[ अव्यक्तोपासनेच्या दृष्टीनें सर्वांभूतीं एकच ब्रह्मतत्त्व पाहणें, किंवा व्यक्तोपासनेच्या दृष्टीनें सबाह्याभ्यंतरीं एकच परमेश्वर व्यापून राहिला आहे असें पाहणें, ह्या दोन्ही दृष्टींचा येथें उल्लेख केला आहे. ह्यावरून एकाच उपासनेचे व्यक्त व अव्यक्त असे दोनही प्रकार गीताशास्त्रांत मान्य आहेत असें दिसून येतें. म्हणून ह्या दोन्ही प्रकारच्या उपासनेस अनुलक्षूनच गीताशास्त्रांत '**ज्ञान**' ह्या शब्दाचा अनेक स्थलीं उपयोग केलेला आहे. ह्या ज्ञानाचें आध्यात्मिक फल, सर्वांभूतीं एकच भगवत्तत्त्व पाहणें हें असून, कार्याकार्य, धर्माधर्म निर्णयाचे बाबतीत केव्हांही चित्तास व्यामोह उत्पन्न न होतां बुद्धि शुद्ध व स्थिर राहणें हें त्याचें व्यावहारिक किंवा दृश्य फल होय. ह्या नियमास अनुसरूनच स्मृतिकारांनीं धर्माधर्मनिर्णयाचा पूर्ण अधिकार एकट्या अध्यात्मवेत्त्यास दिलेला आहे. व्यवहार व वेदांत यांची नेहमीं फारकत असते, असें जोरजोरानें प्रतिपादन करणाऱ्या लोकांनीं वरील वचनांचा शांत चित्तानें विचार करावा.]

**अपि चेदसि पापेभ्यः सर्वेभ्यः पापकृत्तमः**
**सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं संतरिष्यसि ३६**

**सर्वेभ्यः पापेभ्यः पापकृत्तमः असि चेत् अपि। ज्ञानप्लवेन एव सर्वम् वृजिनम् संतरिष्यसि।**

तूं सर्व पातक्यांहून अत्यंत पातकी जरी असलास तरी देखील ज्ञानरूप नौकेनेंच सर्व पातकांतून तरून जाशील, ( ह्या भगवज्ज्ञानाच्या योगानेंच निष्पाप होशील.)

**यथैधांसि समिद्धोऽग्निर्भस्मसात्कुरुतेऽर्जुन**
**ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात्कुरुते तथा　　३७**

**अर्जुन ! यथा समिद्धः अग्निः एधांसि भस्मसात् कुरुते, तथा ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात् कुरुते ।**

अर्जुना ! ज्याप्रमाणें प्रदीप्त अग्नि लाकडें जाळून टाकतो, त्याप्रमाणें परमात्मज्ञानरूप अग्नि सर्व कर्मबंध जाळून टाकतो. ( म्हणजे कर्मांचे बंध ज्ञानाच्या योगानें नष्ट होतात.)

वरील दोन श्लोकांत वर्णिलेलें सामर्थ्य ज्ञानांत असण्याचें कारण व ज्ञानप्राप्तीचें गुरुपदेशाव्यतिरिक्त अन्य साधन सांगतातः—

**नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते**
**तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विंदति　　३८**

**हि इह ज्ञानेन सदृशम् पवित्रम् न विद्यते । तत् योगसंसिद्धः कालेन आत्मनि स्वयम् विंदति ।**

कारण, ह्या जगांत परमात्मज्ञानासारखें पवित्र दुसरें कांहीं नाहीं. तें ज्ञान स्थितप्रज्ञ कर्मयोगी योग्य कालानें स्वतःच्या ठिकाणीं स्वतःच मिळवितो. ( त्याला ब्रह्मसाक्षात्कार होतो.)

[ या श्लोकांत भगवंतांनी ज्ञानाचें महत्त्व सांगितलें असून तें ब्रह्मज्ञान गुरुला शरण न जातां स्वावलंबनाच्या कर्मयोगानें मिळणें शक्य आहे. त्यांत वैयक्तिक गुरुकरितां अडून बसण्याचें कारण नाहीं, असें स्पष्ट सांगितलें आहे.]

ज्ञानप्राप्तीस अधिकारी कोण तें सांगतातः—

**श्रद्धावाँल्लभते ज्ञानं तत्परः संयतेंद्रियः**
**ज्ञानं लब्ध्वा परां शांतिमचिरेणाधिगच्छति　　३९**

**श्रद्धावान्, संयतेंद्रियः, तत्परः ज्ञानम् लभते । ज्ञानम् लब्ध्वा अचिरेण पराम् शांतिम् अधिगच्छति ।**

श्रद्धावान्, जितेंद्रिय व ज्ञानाची उत्कंठा असलेल्या पुरुषाला ( हें ) ज्ञान प्राप्त होतें. ( हें ) ज्ञान प्राप्त झाल्यावर लवकरच ( त्याला ) पूर्ण शांति ( समाधान ) प्राप्त होतें.

[ अध्याय ३, श्लोक ३१ यांत श्रद्धा व अनसूया हें कर्मयोगाचें प्राथमिक साधन सांगितलें आहे, त्याचप्रमाणें येथेंही श्रद्धा, इंद्रियनिग्रह व ज्ञानलालसा हीं ज्ञान-प्राप्तीचीं प्राथमिक साधनें सांगून, ज्ञानोपासनेनें शांति मिळते, म्हणजे मोक्षप्राप्ति होते असें सांगितलें आहे. यावरून श्रद्धा, इंद्रियनिग्रह व ज्ञानप्राप्तीची उत्कंठा या तीन गोष्टींनीं प्रयत्नशील साधकाचा बुद्धियोग पूर्ण होऊन त्याला अपरोक्षज्ञान (साक्षात्कार) लौकर होतें असें सिद्ध होतें, मागील श्लोकाच्या उत्तरार्धांत सांगित-लेल्या योगसंसिद्धाच्या स्वावलंबी मार्गाचें येथें स्पष्टीकरण झालें आहे. याप्रमाणें कर्माचें ज्ञानांत पर्यवसान, ज्ञानप्राप्तीचे गुरुगम्य व स्वावलंबी असे दोन मार्ग, ज्ञानानें मोहनिवृत्ति, ज्ञानानें पातकांचा नाश, ज्ञानानें कर्मबंधांचा नाश, ज्ञानाची अत्यंत पवित्रता व ज्ञानानेंच मोक्षप्राप्ति ह्या गोष्टींनीं **ज्ञानाचें महत्त्व** दाखवून ज्ञानयज्ञाची श्रेष्ठता सिद्ध केली आहे. असा ज्ञानी मनुष्य कर्मबंधांतून मुक्त होतो. अर्थात् ज्ञानयज्ञ हा सर्व यज्ञांहून श्रेयस्कर होय असें ३३ व्या श्लोकांतील विधानाचें येथें निगमन केलें आहे.]

**अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति**
**नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः ४०**

**अज्ञः च, अश्रद्दधानः संशयात्मा च विनश्यति। संशयात्मनः अयम् लोकः न, परः न, सुखम् न अस्ति।**

( परंतु ) अज्ञ, श्रद्धाहीन व संशयखोर मनुष्य नाश पावतो ( कारण ) संशयखोर मनुष्याला इहलोक, परलोक किंवा सुख मिळत नाही.

[अ. ३, श्लोक ३२ यांतील विरुद्धवृत्तीचे दुष्परिणामच येथें पुन्हा सांगितले आहेत.]

येथपर्यंत वर्णिलेल्या ज्ञानाचें महत्त्व उपसंहाररूपानें पुन्हा थोडक्यांत सांगतात:—

**योगसंन्यस्तकर्माणं ज्ञानसंछिन्नसंशयम्**
**आत्मवंतं न कर्माणि निबध्नंति धनंजय ४१**

**धनंजय ! ज्ञानसंछिन्नसंशयम्, योगसंन्यस्तकर्माणम्, आत्मवंतम् कर्माणि न निबध्नंति।**

अर्जुना, (ज्यानें) ज्ञानाच्या योगानें संशय नाहींसा केला आहे. व

बुद्धियोगानें कर्मसंन्यास केला आहे अशा ज्ञानी (स्थितप्रज्ञ) पुरुषाला कर्मे बद्ध करीत नाहींत.

[ आत्मज्ञानानें सर्व संशयनिवृत्ति होऊन समबुद्धीनें कर्मांचा (म्ह. फलांचा) पूर्णपणें त्याग झाला म्हणजेच मनुष्य मुक्त होतो.]

येथपर्यंत केलेल्या ज्ञान व कर्म यांच्या तात्त्विक विवेचनाचा व्यक्तिशः अर्जुनास उपदेश करितातः—

**तस्मादज्ञानसंभूतं हृत्स्थं ज्ञानासिनाऽऽत्मनः**
**छित्त्वैनं संशयं योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत ४२**

**तस्मात् भारत! अज्ञानसंभूतम् आत्मनः हृत्स्थम् ज्ञानासिना एवम् छित्वा, योगम् आतिष्ठ, उत्तिष्ठ।**

म्हणून, अर्जुना! अज्ञानामुळें उत्पन्न झालेला आपल्या हृदयांतील हा (धर्माधर्मविषयींचा) संशय ज्ञानरूप खड्गानें तोडून टाकून कर्मयोगाचें अवलंबन कर (आणि) ऊठ, (कर्तव्य) तत्पर हो.

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे ज्ञानकर्मसंन्यासयोगो नाम चतुर्थोऽध्यायः।**

[ ह्याप्रमाणें ज्ञानाची श्रेष्ठता अनेक प्रकारांनीं सिद्ध होते. म्हणून, त्या ज्ञानानें मनांतील संशय दूर करून पूर्वी सांगितल्याप्रमाणें कर्मयोगाचेंच अवलंबन केलें पाहिजे असा येथें पूर्वोक्त विवेचनाचा अर्जुनास उपदेश केला आहे.]

याप्रमाणें श्रीभगवंतांनीं गाइलेल्या उपनिषदांतील ब्रह्मविद्यांतर्गत कर्मयोगशास्त्रविषयींच्या श्रीकृष्ण व अर्जुन ह्यांच्या संवादांतील (ज्ञानकर्मसंन्यास) ज्ञानपूर्वक कर्मफलत्यागप्रकरण ह्या नांवाचा चौथा अध्याय समाप्त झाला.

---

# रहस्यदीपिकेच्या चतुर्थाध्यायाचा उपसंहार.

## चौथ्या अध्यायांतील विषयानुक्रमणिका.

| श्लोक. | | विषय. |
|---|---|---|
| १–३ | ... | उपदेशपरंपरा. |
| ४ | ... | अर्जुनाचा प्रश्न. |
| ५–९ | ... | अवताराधिकरण. |
| १०–१५ | ... | ज्ञानविशिष्ट कर्माधिकरण. |
| १६–१७ | ... | निस्त्रैगुण्याची प्रस्तावना. |
| १८–२३ | ... | निस्त्रैगुण्याधिकरण. |
| २४–३२ | ... | यज्ञांचें परिगणन. |
| ३३–३९ | ... | ज्ञानयज्ञाधिकरण. |
| ४०–४१ | ... | उपसंहार. |
| ४२ | ... | प्रत्यक्ष उपदेश. |

यज्ञस्वरूपाचें म्हणजे उपासनेचें पूर्ण विवेचन करण्याच्या हेतूनें, अव्यक्त परमात्मा व्यक्त कसा होतो, व व्यक्त रूपानें त्या सर्वव्यापी परमेश्वराचा अवतार केव्हां व कशाकरितां होतो, हें भगवंतांनीं प्रथम अवताराधिकरणांत सांगितलें आहे. नंतर श्लोक १० ते १५ अखेर ज्ञानकर्माधिकरणांत, सर्वज्ञ परमेश्वराचें व्यक्त अव्यक्त स्वरूप व अवतारचरित्रांच्या अभ्यासानें त्यांत ऐतिहासिक ज्ञानाचाही समावेश होतो. त्यांतील हेतु नीट ओळखून आणि ते नेहमीं दृष्टीसमोर ठेवून कर्मयोगाचरण केलें पाहिजे. याप्रमाणें ज्ञानपूर्वक कर्मयोगाचरणानें पुष्कळ महात्मे मुक्त झाले आहेत. ह्यावरून परमेश्वरस्वरूपाचें ज्ञान संपादन करणें व त्याच्या अवताराच्या हेतूस अनुसरून वागणें हीच भगवंताची खरी उपासना होय, असें सिद्ध केलें आहे. पुढें श्लोक १८ ते २३ अखेर निस्त्रैगुण्याधिकरणांत, कर्माच्या बाह्यस्वरूपावरूनच कर्म किंवा अकर्म ठरत नसून तें कर्त्याच्या हेतूवरूनच ठरवावें लागतें. कारण, प्रसंगविशेषीं बाह्यतः कर्म दिसत नसतां, तत्त्वतः कर्मच चालू असतें; त्याचप्रमाणें केव्हां तरी, बाह्यतः कर्म यथायोग्य चालू आहे, असें स्पष्ट दिसत असतांही तत्त्वतः तें अकर्मच असतें, म्हणून अ. २, श्लोक ४५ यांतील विधानाप्रमाणें निस्त्रैगुण्यबुद्धियुक्त स्थितप्रज्ञ जें कर्म करितो तें उपासनार्थच असल्या-

मुळें, त्या उपासनेंत लीन होऊन जातें. ह्यामुळें तें बाह्यतः कर्म दिसत असलें तरी तत्त्वतः अकर्मच ठरतें. अर्थात् सकाम म्हणजे त्रैगुण्य हेतूनें केलेलें कर्म बाह्यतः दिसो किंवा न दिसो, तें बंधनकारक होत असल्यामुळें तत्त्वतः कर्मच होय, आणि निस्त्रैगुण्य म्हणजे शुद्ध हेतूनें केलेलें कर्म बाह्यत: कर्म दिसत असलें तरी तें उपभोगवासनारहित, अनएव बंधशून्य असल्यामुळें, अकर्मच होय असें सिद्ध केलें आहे.

श्लोक १०–२३ अखेरपर्यंत मुख्यत्वेंकरून दोन अधिकरणें ( प्रकरणें ) आलीं आहेत. १० व्या श्लोकांतील ज्ञानतपम् या शब्दाचा ज्ञानयुक्त कर्म असा अर्थ केला आहे. कारण कोणत्याही अदृश्यतत्त्वाचें ज्ञान (अतींद्रियज्ञान) प्रथम परीक्षा म्हणजे अप्रत्यक्ष किंवा शाब्दिकच असतें. तें ज्ञान परिपक्व होऊन अनुभवाच्या म्हणजे साक्षात्काराच्या स्वरूपास येण्यास कर्मयोगच अत्यंत उपयोगी आहे, असा भगवंतांचा अभिप्राय आहे व चौदाव्या श्लोकाचा उत्तरार्ध हाच अभिप्राय दाखवीत आहे. यावरूनच " ज्ञानतपसापूताः " म्हणजे परमात्मज्ञान संपादन करून कर्मयोगाचरणानें पूत म्हणजे शुद्धबुद्धि झालेले, अर्थात् ज्यांचें ज्ञान कर्मयोगानें परिपक्व झालें आहे असे लोक मद्भावाला म्हणजे परमात्मस्वरूपाला प्राप्त होतात व हाच अद्वैतांतील ब्रह्मसाक्षात्कार होय १५ व्या श्लोकांत याच विषयाचा सिद्धान्त करताना ज्ञानानंतर परंपरेचाही विचार करण्यास सांगितलें आहे. अप्रत्यक्ष कां होईना, पण ईश्वरी ज्ञान झाल्यानंतर कर्माचे बाबतींत पूर्वजांच्या अगर समाजाच्या परंपरेचा विचार करण्याचें काय प्रयोजन आहे ? असा साहजिक प्रश्न उत्पन्न होतो. या प्रश्नाचें उत्तर पुढील प्रकरणांत म्हणजे श्लोक १८–२३ पर्यंत सोपपत्तिक आलें आहे. ईश्वरोपासनेच्या उत्कंठेनें बुद्धि अत्यंत निःस्वार्थ होऊन पूर्ण उपासनामय होते, अशा वेळींच त्या पुरुषाचे हातून खरें अकर्म म्हणजे बंधरहित कर्म घडतें. अशा स्वार्थत्यागी व उपासनेच्छु पुरुषांचें सार्वजनिक अगर वैयक्तिक कर्म बंधनकारक होत नाहीं, त्याचें सर्व कर्म उपासनेंत लीन ( अंतर्भूत ) होतें. व हेंच त्या कर्मांतील ईश्वराचें अधिष्ठान होय. यावरून परिपक्व ज्ञानानें बुद्धि नितांत शुद्ध होईपर्यंत कर्माचे बाबतींत कुलपरंपरादिकांचा विचार करणें कसें आवश्यक आहे हें सहजच लक्षांत येण्याजोगें आहे. बुद्धियोगसंपन्न पुरुष मात्र आपल्या ज्ञानसामर्थ्यानें, कर्म कोणतें व अकर्म कोणतें हें ठरविण्यास समर्थ असतो, बुद्धियोगयुक्त होईतोंपर्यंत मोठमोठया मी मी म्हणणाऱ्या लोकांनादेखील कर्म कोणतें हें ठरविणें कठीण असतें. हीच गोष्ट

भगवंतांनीं सोळाव्या श्लोकांत सांगितली आहे. ती किती यथार्थ आहे हें निराळें सांगावयास नको. नंतर २४ व्या श्लोकांत स्थितप्रज्ञाचें उपासनामय कर्म हाच ज्ञानयज्ञ होय, असें रूपकानें वर्णन केलें आहे, व पुढें श्लोक २५ते ३२ अखेर द्रव्ययज्ञ, तपोयज्ञ योगयज्ञ, स्वाध्याययज्ञ व ज्ञानयज्ञ यांचें वर्णन करून हे सर्व यज्ञ कर्मसाध्य व पापविनाशक आहेत, असें सांगितलें आहे. नंतर श्लोक ३३ ते ३९ अखेरीं ज्ञानयज्ञाधिकरणांत सर्व कर्मांचें शेवटीं ज्ञानांतच पर्यवसान होत असल्यामुळें सर्व यज्ञांत ज्ञानयज्ञच श्रेष्ठ होय असें सांगितलें आहे. ईश्वर–साक्षात्कार हें ह्या ज्ञानाचें आध्यात्मिक फल असून, सदसद्विवेकबुद्धि नेहमीं पूर्णपणें जागृत राहणें हें त्याचें दृश्यफल होय असें दाखविलें आहे; कारण, ह्या सृष्टींत ब्रह्मदेवापासून तों यःकश्चित् गवताच्या काडीपर्यंत सर्व पदार्थ त्रिगुणाच्या मिश्रणानें बनलेले असल्यामुळें, त्यांतील कोणताही पदार्थ केवळ शुद्ध किंवा केवळ मलिन सांपडणें शक्य नाहीं. परंतु परमात्मज्ञान हें त्रिगुणांतील असल्यामुळें केवळ पवित्र आहे, इतकेंच काय, पण इतर सर्व पदार्थांतील दोष घालवून त्यांच्या ठिकाणीं पावित्र्य उत्पन्न करण्यासही कारण होतें; म्हणून नीतीचें किंवा दैवी संपत्तीचें उगमस्थान हें ज्ञानच होय असें सिद्ध होतें.

या अध्यायासंबंधानें थोडक्यांत असें सांगतां येईल कीं, तिसऱ्या अध्यायांत वर्णिलेल्या कर्मयोगाचा अध्यात्मज्ञानाशीं संबंध कां व कसा पोंचतो, हें येथें स्पष्ट करून दाखविलें आहे. अवतारवर्णनाच्या उपलक्षणानें ईश्वराच्या व्यक्तस्वरूपाची उपपत्ति कळते. धर्मस्थापनेकरतांच ईश्वर व्यक्तस्वरूपानें प्रगट होतो व धर्मसंस्थापनेचें म्हणजे समष्टिधर्माच्या उन्नतीचें कार्य घडवून आणतो. गीताशास्त्रांत आलेल्या अवतारविवेचनाचा सूक्ष्म दृष्टीनें विचार केल्यास पूर्णावतार किंवा अवतारी पुरुषाचा पुन्हा प्रत्यवतार या कल्पना शास्त्रीयदृष्ट्या सोपपत्तिक नाहींत असें दिसून येतें. गीताशांकरभाष्याच्या प्रस्तावनेंत "नारायणः अंशेन किल सबभूव" असें भाष्यकारांनीं लिहिलें आहे. यावरून पूर्णावताराची कल्पना आचार्यांना देखील ग्राह्य वाटत नव्हती असें म्हणण्यास हरकत नाहीं. अवतार व विभूति या दोन शब्दांच्या अर्थांत फरक आहे. प्रस्तुत अध्यायांत फक्त अवताराचेंच विवेचन आलें आहे. त्याचप्रमाणें धर्मसंस्थापनेकरितांच ईश्वरावतार होतो असा भगवंतांचा स्पष्ट निर्देश असल्यामुळें साधुसंतांचे किंवा इतर देवतांचे अवतार झाल्यास त्यांना अवतार ही संज्ञा न देतां त्यांचा विभूतिवर्गांतच समावेश करावा असें ओघानेंच प्राप्त होतें. याप्रमाणें ईश्वराच्या व्यक्ताव्यक्त म्हणजे सगुण निर्गुण स्वरूपाचें ज्ञान हेंच अध्यात्म-

ज्ञान होय. अध्यात्मज्ञान संपादन करून कर्मयोगाचरण केल्यास लवकरच त्या ज्ञानाचें अपरोक्षाच्या म्हणजे साक्षात्काराच्या स्वरूपांत पर्यवसान होऊन मनुष्य कृतार्थ होतो.

प्रथम शास्त्राध्ययनानें संपादन केलेलें ज्ञान परोक्ष ( अप्रत्यक्ष किंवा शाब्दिक ) असतें. या ज्ञानास अपरोक्षत्व येण्याकरितां वेदान्तशास्त्रांत जीं साधनें सांगितलीं आहेत त्या सर्वांपेक्षां कर्मयोग हें साधन श्रेष्ठ होय, असें श्रीकृष्णाचें सांगणें आहे. कर्मयोगानें ज्ञानाचा परिपाक होऊन साक्षात्कार लवकर होतो व कर्मयोग व्यक्तीप्रमाणें समष्टीसही कल्याणप्रद होतो. शिवाय अध्यात्मज्ञान झाल्याखेरीज खरा म्हणजे केवल लोकसंग्रहकारक कर्मयोग आचरण्याची पात्रताच मनुष्याचे अंगीं यावयाची नाहीं हें याच अध्यायांतील अठराव्या श्लोकांत बुद्धिमान, युक्त व कृत्स्नकर्मकृत् या विशेषणांनीं सिद्ध झालें आहे, ज्याप्रमाणें तिसऱ्या अध्यायांत जनकाचा उल्लेख केला आहे, त्याप्रमाणें या अध्यायांत देखील प्राचीन मुमुक्षु कर्मयोग्यांचा उल्लेख करून तूं देखील त्याप्रमाणें ज्ञानपूर्वक कर्माचरण कर, असा भगवंतानीं अर्जुनास उपदेश केला आहे. तिसऱ्या अध्यायांत सिद्धावस्थेंतील लोकसंग्रहार्थ कर्मयोगाचें स्पष्टीकरण करण्याकरितां जनकादिकांचा उल्लेख केला आहे व या अध्यायांत साधकावस्थेंतील कर्मयोगाचें स्वरूप लक्षांत येण्याकरितां प्राचीन मुमुक्षूंचा उल्लेख केला आहे. यावरून कर्मयोगाची परंपरा कशी अविच्छिन्न आहे हें चांगलेंच लक्षांत येतें.

कर्माचें ज्ञानमूलकत्व गीताशास्त्राप्रमाणें मनूनें देखील पूर्णपणें मान्य केलें आहे (मनु,० अ. ४, श्लोक २४ पहा). याप्रमाणें ज्ञानपूर्वक केलेलें कर्म बंधरहित असून त्याचा उपासनेंत किंवा ज्ञानांतच अंतर्भाव होतो. ज्याप्रमाणें सिद्धावस्थेंत कर्मयोग लोकसंग्रहार्थ उपयोगी पडतो, त्याप्रमाणेंच साधकावस्थेंत ज्ञानाच्या परिपाकास उपयोगी पडतो; म्हणून आत्मज्ञान हा कर्मयोगाचा आत्माच आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. ह्याप्रमाणें सर्व बाजूंनीं ज्ञानाचें महत्त्व सिद्ध करून आणि गुरूपदेश किंवा स्वावलंबनाचा योगसंसिद्ध मार्ग हीं दोन ज्ञानप्राप्तीचीं साधनें सांगून शेवटीं पुन्हा कर्मयोगाचरणाचा उपदेश करून हा अध्याय समाप्त केला आहे.

# पंचमोऽध्यायः ।

चौथ्या अध्यायामध्यें शेवटच्या–ज्ञानयज्ञाधिकरणांत वर्णन केलेलें ज्ञानाचें महत्त्व लक्षांत घेतां सांख्यनिष्ठेस ज्ञानाची आवश्यकता सारखीच आहे असें सिद्ध होतें· ह्यावरून हें ज्ञान अपरोक्षज्ञान किंवा साक्षात्कार संपादन करणें हीच मानवी जीविताची पूर्णता असली पाहिजे, हें उघड आहे. मग ही पूर्णता संन्यासमार्गानें झाली काय किंवा कर्मयोगानें झाली काय, सारखीच! ह्यावरून मोक्षप्राप्तीच्या दृष्टीनें सारखेच असलेले संन्यास व कर्मयोग हे दोन्ही मार्ग, साधकाच्या अभिरुचीवर अवलंबून राहतात व ज्ञानप्राप्तीनंतर त्यानें वाटल्यास संन्यासमार्ग चालवावा किंवा इच्छेस आल्यास कर्मयोग सुरू ठेवावा असें प्राप्त होतें. ह्या दोहोंपैकीं अमुकच मार्ग स्वीकारणें जरूर आहे, असें नसतां भगवंतांनी प्रथम ज्ञानाचें महत्त्व वर्णन करून, शेवटीं पुन्हा कर्मयोगाचाच उपदेश विशेषतः कां केला अशी शंका येणें साहजिक आहे. ह्या शंकेचें निरसन करून, संन्यासापेक्षां कर्मयोगच अधिक प्रशस्त आहे, हें सिद्ध करणें व बुद्धियोगांतील 'नित्यसत्त्वस्थ' ह्या अंशाचें स्पष्टीकरण करणें हा प्रस्तुत अध्यायांतील प्रतिपाद्य विषय आहे.

चौथ्या अध्यायांत ज्ञानाची कर्माला अत्यंत आवश्यकता आहे असें सविस्तर व सोपपत्तिक सिद्ध केलें आहे व क्रमप्राप्त ज्ञानयज्ञाचें महत्त्वही वर्णिलें आहे. या सामान्य विवेचनाचा उपसंहार करितांना ४१ व्या श्लोकांत योगसंन्यस्तकर्माणं, असें पद वापरून योगयुक्त बुद्धीनें कर्मसंन्यासच सुचविला आहे. पण ४२ श्लोकामध्यें याच सर्व विवेचनाला अनुलक्षून आपल्याला उपदेश करतांना मात्र संन्यास शब्द वगळला गेला आहे, असें अर्जुनाच्या चटकन् लक्षांत आलें, आणि म्हणूनच सामान्य विवेचनाचा उपसंहार करतांना, श्रीकृष्णानें संन्यासाचा स्पष्ट उल्लेख केला आणि व्यक्तिशः आपल्याला उपदेश करतांना मात्र कर्मयोगावर कटाक्ष कां ठेविला? असें वाटून अर्जुन प्रश्न करतोः—

**अर्जुन उवाच**

**संन्यासं कर्मणां कृष्ण पुनर्योगं च शंससि**
**यच्छ्रेय एतयोरेकं तन्मे ब्रूहि सुनिश्चितम्   १**

**कृष्ण ! कर्मणाम् संन्यासम्, पुनः योगम् च शंससि । एतयोः यत् एकम् श्रेयः तत् मे सुनिश्चितम् ब्रूहि ।**

अर्जुन म्हणाला, हे श्रीकृष्णा! कर्माचें (एकदां) संन्यास व पुन्हा योग (अशा दोन्ही तऱ्हांनीं) वर्णन करितां, ह्या दोहोंपैकीं म्हणजे कर्मसंन्यास व कर्मयोग यांपैकीं एक (अधिक) श्रेयस्कर असेल तेंच मला निश्चित सांगा.

[ ज्ञानप्राप्तीला संन्यास व कर्मयोग हे दोन्ही मार्ग विहितच ठरतात. तर, त्यांपैकीं अधिक प्रशस्त जो मार्ग असेल त्याचा आपण स्वीकार करावा अशा हेतूनें अर्जुनानें हा प्रश्न विचारला आहे ]

**श्रीभगवानुवाच**

**संन्यासः कर्मयोगश्च निःश्रेयसकरावुभौ**
**तयोस्तु कर्मसंन्यासात्कर्मयोगो विशिष्यते २**

**संन्यासः कर्मयोगः च उभौ निःश्रेयसकरौ। तु तयोः कर्मसंन्यासात् कर्मयोगः विशिष्यते।**

श्रीकृष्ण म्हणाले, संन्यास व कर्मयोग हे दोन्ही (मार्ग) मोक्षदायक आहेत. परंतु त्यांपैकीं कर्मसंन्यासापेक्षां कर्मयोग अधिक (प्रशस्त) होय.

[ अ. २, श्लोक ३९ यांत संन्यास व कर्मयोग ह्याच दोन मार्गांचा '**सांख्य व योग**' ह्या शब्दांनीं उल्लेख केला होता, तथापि अर्जुनाच्या प्रश्नांतील शब्दांनींच त्याचें उत्तर सांगण्याकरितां प्रस्तुत श्लोकांत 'सांख्य व योग' यांचे पर्याय शब्द म्हणून '**संन्यास व कर्मयोग**' हे शब्द योजिले आहेत तरी संन्यास म्हणजे सांख्य व कर्मयोग म्हणजे योग हे दोन्ही मार्ग सारखेच मोक्षदायक आहेत, तरी संन्यासापेक्षां कर्मयोगच अधिक प्रशस्त मार्ग आहे असें भगवंतांनीं येथें विधान केलें आहे.]

संन्यास व कर्मयोग ह्या दोहोंचीं बाह्यस्वरूपें भिन्न असलीं तरी त्यांचें अंतरंग सारखेंच असल्यामुळें त्यांत फलाच्या दृष्टीनें भेद नाहीं असें दाखवितातः—

**ज्ञेयः स नित्यसंन्यासी यो न द्वेष्टि न कांक्षति**
**निर्द्वंद्वो हि महाबाहो सुखं बंधात्प्रमुच्यते ३**

**महाबाहो! यः न द्वेष्टि न कांक्षति, सः नित्यसंन्यासी ज्ञेयः। हि, निर्द्वंद्वः बंधात् सुखम् प्रमुच्यते।**

अर्जुना! जो कशाचाही द्वेष करीत नाहीं व कशाचीही आसक्ति ठेवीत नाहीं, तोच नित्यसंन्यासी समजावा. कारण, (रागद्वेषादि) द्वंद्वरहित झालेला (पुरुष) कर्मबंधापासून अनायासें मुक्त होतो.

[संन्यासी व कर्मयोगी ह्या दोघांनाही रागद्वेषांचें (कामक्रोधांचें) निर्मूलन करणें सारखेंच अवश्य असतें. म्हणजे संन्यासमार्गीयाला जसें आपले अंतःकरण विषयवासनारहित व शांत ठेवावें लागतें, तसेंच स्थितप्रज्ञ कर्मयोग्याला देखील ठेवणें जरूर असतें. ह्यावरून संन्यासी व कर्मयोगी ह्यांचें अंतःकरण सारखेंच शुद्ध असावें लागतें. ह्यामुळें, त्यांच्या नुसत्या बाह्यस्वरूपांतील भेदावरून मोक्षफलां-विषयीं हा भेद मानण्याचें कारण नाहीं. शिवाय ज्यानें कामक्रोधाला आपल्या मनांत थारा दिला नाहीं तोच खरा संन्यासी होय, कर्माचा त्याग करणारा नव्हे हें या श्लोकांत मुख्यत्वेंकरून विवक्षित आहे.]

**सांख्ययोगौ पृथक्बालाः प्रवदंति न पंडिताः**
**एकमप्यास्थितः सम्यगुभयोर्विंदते फलम्** ४

**बालाः सांख्ययोगौ पृथक् प्रवदंति, पंडिताः न। उभयोः एकम् अपि सम्यक् आस्थितः फलम् विंदते।**

अज्ञ (लोक) सांख्य व योग (यांचीं फलें) पृथक् पृथक् आहेत असें म्हणतात. परंतु ज्ञाते (पुरुष) तसें म्हणत नाहींत, (कारण,) ह्या दोहोंपैकीं कोणत्याही एका मार्गाचें यथायोग्य आचरण घडलें तरीही (मोक्ष) फल प्राप्त होतें.

[सांख्य व योग ह्या दोन्ही मार्गांचें मोक्ष हें एकच फल असल्यामुळें, त्यांत फलतः भेद होत नाहीं.]

**यत् सांख्यैः प्राप्यते स्थानं तद्योगैरपि गम्यते**
**एकं सांख्यं च योगं च यः पश्यति स पश्यति** ५

**सांख्यैः यत् स्थानम् प्राप्यते, तत् योगैः अपि गम्यते। यः सांख्यम् योगम् च एकम् पश्यति सः पश्यति।**

सांख्यांना (संन्यास मार्गानें) जें स्थान प्राप्त होतें, तेंच कर्म-योग्यांनाही (कर्ममार्गानें) प्राप्त होतें. (म्हणून) जो सांख्य व योग (हे दोन्ही मार्ग) एकच आहेत असें पाहतो तोच ज्ञाता होय.

ह्याप्रमाणें संन्यास व कर्मयोग हे दोन्ही मार्ग सारखेच मोक्षदायक असल्यामुळें, फलतः एकच आहेत असें सिद्ध होत आहे, तरी त्यांपैकीं कर्मयोगच अधिक प्रशस्त कसा ठरतो तें सांगतातः—

**संन्यासस्तु महाबाहो दुःखमाप्तुमयोगतः**
**योगयुक्तो मुनिर्ब्रह्म न चिरेणाधिगच्छति** ६

**महाबाहो! अयोगतः संन्यासः आप्तुम् दुःखम्। योगयुक्तः मुनिः तु ब्रह्म न चिरेण अधिगच्छति।**

अर्जुना! कर्मयोगावांचून संन्यास साध्य होणें दुर्घट (अशक्य) आहे. कर्मयोगमुक्त स्थितप्रज्ञाला (मात्र) लवकर ब्रह्मसाक्षात्कार होतो.

[ संन्यासनिष्ठेंतही ज्ञानप्राप्तीचे अगोदर चित्तशुद्धीकरितां कर्मयोगाची आवश्यकता असते. पुढें ज्ञानप्राप्तीनंतर साक्षात्कार होईपर्यंत जो काल लागतो त्यास परिपाककाल असें म्हणतात. हा काल नियमित नसून ज्याच्या त्याच्या पात्रतेप्रमाणें कमी जास्त असतो. ह्याप्रमाणें ज्ञानाचा परिपाक होण्यास कर्मसंन्यास अवश्य आहे, असें संन्यासमार्गी प्रतिपादन करितात. परंतु, ज्ञानाचा परिपाक कर्मसंन्यासापेक्षां कर्मयोगानेंच लवकर होतो असें येथें भगवंतांनीं स्पष्ट सांगितलें आहे. पूर्वी अ. ४, श्लोक ३८ यांत '**कालेन**' ह्या पदावरून जो परिपाककाल सुचविला आहे, त्याचा येथें '**न चिरेण**' ह्या पदानें खुलासा केला आहे. ब्रह्मसाक्षात्कार झाल्यावांचून अंतःकरणांतील विषयांविषयींचा रस नाहींसा होत नाहीं. ( अ. २, श्लोक ५९) व हा रस वासनांचें बीज असल्यामुळें, तो कायम असेपर्यंत अंतःकरणांत विषयवासना कमजास्त प्रमाणानें उत्पन्न होत राहणार हें उघड आहे. याप्रमाणें विषयवासनांचें बीज अंतःकरणांत कायम असतां, संन्यासानें इंद्रियें दाबून टाकून म्हणजे त्यांच्या सामर्थ्याचा उपयोग करण्याचें वर्ज्य करून ज्ञानाचा अनुभव मिळविण्याची खटपट करण्यापेक्षां कर्मयोगानें अंतःकरणासह इंद्रियांचें योग्य नियमन करून त्यांच्या सामर्थ्याचा योग्य उपयोग करून अंतर्बाह्य सर्व कर्मे उपासनामय करणें व अशा रीतीनें ज्ञानाचा अनुभव प्राप्त करून घेणें लवकर व सहज रीतीनें साध्य होण्याजोगें आहे. शिवाय, तिसऱ्या अध्यायांत सांगितल्याप्रमाणें लोकसंग्रहाच्या दृष्टीनें कर्मयोगाची यावज्जीव अत्यंत आवश्यकता ठरते.

परंतु ज्ञान व कर्म यांचा आत्यंतिक विरोध आहे. असें संन्यासमार्गी प्रतिपादन करतात. या दृष्टीनें पाहतां कर्मयोग कितीही चांगला असला तथापि ज्ञान व कर्म यांचें साहचर्य जर अशक्य असेल तर कर्मयोग्याला श्रेष्ठत्व कसें येणार ! अशी शंका साहजिकच उत्पन्न होते.

परंतु 'ज्ञान व कर्म हीं परस्परविरुद्ध आहेत' हें संन्यासमार्गीयांचें म्हणणें बरोबर नाहीं. कारण जनक, व्यास इत्यादि ज्ञानसंपन्न राजर्षींनीं किंवा महर्षींनीं राजकीय, सामाजिक इत्यादि सर्व कर्मे ज्ञानपूर्वक केल्याचें इतिहासांत नमूद आहे, आणि ही गोष्ट गीताशास्त्राला पूर्णपणें मान्य आहे. अर्थात् कर्म व ज्ञान यांचा विरोध मानणें अयुक्त ठरतें. याच्या उलट **श्रीविद्यारण्यांनीं** सुचविलेली व्यवस्थाच अधिक सोपपत्तिक, समर्पक व सप्रमाण आहे. त्यांचें म्हणणें असें कीं, **कर्माचा ज्ञानाशीं विरोध नसून ध्यानाशीं विरोध आहे. विद्यारण्यांचें हें मत** गीताशास्त्राच्या सिद्धान्तास अनुसरूनच आहे हें लक्षांत घेतल्यावर संन्यास व कर्मयोग यांची गीताशास्त्रानें केलेली तुलना निर्दोष आहे, असें कबूल करणें भाग पडतें. म्हणून संन्यासापेक्षां कर्मयोग अधिक प्रशस्त होय असें भगवंतांनीं दुसऱ्या श्लोकांतील विधानाचें येथें निगमन केलें आहे.]

**योगयुक्तो विशुद्धात्मा विजितात्मा जितेंद्रियः**
**सर्वभूतात्मभूतात्मा कुर्वन्नपि न लिप्यते ७**

**योगयुक्तः, विशुद्धात्मा, विजितात्मा, जितेंद्रियः, सर्वभूतात्मभूतात्मा, कुर्वन् अपि न लिप्यते ।**

जो कर्मयोगानें युक्त आहे, ज्याची बुद्धि पवित्र झाली आहे. ज्यानें मन जिंकलें ( ताब्यांत ठेविलें ) आहे, ज्यांनीं इंद्रियें जिंकिलीं ( स्वाधीन ठेविलीं ) आहेत, आणि सर्वाभूतीं असलेल्या आत्मतत्त्वाशीं ज्याच्या आत्म्याचें ऐक्य झालें आहे, असा ( स्थितप्रज्ञ ) कर्में करीत असूनही लिप्त होत नाहीं. ( त्याला कर्मांचा बंध लागत नाहीं.)

[ कर्मयोग्यास साधकदशेंत कर्में बंधनकारक होत नाहींत, तर तीं सिद्धावस्थेंत बंधक होत नाहींत, हें निराळें सांगावयास नको. अध्याय २, श्लोक ४५ यांतील

पांचही अंश येथें वेगळया शब्दांनीं दाखविले आहेत. ते असे–'**योगयुक्त**' म्हणजे 'नित्यसत्त्वस्थ', '**विशुद्धात्मा**' म्हणजे 'निस्त्रैगुण्य', **विजितात्मा**' म्हणजे 'निर्योगक्षेम', '**जितेंद्रिय**' म्हणजे निर्द्वंद्व आणि '**सर्वभूतात्मभूतात्मा**' म्हणजे 'आत्मवान्'.]

**नैव किंचित् करोमीति युक्तो मन्येत तत्त्ववित्**
**पश्यन् शृण्वन्स्पृशञ्जिघ्रन्नश्नन्गच्छन्स्वपन्श्वसन्　　८**
**प्रलपन्विसृजन्गृण्हन्नुन्मिषन्निमिषन्नपि**
**इंद्रियाणींद्रियार्थेषु वर्तंत इति धारयन्　　९**

**युक्तः तत्त्ववित् पश्यन्, शृण्वन्, स्पृशन्, जिघ्रन्, अश्नन्, गच्छन्, स्वपन्, श्वसन्, प्रलपन्, विसृजन्, गृण्हन्, उन्मिषन्, निमिषन् अपि, इंद्रियाणि इंद्रियार्थेषु वर्तंते इति धारयन् किंचित् एव न करोमि इति मन्येत.**

कर्मयोगी तत्त्ववेत्त्यानें, पाहतांना, ऐकतांना, स्पर्श करितांना, वास घेतांना, खातांना, जातांना, झोंप घेतांना, श्वासोच्छ्वास करितांना, बोलतांना, सोडतांना, ग्रहण करितांना, पापण्या उघडतांना किंवा मिटतांना देखील, इंद्रियें (आपापल्या) विषयांमध्यें वर्तत (स्वभावानुसार कर्मे करीत) आहेत असें ओळखून मी (आत्मा) कांहींच करीत नाहीं असें समजावें.

[ वरील १३ कर्मांपैकीं पहिलीं पांच ज्ञानेंद्रियांचीं. जाणें, बोलणें, उत्सर्ग करणें ( मूत्रपुरीषादिकांचें ) व ग्रहण करणें हीं पांच कर्मेंद्रियांचीं, झोंप घेणें हें अंतःकरणाचें, श्वासोच्छ्वास करणें हें प्राणाचें व उघडझांप इत्यादि चलनवलन करणें हीं स्नायूंचीं कर्मे आहेत. त्यावरून स्थितप्रज्ञ कर्मयोग्याचीं सर्व कर्मे नियमित सुरू असतात; परंतु त्याबद्दल तो आसक्ति किंवा अभिमान बाळगीत नाहीं.]

ह्या सर्व कर्मांबद्दल स्थितप्रज्ञाची भावना कशी असते तें सांगतातः—

**ब्रह्मण्याधाय कर्माणि संगं त्यक्त्वा करोति यः**
**लिप्यते न स पापेन पद्मपत्रमिवांभसा　　१०**

**यः संगम् त्यक्त्वा कर्माणि ब्रह्मणि आधाय करोति, सः पद्मपत्रम् अंभसा इव पापेन न लिप्यते ।**

जो कर्मयोगी फलासक्ति सोडून, ब्रह्मार्पणबुद्धीनें (सर्व) कर्में करितो तो (पाण्यांत असूनही) पाण्यानें लिप्त न होणाऱ्या कमलपत्रा-प्रमाणें कर्मबंधानें लिप्त होत नाहीं.

**कायेन मनसा बुध्द्या केवलैरिंद्रियैरपि**
**योगिनः कर्म कुर्वंति संगं त्यक्त्वाऽऽत्मशुद्धये ११**

**योगिनः संगम् त्यक्त्वा, आत्मशुद्धये, कायन, मनसा, बुद्धया, केवलैः इंद्रियैः अपि कर्म कुर्वंति ।**

कर्मयोगी (साधक अवस्थेंत) फलासक्ति सोडून अंतःकरण शुद्ध होण्याकरितां (ज्ञानाच्या परिपाकाकरितां) केवळ शरीरानें, मनानें, बुद्धीनें व इंद्रियांनीं मात्र कर्म करितात.

**युक्तः कर्मफलं त्यक्त्वा शांतिमाप्नोति नैष्ठिकीम्**
**अयुक्तः कामकारेण फले सक्तो निबध्यते १२**

**कर्मफलम् त्यक्त्वा युक्तः नैष्ठिकीम् शांतिम् आप्नोति । अयुक्तः काम-कारेण फले सक्तः निबध्यते ।**

कर्मफलांचा त्याग केल्यामुळें योगसिद्ध झालेला (स्थितप्रज्ञ) कर्मयोगनिष्ठेनेंच प्राप्त होणारी शांति (अमृतत्व) मिळवितो. (परंतु) चंचल-बुद्धीचा मनुष्य कामवासनाग्रस्त असल्यामुळें, फलासक्त होत्साता (होऊन) बद्ध होतो. म्हणजे कर्माच्या बंधनांनीं बद्ध होतो.

[या श्लोकाच्या पूर्वार्धांत संन्यासाची अपेक्षा न धरतां कर्मयोग हा मोक्षप्राप्ती-चा स्वतंत्र मार्ग आहे. या तत्त्वाचा स्पष्ट निर्देश आला आहे. हें या अध्यायाच्या उपसंहारांत दिलेल्या दोनही क्रमांवरून लक्षांत येईल.]

योगनिष्ठेंतील अंतिम साध्य प्राप्त झालेल्या स्थितप्रज्ञाच्या वर्तनाचें थोडक्यांत वर्णन करितातः—

**सर्वकर्माणि मनसा संन्यस्यास्ते सुखं वशी**
**नवद्वारे पुरे देही नैव कुर्वन्न कारयन् १३**

**वशी देही, सर्वकर्माणि मानसा एव संन्यस्य, न कुर्वन् न कारयन् नवद्वारे पुरे सुखम् आस्ते ।**

जितेंद्रिय जीवात्मा (पुरुष) सर्व कर्मांचा (श्लोक ८।९ यांत सांगितलेल्या कर्मांच्या फलांचा) मनानेंच संन्यास (त्याग) करून स्वतः कांहीं न करितां किंवा न करवितां नऊ (दोन डोळे, दोन कान, दोन नाकपुड्या, तोंड, मूत्रद्वार व गुदद्वार) द्वारांच्या नगरांमध्यें (देहामध्यें) शांत असतो.

[ या श्लोकांतील **मनसा संन्यस्य** यावरूनच स्वरूपतः कर्मांचा त्याग विवक्षित नसून फलाचा किंवा वासनांचा त्यागच विवक्षित आहे हें उघड होतें.

अ. २. श्लोक २१ यांतील वर्णनाप्रमाणेंच येथें आत्म्याच्या अकर्तृत्वाचें ज्ञान झाल्यामुळें, फलासक्तीचा पूर्ण त्याग होऊन, कर्मयोगी स्थितप्रज्ञाची आनंदीवृत्ति कशी कायम राहते, हें सांगितलें आहे.]

आत्म्याकडे प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष कर्तृत्व येत नाहीं. तर तें कोणाकडे तें सांगतातः—

**न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभुः**
**न कर्मफलसंयोगं स्वभावस्तु प्रवर्तते** १४

**प्रभुः लोकस्य कर्तृत्वम् न सृजति कर्माणि न, कर्मफलसंयोगम् न। तु स्वभावः प्रवर्तते ।**

देहाधिपति (आत्मा) लोकांचें (देहरूपी नगरांतील बुद्धि, मन, इंद्रियें इत्यादिकांचें) कर्तृत्व, कर्में व त्यांचें फल, यांचा संबंध हें उत्पन्न करीत नाहीं. परंतु ही (त्या मन, बुद्धि, इंद्रियें इत्यादिकांची) स्वाभाविक प्रवृत्ति असते.

[ चैतन्यरूप आत्म्याच्या सान्निध्यानें बुद्धि, मन, इंद्रियें इत्यादि सचेतन होतात व आपापल्या स्वाभाविक गुणांस अनुसरून कर्तृत्व किंवा कर्म इत्यादि शक्ति त्यांना उत्पन्न होतात. म्हणजे बुद्धीचें कर्तृत्व किंवा मन व इंद्रियें यांची कर्में आत्मा स्वतः उत्पन्न करीत नसून, त्यांच्या सचेतन स्वरूपाचा तो धर्मच असतो. अर्थात् कर्मांच्या फलांशींही आत्म्याचा संबंध नसतो. म्हणून कर्तृत्व बुद्धीकडेसच आहे असें ठरतें. त्याचप्रमाणें कर्मांचें फल हें देखील क्रियेचाच परिणाम असल्यामुळें त्याचा कार्यकारणसंबंधदेखील आत्मा उत्पन्न करितो असें मानण्याचें कारण नाहीं

पाण्यांत खडा टाकिल्याबरोबर लहरी उत्पन्न होणें हा जसा त्याचा स्वभावच आहे, त्याप्रमाणें सृष्टींत लहानमोठी कोठलीही क्रिया घडली म्हणजे तिचा बरावाईट परिणाम होणें हा सृष्टीचा निसर्गसिद्ध स्वभावच आहे. प्रस्तुत श्लोकांत एका मोठ्या गुंतागुंतीचा उलगडा झाला आहे. तो असाः—आत्मा जर ज्ञानमय आहे तर अज्ञान कोणाला होतें ? त्याचप्रमाणें आत्मा ब्रह्मरूप (नित्यमुक्त) असेल तर बुद्ध कोण होतो ? या प्रश्नाचें उत्तर प्रस्तुत श्लोकावरून असें निघतें कीं, ज्ञान अज्ञान, बंधमोक्ष इत्यादि व्यवहाराचा संबंध बुद्धीशीं ( म्ह. स्वभावाशीं ) येतो, आत्म्याशीं नाहीं.]

**नादत्ते कस्यचित्पापं न चैव सुकृतं विभुः**
**अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यंति जंतवः १५**

**विभुः कस्यचित् पापम् न, सुकृतम् एव च न आदत्ते । ज्ञानम् अज्ञानेन आवृतम् तेन जंतवः मुह्यंति ।**

त्याचप्रमाणें विभु (आत्मा) कोणाचेंही (बुद्धि, मन इत्यादिकांचें) पाप किंवा पुण्य ग्रहण करीत नाहीं. ज्ञान (सदसद्विवेक) आत्म्याविषयींच्या अज्ञानानें आच्छादित असल्यामुळें (आत्मस्वरूपाचें यथार्थ ज्ञान नसल्यामुळें) सामान्य जन मोह पावतात.

[ पाप व पुण्य हे केवळ अंतःकरणावर होणारे संस्कार आहेत. त्यांचा आत्म्याशीं कांहीं संबंध नाहीं. परंतु हें तत्त्व अज्ञ लोकांस कळत नसल्यामुळें, ह्या पापपुण्यसंस्कारांचा संबंध ते आत्म्याशींच जोडतात.]

**ज्ञानेन तु तदज्ञानं येषां नाशितमात्मनः**
**तेषामादित्यवज्ज्ञानं प्रकाशयति तत्परम् १६**

**आत्मनः ज्ञानेन, तु येषाम् तत् अज्ञानम् नाशितम् । तेषाम् तत् परम् ज्ञानम् आदित्यवत् प्रकाशयति ।**

परंतु आत्म्याच्या (यथार्थ) ज्ञानानें ज्यांचें (वर सांगितलेलें) अज्ञान नाहींसें होतें, त्यांचें तें उत्कृष्ट आत्मज्ञान सूर्याप्रमाणें (बुद्धि, मन, इंद्रियें इत्यादि सर्वांस) प्रकाशित (निर्मल) करितें.

[ ज्ञान हें पूर्ण निर्दोष, अत्यंत पवित्र व स्वयंप्रकाश असल्यामुळें, इतर वस्तूंना बुद्धि इत्यादिकांना पवित्र व प्रकाशित करण्याचें त्याच्यामध्यें सामर्थ्य आहे, हें अर्थात् सिद्ध आहे. बुद्धि ही प्रकृतीच्या सत्त्वगुणापासून उत्पन्न झाली असल्यामुळें,

इतर सृष्टपदार्थांपेक्षां ती अधिक सूक्ष्म व बिंबोद्ग्राही असते म्हणून चैतन्याचा ज्ञानमय प्रकाश बुद्धीमध्यें येऊन, तद्द्वारा मन व इंद्रियें हीं प्रकाशयुक्त होतात.]

**तद्बुद्धयस्तदात्मानस्तन्निष्ठास्तत्परायणाः**
**गच्छंत्यपुनरावृत्तिं ज्ञाननिर्धूतकल्मषाः** १७

**तद्बुद्धयः तदात्मानः, तन्निष्ठाः, तत्परायणाः ज्ञाननिर्धूतकल्मषाः अपुनरावृत्तिम् गच्छंति ।**

ज्यांची बुद्धि ज्ञानसंपन्न झाली आहे, ज्यांची आत्मभावना ज्ञानरूप झाली आहे, ज्ञानावर ज्यांची अढळ प्रीति आहे, ज्ञान हेंच ज्यांचें आश्रयस्थान (आधार) आहे, आणि ज्ञानानें ज्यांचें पातक (अंतःकरणांतील मल) निःशेष धुवून गेलें आहे, ते पुनर्जन्मरहित होतात. (त्यांची पुनरावृत्ति न होतां ते मुक्त होतात.)

[ अर्थात् ज्ञानोपासना हाच बुद्धि नितांत शुद्ध होण्याचा निश्चित उपाय आहे, असें गीताशास्त्रांत वारंवार प्रतिपादन केलें आहे.]

**विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि**
**शुनिचैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः** १८

**पंडिताः विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे, गवि, हस्तिनि च, शुनि श्वपाके एव च समदर्शिनः सन्ति ।**

पंडित म्हणजे मागील श्लोकांत वर्णिल्याप्रमाणें बुद्धियुक्त पुरुष, विद्या आणि विनय यांनीं संपन्न अशा ब्राह्मणाविषयीं, गाईविषयीं, हत्तीविषयीं, कुत्र्याविषयीं आणि त्याचप्रमाणें चांडाळाविषयीं (जे) समदृष्टि असतात.

[ ज्यांच्याविषयीं उच्चनीचभाव सामान्य मनुष्यांच्या मनांत नेहमीं असतो, अशा सर्व प्रकारच्या प्राण्यांचें दिग्दर्शन करण्याकरितां कांहीं नांवें या श्लोकांत सांगितलीं आहेत. एखादा मनुष्य जातीनें उच्च नाहीं एवढ्याच कारणामुळें त्याच्याविषयीं सामान्य मनुष्याच्या मनांत जसा तिरस्कार उत्पन्न होतो, तसा तो ज्ञानी पुरुषाच्या मनांत उत्पन्न होत नाहीं. इतकेंच नव्हे तर, विद्वान् ब्राह्मणामध्यें जें आत्मतत्त्व भरलेलें आहे, तेंच सर्व उच्चनीच प्राण्यांमध्येंही आहे, अशी त्याची दृष्टि सम झालेली असते. प्रस्तुत श्लोकांत तुलनेंतील इतर कोणत्याही पदास विशेषण न देतां **'ब्राह्मण'**

या पदास मात्र '**विद्याविनयसंपन्न**' असें विशेषण जोडिलें आहे. वस्तुतः चांडालापेक्षां ब्राह्मणाचें उच्चत्व दाखविण्यास ह्या विशेषणाची जरूर नव्हती. कारण, त्यांच्या जातीवरूनच त सिद्ध आहे. असें असतां ज्या अर्थी गुणकर्मदर्शक विशेषण येथें दिलें आहे त्याअर्थी केवळ जन्मसिद्ध जातीमुळें दिसून येणारा उच्चनीचभाव खरा नसून तो गुणकर्मजन्यच आहे असें सिद्ध होतें. अर्थात् असल्या भेदांनीं ज्ञानी मनुष्याच्या तात्त्विक समदृष्टीस बाध येत नाहीं. असें पूर्ण समत्व ज्याच्या बुद्धींत उत्पन्न झालेलें असतें, तोच पंडित नित्यसत्त्वस्थ होय असें येथें विधान केलें आहे.]

**इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः**
**निर्दोषं हि समं ब्रह्म तस्मात् ब्रह्मणि ते स्थिताः** १९

**येषाम् मनः साम्ये स्थितम्, तैः इह एव सर्गः जितः। हि, ब्रह्म समम् निर्दोषम् तस्मात् ते ब्रह्मणि स्थिताः।**

ज्यांचें मन साम्यावस्थेंत स्थिर झालें, त्यांनीं ह्या (प्रस्तुत) देहांतच जन्म जिंकला. (ते जन्ममरणांतून मुक्त झाले.) कारण ब्रह्म हें सम (एकरूप) व पवित्र आहे, म्हणून ते (ज्ञानी) (साम्यरूप) ब्रह्मामध्येंच स्थिर असतात.

[ब्रह्म हें सम व नितांत पवित्र असल्यामुळें ज्ञानाच्या योगानें अंतःकरणाची साम्यावस्था होणें म्हणजेच ब्रह्मामध्यें स्थिर होणें, अ. २, श्लोक ७२ यांत वर्णन केलेल्या ब्राह्मीस्थितीस अनुलक्षूनच येथें ही **ब्राह्मी स्थिति** सांगितली आहे.]

**न प्रहृष्येत्प्रियं प्राप्य नोद्विजेत् प्राप्य चाप्रियम्**
**स्थिरबुद्धिरसंमूढो ब्रह्मविद्ब्रह्मणि स्थितः** २०

**प्रियम् प्राप्य न प्रहृष्येत्। अप्रियम् प्राप्य न उद्विजेत् च, ब्रह्मवित् स्थिरबुद्धिः असंमूढः ब्रह्मणि स्थितः।**

(इंद्रियांना) प्रिय वाटणारी वस्तु प्राप्त झाली असतां त्याबद्दल हर्ष, किंवा अप्रिय वाटणारी वस्तु प्राप्त झाल्यामुळें विषाद, न मानितां ब्रह्मज्ञानी मनुष्य स्थितप्रज्ञ व सदसद्विवेकाविषयीं जागृत असून ब्रह्माचे ठिकाणीं स्थिर राहतो.

[ हर्षविषादादिकांनीं चित्तवृत्ति बावरूं न देतां, जो ब्रह्मवेत्ता स्थितप्रज्ञ धैर्यानें सदसद्विवेक नेहमीं जागृत ठेवितो, तो नित्यसत्त्वस्थ ब्रह्मस्थित होय.]

**बाह्यस्पर्शेष्वसक्तात्मा विंदत्यात्मनि यत्सुखम्**
**स ब्रह्मयोगयुक्तात्मा सुखमक्षय्यमश्नुते** २१

**बाह्यस्पर्शेषु असक्तात्मा आत्मनि यत् सुखम् विंदति। सः ब्रह्मयोग-युक्तात्मा तत् सुखम् अक्षय्यम् अश्नुते।**

विषयेंद्रियसंयोगाचे ठिकाणीं ज्याचें अंतःकरण असंलग्न असतें असा ध्यानयोगी पुरुष **आत्मनि** म्हणजे आत्मस्वरूपाच्या ध्यानामध्यें जें सुख अनुभवितो तें सुख ज्याची बुद्धि **ब्रह्मयोगानें** म्हणजे समत्व-योगानें संपन्न झाली आहे तो स्थितप्रज्ञ अक्षय्य अनुभवितो.

[ ज्याची बुद्धि समत्वानें परिपूर्ण झाली म्हणजे नित्यसत्त्वस्थ झाली त्याची समाधानवृत्ति परिपूर्ण व अढळ असते. समत्व ही सत्त्वगुणाची मुख्य वृत्ति होय, कोणत्याही प्रसंगांत स्थितप्रज्ञ सांपडला तथापि त्याच्या बुद्धीची समता तिळमात्रही ढळत नाहीं. त्याची आनंदवृत्ति किंवा समाधान कायमच असतें. ध्यानयोगाची गोष्ट तशी नाहीं. ध्यानावस्थेंतील त्याची आनंदवृत्ति ध्यान विसर्जनानंतर नष्ट होते. म्हणून त्याचें हें सुख अक्षय्य नसतें. अशा प्रकारची अखंड समता ज्ञानविज्ञान-संपन्न बुद्धींतच उदय पावते. बुद्धीची ही साम्यावस्था म्हणजे ब्रह्मसाक्षात्काराची खूणच आहे, आणि म्हणूनच तिला ब्राह्मी स्थिति असें अन्यत्र म्हटलें आहे.]

**ये हि संस्पर्शजा भोगा दुःखयोनय एव ते**
**आद्यंतवंतः कौंतेय न तेषु रमते बुधः** २२

**हि, कौंतेय! ये संस्पर्शजाः भोगाः ते आद्यंतवंतः दुःखयोनयः एव। तेषु बुधः न रमते।**

कारण, अर्जुना! इन्द्रियविषयांच्या संयोगानें जे सुखोपभोग प्राप्त होणारे असतात, ते उत्पत्ति व विनाश पावणारे आणि दुःखपरिणामी असल्यामुळें, त्या (अनित्य) सुखोपभोगांत ज्ञानी पुरुष रमत नाहीं म्हणजे विषयोपभोगांची गोडी त्याच्या मनाला वाटत नाहीं.

**शक्नोतीहैव यः सोढुं प्राक्शरीरविमोक्षणात्**
**कामक्रोधोद्भवं वेगं स युक्तः स सुखी नरः** २३

यः इह शरीरविमोक्षणात् प्राक् एव कामक्रोधोद्भवम् वेगम् सोढुम् शक्नोति सः युक्तः सः नरः सुखी।

जो येथेंच (म्हणजे) शरीराचा त्याग करण्यापूर्वी, काम व क्रोध ह्यांपासून उत्पन्न होणारा वेग सहन करूं शकतो, तोच कर्मयोगी व तोच सुखी पुरुष होय.

**योऽन्तःसुखोऽन्तरारामस्तथांतर्ज्योतिरेव यः**
**स योगी ब्रह्मनिर्वाणं ब्रह्मभूतोऽधिगच्छति** २४

**यः अंतःसुखः अंतरारामः तथा एव यः अंतर्ज्योतिः, सः ब्रह्मभूतः योगी ब्रह्मनिर्वाणम् अधिगच्छति।**

आत्मज्ञान हेंच ज्याचें सुख, आत्मज्ञान हेंच ज्याचें विश्रांति-स्थान व त्याचप्रमाणें आत्मज्ञान हाच ज्याचा प्रकाश (बुद्ध्यादिकांना प्रकाशित करणारा) असा ब्रह्मस्वरूप (जीवन्मुक्त) झालेला कर्मयोगी ब्रह्मानंद प्राप्त करून घेतो.

[ या श्लोकांत साम्यावस्थेचें पूर्ण तात्त्विक स्वरूप वर्णन केलेलें आहे. आणि हेंच नित्य-सत्त्वस्थाचें स्वरूप होय असें सुचविलें आहे. २१ ते २३ या श्लोकांमध्यें ज्या तीन महत्त्वाच्या गोष्टी आल्या आहेत; यांचाच येथें प्रथम तीन पदांनीं निर्देश केला आहे. जें सुख आत्मज्ञाननिष्ठ झालें, तेंच अक्षय्य रहातें; कारण त्याला बाह्य विषयांची किंवा समाधीसारख्या विशिष्ट अवस्थेची आवश्यकता नसते. त्याचप्रमाणें ज्याच्या बुद्धीची प्रसन्नता विषयोपभोगावर अवलंबून नसून आत्मस्वरूपाच्या ज्ञानावर अवलंबून असते, तोच अजरामर समजावा; आणि २३ व्या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें कामक्रोधाचे वेग सहन करण्याची शक्ति म्हणजे तितिक्षा, बुद्धींत विवेकशक्ति जागृत असेल तरच नेहमीं पूर्ण असते. पण ही विवेकशक्ति आत्मज्ञानानें प्रकाशित झालेल्या बुद्धींतच नेहमीं जागृत राहते. याच अभिप्रायानें श्लोकांतील **अन्तर्ज्योति**, हें पद आलेलें आहे. अध्याय ३, श्लोक १७ यांत **रति, तृप्ति** व **संतोष** या तीन मनोधर्मांचा उल्लेख केला आहे आणि प्रस्तुत श्लोकांत **सुख, आराम** व **ज्योति** हे तीन बुद्धीचे विशिष्ट धर्म दाखविले आहेत; यावरून ३ऱ्या अध्यायांतील १७ वा श्लोक संन्यास व कर्मयोग या दोन्ही मार्गांस लागू पडण्या-सारखा असला तरी प्रस्तुत श्लोक मात्र कर्मयोगान्तर्गत **बुद्धियोगाचेंच** स्वरूप

दर्शविणारा आहे. यावरून समत्व हा संन्यासधर्म नसून कर्मयोगाचा तो एक विशेष आहे हें लक्षांत ठेवणें जरूर आहे.

**लभंते ब्रह्मनिर्वाणमृषयः क्षीणकल्मषाः**
**छिन्नद्वैधा यतात्मानः सर्वभूतहिते रताः** २५

**छिन्नद्वैधाः, यतात्मानः, क्षीणकल्मषाः ऋषयः सर्वभूतहिते रताः, ब्रह्मनिर्वाणम् लभंते ।**

ज्यांचा द्विधाभाव (भेदबुद्धि) नष्ट झाला आहे, ज्यांचें अंतःकरण नियत (शुद्धबुद्धिनियंत्रित) झालें आहे, व ज्यांचें पाप (कर्मबंध) नाहींसें झालें आहे, असे ऋषि सर्व प्राणिमात्रांच्या (जगाच्या) कल्याणाविषयीं तत्पर असून ब्रह्मानंदाचा लाभ घेतात.

[ नित्यसत्त्वस्थ कर्मयोगी समबुद्धीनें सर्व प्राणिमात्रांचें हित करण्याविषयीं नेहमीं तत्पर असतात. ह्याप्रमाणें ज्ञानाच्या योगानें ज्यांच्या बुद्धीस पूर्ण समत्व प्राप्त झालेलें असतें, जगाच्या कल्याणाविषयींची तत्परता ज्यांच्या अंगीं पूर्ण बाणलेली असते, ते नित्यसत्वस्थ होत, असें येथें १८ व्या श्लोकांतील विधानाचें निगमन केलें आहे. समत्वाचें म्हणजे नित्यसत्त्वस्थाचें वर्णन अध्याय २, श्लोक ७२ यांत सांगितलेल्या ब्राह्मीस्थितीस अनुलक्षूनच आहे. येथें **सर्वभूतहिते रताः** ह्या पदानें जीवन्मुक्त स्थितप्रज्ञांचा सिद्धावस्थेंतील व्यवहार, लोकसंग्रहार्थच असतो असें स्पष्ट दाखविलें आहे. सर्वभूतहित म्हणजे लोकसंग्रह, याचें विस्तृत विवेचन पूर्वीं तिसऱ्या अध्यायांत आलेलें आहे. येथपर्यंत या अध्यायांतील दुसऱ्या श्लोकापासून तुलनेच्या दृष्टीनें कर्मयोगाचें वर्णन करून संन्यासापेक्षां कर्मयोग अधिक श्रेष्ठ कां समजावयाचा याचें सोपपत्तिक विवेचन केलें आहे. तिसऱ्या अध्यायामध्यें कर्मयोग व्यक्तीला व समष्टीला (राष्ट्राला) कसा अवश्य आहे, तें सिद्ध केलें आहे. साधकाचा कर्मयोग मोक्षदायक असून सिद्धावस्थेंतील जीवन्मुक्ताचा कर्मयोग लोकसंग्रहकारक म्हणजे राष्ट्रहितकारक किंवा सर्वभूतहितकारक असतो व एकंदर मानवी जातीचें कल्याण कर्मयोगावरच कसें अवलंबून असतें, याचें पूर्ण विवेचन केलें आहे. प्रस्तुत अध्यायांत संन्यासापेक्षां कर्मयोग श्रेष्ठ आहे, हें सिद्ध केलें आहे. कर्मयोगाच्या ह्या तौलनिक विवेचनामध्यें, श्लोक ६ व २१, यांत संन्यासमार्गाचा उल्लेख आला आहे. तुलनेच्या दृष्टीनें संन्यासापेक्षां कर्मयोग अधिक प्रशस्त असला तरी कर्म

योगासारखा संन्यासमार्गही मोक्षदायक आहे. व मोक्षाच्या दृष्टीनें विचार करतां हे दोनही मार्ग तत्त्वतः एकच होत, हें श्लोक ४ व ५ यांवरून सहजच ठरतें.

या अध्यायांतील २ ऱ्या श्लोकापासून २५ व्या श्लोकापर्यंत कर्मयोगाची श्रेष्ठता परोपरीनें दाखविली आहे. कर्मयोगाची ही थोरवी विशेष लक्षांत येण्याकरतांच श्लोक १८ ते २५ अखेरपर्यंत समत्वाचें प्रकरण आलें आहे. समत्व हा सात्विक वृत्तींतील प्रमुख गुण असल्यामुळें समबुद्धीलाच नित्यत्त्वसस्थ म्हणणें योग्य ठरतें. साम्यावस्था हें बुद्धीच्या शुद्धतेचें पूर्णस्वरूप होय. ही साम्यावस्था ओळखण्याकरितां पुढील बौद्धिक गुणांचा उल्लेख या प्रकरणांत आला आहे. **ब्रह्मज्ञान, बुद्धिस्थैर्य, हर्षविषादराहित्य** (गंभीरपणा) **विवेकसामर्थ्य** व **सर्वभूतहित** या गुणांनीं मंडित असलेले स्थितप्रज्ञ कर्मयोगी हे पंडित किंवा **ऋषि** होत. एथील **ऋषि** शब्द फार महत्त्वाचा आहे. या शब्दानें स्थितप्रज्ञ कर्मयोग्याचा वर्णाश्रमधर्माशीं असलेला निकट संबंध, दर्शविला आहे. वरील गुणांवरूनच साम्यावस्थेचें स्वरूप ओळखून साधकानें ती संपादन करण्याचा प्रयत्न करावा व वर्णाश्रमधर्माचें पालन करून सर्वभूतहितामध्यें तत्पर असलेला धर्मसंस्थापक **ऋषि** ही पदवी मिळवून कृतार्थ व्हावें हें या वर्णनाचें तात्पर्य होय.]

संन्यास व कर्मयोग यांच्या तुलनेमध्यें कर्मयोगाप्रमाणेंच संन्यासमार्गाचें स्वरूपही स्पष्ट करणें अवश्य आहे म्हणून संन्यासमार्गाची रूपरेषा थोडक्यांत पुढें सांगतातः—

**कामक्रोधवियुक्तानां यतीनां यतचेतसाम्**
**अभितो ब्रह्मनिर्वाणं वर्तते विदितात्मनाम्** २६

**कामक्रोधवियुक्तानाम् यतचेतसाम् विदितात्मनाम् यतीनाम् ब्रह्मनिर्वाणम् अभितः वर्तते ।**

कामक्रोधानें रहित असून ज्यांचें चित्त निरुद्ध झालें आहे व ज्यांनीं आत्मज्ञान संपादन केलें आहे; अशा संन्यासी पुरुषांच्या सन्निधच ब्रह्मानंद असतो.

[ संन्यासमार्गात ध्यानयोगाची अपेक्षा असल्यामुळें ज्या मानानें मनोवृत्तींचा निरोध म्हणजे लय साध्य होतो त्या मानानें त्याला ब्रह्मानंदाचा लाभ होऊं लागतो; आत्मज्ञान संपादन करून सर्व प्रकारची मानसिक हालचाल बंद करणें हाच संन्यासांतील ध्यानयोग होय. आत्मस्वरूपाचे ठिकाणीं एकतानता केल्यामुळेंच

ज्ञानाचा परिपाक होऊन संन्यासी पुरुषास मोक्षप्राप्ति होते. अशा प्रकारच्या ध्यान-योगासच संन्यासाचें अंतरंग असें संन्यासमार्गी म्हणतात. कर्मयोग्यापेक्षां संन्यासी पुरुषास कामक्रोधादि विकारांचे वेग उत्पन्न होण्याचा संभव कमी असतो म्हणूनच येथें कामक्रोधवियुक्त (रहित) असें यतींना विशेषण दिलें आहे. परंतु मागें श्लोक २३ मध्यें कामक्रोधापासून उद्भवणारे वेग बुद्धि सम ठेवून स्थितप्रज्ञानें सहन केलेच पाहिजेत असें सांगितलें आहे. यावरून या दोन मार्गांतील फरक चांगलाच लक्षांत येण्याजोगा आहे; आत्मज्ञान व ध्यान या दोन साधनांनीं यतींनादेखील ब्रह्मानंदाची प्राप्ति होते.]

वरील श्लोकांत आलेल्या संन्यासमार्गांतर्गत ध्यानयोगास अवश्य असलेल्या अभ्यासाचें आतां थोडक्यांत दिग्दर्शन करितातः—

**स्पर्शान्कृत्वा बहिर्बाह्यांश्चक्षुश्चैवान्तरे भ्रुवोः**
**प्राणाऽपानौ समौ कृत्वा नासाभ्यंतरचारिणौ** २७
**यतेंद्रियमनोबुद्धिर्मुनिर्मोक्षपरायणः**
**विगतेच्छाभयक्रोधो यः सदा मुक्त एव सः** २८

**यः मोक्षपरायणः मुनिः बाह्यान् स्पर्शान् बहिः, भ्रुवोः अंतरे एव चक्षुः च कृत्वा नासाभ्यन्तरचारिणौ प्राणाऽपानौ समौ कृत्वा, विगतेच्छाभयक्रोधः सदा यतेंद्रियमनोबुद्धिः सः मुक्तः एव ।**

जो मोक्षपरायण (मोक्षाची उत्कट इच्छा करणारा) मुनि (मननशील यती) बाह्य विषय बाहेर करून (त्याच्याशीं असलेला इंद्रियांचा संबंध तोडून) दोन भुवयांच्यामध्यें दृष्टि स्थिर करून, नासिकेच्या अंतर्भागीं संचार करणाऱ्या प्राण व अपान, (आंत येणाऱ्या व बाहेर जाणाऱ्या) वायूंची गति सारखी ठेवून, इच्छा भीति व क्रोधरहित असा, व ज्याचीं इंद्रियें, मन व बुद्धि नियमित झालीं आहेत असा सदोदित असतो तो मुक्तच होतो.

[ याप्रमाणें तुलनात्मक विचारांत येणाऱ्या शंकेचें निरसन करण्याकरितां येथें संन्यासमार्गाचें थोडक्यांत वर्णन करून संन्यास व कर्मयोग यांच्या तुलनेची पूर्णता केली आहे.]

आतां अध्यायांतील प्रतिपाद्य विषयाचा उपसंहार करितातः—

**भोक्तारं यज्ञतपसां सर्वलोकमहेश्वरम्**
**सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शांतिमृच्छति** २९

**माम् यज्ञतपसाम् भोक्तारम् सर्वलोकमहेश्वरम् सर्व भूतानाम् सुहृदम् ज्ञात्वा शांतिम् ऋच्छति ।**

मी (परमात्मा) यज्ञ व तपें (कर्मयोग व संन्यास) यांचा भोक्ता, सर्व लोकांचा ईश्वर (देवाधिदेव) आणि सर्व प्राणिमात्रांचा प्रिय सखा, (असें ईश्वरस्वरूप) जाणल्यानें शांति (मोक्ष) मिळते.

[ आतांपर्यंत कर्मयोग व संन्यास यांचा बरेच वेळां उल्लेख आला आहे. त्यांत यज्ञ म्हणजे उपासना हें कर्मयोगाचें अंतरंग असून तपस् म्हणजे ध्यानधारणा हें संन्यासमार्गाचें अंतरंग आहे. परंतु या दोहोंचाही स्वीकार करणारा अर्थात् त्या त्या निष्ठेचें फल देणारा परमात्मा एकच आहे व या सच्चिदानंद परमात्म्याचें ज्ञान कोणत्याही निष्ठेंत सारखेंच अवश्य आहे. आणि म्हणूनच सांख्यनिष्ठा व योगनिष्ठा स्वरूपतः भिन्न असल्या तरी त्या तत्त्वतः एक आहेत असें म्हणतां येतें. परमात्मा सर्व सृष्टीचा चालक असला तरी तो सर्वांचा हितकर्ता आहे. किंबहुना ईश्वराचा सृष्टि-व्यापारांतील सर्व जीवांचें आत्यंतिक कल्याण हा हेतुच आहे. अशा परमात्म्याचें ज्ञान सर्वांसच अवश्य आहे.]

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे कर्मसंन्यासयोगोनाम पंचमोऽध्यायः ॥**

ह्याप्रमाणें श्रीभगवंतांनीं गाइलेल्या उपनिषदांतील ब्रह्मविद्यांतर्गत कर्मयोगशास्त्रा-विषयींच्या श्रीकृष्णार्जुनसंवादांतील 'कर्मयोग व संन्यास प्रकरण' नांवाचा पांचवा अध्याय समाप्त झाला.

# रहस्यदीपिकेच्या पांचव्या अध्यायाचा उपसंहार

## पांचव्या अध्यायाची विषयानुक्रमणिका


| विषय | श्लोक |
|---|---|
| अर्जुनाचा प्रश्न. ... ... ... ... ... | १ |
| कर्मयोगविशेषाधिकरण. ... ... ... ... | २–६ |
| निरनिराळीं कर्मे, आत्म्याचें अकर्तृत्व, व्यामोहाचें कारण व निरसन. | ७–१७ |
| नित्यसत्त्वस्थाधिकरण. ... ... ... ... | १८–२५ |
| संन्यास व ध्यानयोग. ... .... ... ... | २६–२८ |
| उपसंहार. ... ... ... ... ... | २९ |


गुरूपदेशानें अगर शास्त्राध्ययनानें परोक्षज्ञानप्राप्तीनंतर मोक्षाकरितां आचरण करावयाच्या संन्यास व कर्मयोग ह्या दोन मार्गांपैकीं अधिक चांगला मार्ग कोणता, ह्या प्रश्नाचें सोपपत्तिक विवेचन ह्या अध्यायांत केलें आहे. संन्यास व कर्मयोग हे दोन्ही मार्ग सारखेच मोक्षदायक आहेत; तथापि, संन्यासापेक्षां कर्मयोगच श्रेष्ठ आहे, असें वरील प्रश्नाचें उत्तर आहे. फलाच्या दृष्टीनें ह्या दोन्ही मार्गांत भेद नसल्यामुळें, ते भिन्न आहेत म्हणजे त्यांचीं फलें निरनिराळीं आहेत असें समजणें वेडेपणाचें होय. कारण, ह्या दोन्हींपैकीं कोणत्याही एका मार्गाचें यथायोग्य आचरण घडलें तरी मोक्षप्राप्ति झाल्यावांचून रहात नाहीं. तथापि संन्यासमार्गास आरंभीं तरी कर्मयोगाची आवश्यकता असते, परंतु कर्मयोगमार्गांत कर्मसंन्यासाची केव्हांच आवश्यकता नसते. शिवाय ज्ञानाच्या परिपाककालांत संन्यासापेक्षां कर्मयोगच अधिक उपयोगी पडतो. कारण, परिपाककालीं, अंतःकरणांतील वासनांचें बीज (रस) कायम असतां, बुद्धि, मन व इंद्रियें यांचें उपमर्दन करून आत्मसाक्षात्कार संपादण्याचे बिकट परिश्रम करण्यापेक्षां, ज्ञानोपासनेनें शुद्ध झालेल्या बुद्धि, मन व इंद्रियांच्या सामर्थ्याचें साहाय्य घेतल्यास, लवकर व अनायासानें साक्षात्कार होतो. आत्मज्ञान (परोक्षज्ञान) प्राप्त झाल्यापासून, समाजांत त्या ज्ञानी मनुष्याची योग्यता साहजिकच वाढूं लागते. याप्रमाणें जसजशी योग्यता वाढत जाते, तसतशी त्यांच्या आचारविचारांकडे सामान्य जनसमूहाची दृष्टि अधिकाधिक वेधूं लागते, व समाजाच्या अंतःकरणांत त्याच्याविषयीं आदर उत्पन्न झाला असल्या-

मुळें, त्याच्या आचारविचारांचें शक्य तितकें अनुकरण करीत जाण्याची प्रवृत्तीही उत्पन्न होते. म्हणून, विद्वान् पुरुषानें साधकावस्थेंत काय, किंवा सिद्धावस्थेंत काय आपले आचारविचार समाजास आदर्शरूप ठेवणें अत्यंत अवश्य असतें. म्हणजे लोकसंग्रहाची त्याच्यावर जबाबदारी असते. ह्याप्रमाणें श्लोक २ ते ६ अखेर **कर्मयोगविशेषाधिकरणांत** संन्यासापेक्षां कर्मयोग अधिक प्रशस्त आहे असें सिद्ध केलें आहे. पुढें श्लोक ७ ते १७ अखेरपर्यंत, कर्मयोगी सर्व कर्में आचरीत असतांही त्या कर्मांचा बंध त्याला कसा लागत नाहीं, व आत्म्याचें अकर्तृत्व आणि अविकार्यत्व ओळखून तो शांत व कर्तव्यतत्पर कसा असतो; त्याचप्रमाणें कर्म, फल, पाप, पुण्य, इत्यादिकांचा आत्म्याशीं तत्त्वतः संबंध नसतांही, सामान्य लोकांचा अज्ञानामुळें कसा गैरसमज होतो, व पदार्थज्ञान झाल्यावर तो गैरसमज दूर होऊन त्या ज्ञानाच्या योगानें बुद्धि, मन व इंद्रियें प्रकाशित होऊन ज्ञानी स्थितप्रज्ञ ईश्वरनिष्ठ कसा होतो हें दाखविलें आहे. नंतर श्लोक १८ ते २५ अखेर **नित्यसत्त्वस्थाधिकरणांत** ईश्वरनिष्ठ ज्ञानी पुरुष कृत्रिम उच्चनीच भेदांस महत्त्व न देतां सर्वत्र समदृष्टि होतात आणि ज्ञानाच्या योगानें **समबुद्धि** म्हणजे **नित्यसत्त्वस्थ** झालेले पुरुष, हर्षविषादरहित, क्षणिक विषयोपभोगाविषयीं निरिच्छ, पूर्ण समाधानयुक्त व लोकहिताविषयीं तत्पर असतात असें सिद्ध केलें आहे. पुढील २६।२७ व २८ या तीन श्लोकांत यतिधर्माचा उल्लेख करून, ध्यानास उपयोगी पडणाऱ्या अभ्यासयोगाचें संक्षिप्त वर्णन केलें आहे. अखेरीस, केवळ अभ्यासयोगानेंच इतिकर्तव्यता होत नाहीं असें सुचविण्याकरितां परमेश्वर सर्वनियामक सर्वहितकारक आहे असें ज्ञान झाल्यावरच शांति म्हणजे मोक्षप्राप्ति होते असें सांगितलें.

या अध्यायाच्या शेवटच्या श्लोकांतील **यज्ञतपसाम्** हें पद विचार करण्यासारखें आहे. परिपूर्ण कर्मयोगी पुरुषाचा समबुद्धीनें चाललेला सिद्धावस्थेंतील व्यवहार यज्ञमय असतो. कर्मयोगमार्गांत उपासनेलाच यज्ञ असें मानण्यांत आलें असल्यामुळें कर्मयोग हाच खरोखर यज्ञ होय. त्याचप्रमाणें तप शब्दानें संन्यासान्तर्गत ध्यानयोग सुचविला आहे. तात्पर्य हें कीं, कर्मयोग्याचा यज्ञ किंवा संन्यासी पुरुषाचें तप हें बाह्यतः भिन्न असलें तरी एकच परमेश्वर त्या दोहोंचा म्हणजे कर्मयोगान्तर्गत यज्ञाचा व संन्यासांतर्गत तपाचा भोक्ता म्हणजे ग्रहण करणारा आहे.

या अध्यायांत संन्यास व कर्मयोग या दोन मार्गांचा तुलनात्मक पद्धतीनें विचार केला आहे. तिसऱ्या अध्यायामध्यें सिद्धावस्थेंतील कर्म लोकसंग्रहाच्या दृष्टीनें

आवश्यक आहे असें ठरविलें आहे व चौथ्या अध्यायांत कर्मयोगास ज्ञानाची कशी अत्यंत आवश्यकता आहे हें दाखवून परोक्षज्ञान प्राप्त झाल्यानंतर साक्षात्कारापर्यंत ज्ञानाच्या परिपाकाकरितां कर्मयोग अत्यंत उपयुक्त आहे, असें सिद्ध केलें. परोक्ष-ज्ञान प्राप्त होण्याचे पूर्वी कर्मयोगाची आवश्यकता आहे याबद्दल वादच नाहीं. परंतु परोक्षज्ञानानंतर कर्मयोगाचें आचरण करावें, कीं **विविदिषासंन्यास** करावा असा वाद उत्पन्न होतो. ज्ञानाच्या परिपाकाकरितां ज्या संन्यासमार्गाचें अवलंबन केलें जातें त्याला विविदिषासंन्यास म्हणतात. **विविदिषेनें** म्हणजे **ज्ञानाच्या इच्छेनें** केलेला कर्मसंन्यास असा याचा शब्दार्थ आहे. जीवन्मुक्ताप्रमाणें मुमुक्षूनें म्हणजे साधकानें देखील संन्यासाचें अवलंबन केलें पाहिजे, असें संन्यासमार्गी आचार्यांचें स्पष्ट मत आहे. याप्रमाणें संन्यास व कर्मयोग याविषयींच्या मतभेदास प्रथम ज्ञानप्राप्तीपासूनच सुरवात होते. या दोन मतांची तुलनाच प्रस्तुत अध्यायांत मुख्यत्वेंकरून केली आहे. या तुलनात्मक विवेचनांत सिद्धावस्थेंतील कर्मयोग व साधकावस्थेंतील कर्मयोग असे दोन भाग पडतात. पैकीं पहिल्या भागाचें विवेचन करून लोकसंग्रहाच्या दृष्टीनें सिद्धावस्थेंत संन्यासापेक्षां कर्मयोगच कसा अधिक श्रेयस्कर आहे, तें पूर्वी भगवंतांनीं स्पष्ट दाखविलें आहे. आणि म्हणूनच सिद्धावस्थेंतील कर्मयोगाची तुलना या अध्यायाच्या १८ व्या श्लोकापासून पुढें थोडक्यांत करून प्रारंभीं साधकावस्थेंतील संन्यास व कर्मयोग यांची तुलना प्रामुख्यानें केली आहे. एकंदरींत सिद्ध असो वा साधक असो, संन्यासमार्गापेक्षां सर्व अवस्थांत कर्मयोगच अधिक उपयुक्त व श्रेयस्कर आहे, असा भगवंतांनीं सिद्धान्त केला आहे. या दोन मार्गांच्या क्रमाचा विचार केल्यास कर्मयोगाचा क्रम प्रारंभापासून अखेरपर्यंत अविच्छिन्न आहे, असें दिसून येतें. हे दोनही क्रम उपोद्घातांत खालीं दिल्याप्रमाणें:—

## जिज्ञासायुक्त श्रद्धापूर्वक सरलता.

| कर्मयोगनिष्ठा. | | कर्मसंन्यासनिष्ठा. |
|---|---|---|
| १ (अनासक्तिपूर्वक) यज्ञार्थ कर्म. | ... ... ... ... ... | १ चित्तशुद्धीकरितां निष्काम कर्माचरण. |
| २ बुद्धियोग. | ... ... ... ... | २ चित्तशुद्धिपूर्वक परोक्षज्ञान. |
| ३ ज्ञानपरिपाकार्थ कर्मयोग. | ... ... ... ... ... ... ... | ३ ज्ञानपरिपाकार्थ कर्म-संन्यासपूर्वक ध्यानधारणा. |

| | | |
|---|---|---|
| ४ अपरोक्ष साक्षात्कार. | ... ... ... | ४ अपरोक्ष साक्षात्कार. |
| ५ सिद्धावस्थेंतील लोकसंग्रहार्थ कर्मयोग. | ... ... ... | ५ सिद्धावस्थेंतील सर्व कर्म-संन्यास. |

पांचव्या अध्यायांतलि एकंदर विवेचनाचा विचार केल्यास संन्यासापेक्षां कर्मयोग कठीण आहे असें भासतें हें खरें, पण सूक्ष्म दृष्टीनें पाहिल्यास हा भ्रम नाहींसा होण्याजोगा आहे, असें आढळून येईल. कदाचित् संन्यासापेक्षां कर्मयोग बिकट आहे, असें क्षणभर मानलें, तरीदेखील कर्मयोगाचें महत्त्व मुळींच कमी होत नाहीं. अमुक एक मार्ग आचरणास कठीण म्हणूनच तो कमी प्रतीचा असें समजणें शुद्ध वेडेपणा होय. संन्यास व्यक्तीला मोक्षदायक झाला तरी तो समष्टीच्या म्हणजे राष्ट्राच्या दृष्टीनें कुचकामाचाच ठरतो. पण कर्मयोगाचें तसें नाहीं. कर्मयोग व्यक्तीला निःश्रेयस्कर (मोक्षदायक) असून समष्टीला म्हणजे राष्ट्राला कल्याणप्रद आहे. एवढें एकच कारण कर्मयोगाची थोरवी सिद्ध करण्यास पुरेसें आहे. हा मार्ग श्रद्धावान् व सरलहृदयी अशा कोणत्याही मनुष्यास स्वीकारण्याजोगा असल्यामुळें तो कठीण किंवा दुष्कर असें समजण्याचें मुळींच कारण नाहीं. हा मार्ग जनकादि राजर्षींनीं व भगवान् व्यासादि महर्षींनीं स्वतः आचरिला असल्यामुळें तो अनुभवसिद्ध व शिष्टसंमत आहे, असें सहजच ठरतें. हें सर्व लक्षांत आणूनच संन्यासापेक्षां कर्मयोग अधिक श्रेयस्कर असें भगवंतांनीं दुसऱ्या श्लोकांत सांगितलें आहे. सहाव्या श्लोकांत संन्यासापेक्षां कर्मयोग लवकरच साध्यप्राप्ति करून देणारा आहे, असें म्हटलें आहे. २१ व्या श्लोकांत तर ध्यानधारणा करणाऱ्या संन्यासी पुरुषास तेवढ्यापुरता जो ब्रह्मानंद मिळतो तो ब्रह्मानंद जीवन्मुक्त कर्मयोग्याचा अक्षय म्हणजे सदैव कायम असतो असें सांगितलें आहे. हा जीवन्मुक्त कर्मयोगी संन्यासी पुरुषाप्रमाणें फक्त ब्रह्मानंदांतच गढून न राहतां समबुद्धीनें लोकहित करण्याविषयीं पूर्ण तत्पर असतो. सारांश, व्यक्तीला व राष्ट्राला किंबहुना अखिल मानवजातीला हितकारक असलेल्या या कर्मयोगाचें प्रत्येकानें आचरण करावें व कर्मयोगशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें सर्व उपासनांचा व तपश्चर्यांचा फलदाता, संपूर्ण ब्रह्माण्डाचा नायक आणि सर्व जीवांचा सखा अशा परमात्म्याचें पूर्ण ज्ञान संपादन करून अमृतस्वरूप शांति मिळवावी, असा गीताशास्त्राचा सर्व जनांस उपदेश आहे. याप्रमाणें तुलनात्मक विचारपद्धतीनें कर्मयोगाचें महत्त्व सिद्ध करून या अध्यायाची परिसमाप्ति झाली आहे.

---

## षष्ठोऽध्यायः ।

कर्मयोगास आरंभापासूनच अवश्य असलेल्या इंद्रियनिग्रहास उपयोगी पडणाऱ्या अभ्यासयोगाचें संक्षिप्त वर्णन मागील अध्यायाच्या शेवटीं आलें आहे. त्याचें आणखी विस्तारानें विवेचन करून आसन-प्राणायामादि योगांपेक्षां साम्ययोग सुलभ व प्रशस्त कसा आहे हें दाखविणें व बुद्धियोगांतील निर्योगक्षेम ह्या अंशाचें स्पष्टीकरण करणें हा ह्या अध्यायाचा मुख्य उद्देश आहे. ( इंद्रियनिग्रहाचा उल्लेख दुसऱ्या अध्यायांत श्लोक ५८–६८ अखेर आलेला आहे.)

**श्रीभगवानुवाच**

**अनाश्रितः कर्मफलं कार्यं कर्म करोति यः**
**स संन्यासी च योगी च न निरग्निर्न चाक्रियः** १

**यः कर्मफलम् अनाश्रितः, कार्यम् कर्म करोति, सः संन्यासी योगी च, निरग्निः न, अक्रियः न च ।**

श्रीभगवान् म्हणतात—जो कर्मांच्या फलांवर अवलंबून न राहतां, कर्तव्य (समजून) कर्म करितो, तोच संन्यासी व कर्मयोगी होय. निरग्नि म्हणजे गृहस्थाश्रमाचा त्याग करणारा व अक्रिय म्हणजे कर्मांचा त्याग करणारा संन्यासीही नव्हे व योगीही नव्हे.

[ कर्मयोगमार्गांत संन्यास कर्मांचा नसून कर्मांच्या फलांचा संन्यास करावयाचा असतो. हा फलसंन्यास संन्यासमार्गांत देखील अवश्य असल्यामुळें केवळ स्वरूपतः कर्मत्याग करणारा मनुष्य खरा संन्यासीही नव्हे व कर्मयोगीही नव्हे.]

**यं संन्यासमितिप्राहुर्योगं तं विद्धि पांडव**
**न ह्यसंन्यस्तसंकल्पो योगी भवति कश्चन** २

**पांडव ! योगम् यम् संन्यासम् इति प्राहुः तम् विद्धि । हि असंन्यस्तसंकल्पः कश्चन योगी न भवति**

अर्जुना ! ज्या योगाला तत्वतः संन्यास असें म्हणतात (म्हणतां येईल) त्या कर्मयोगाचें स्वरूप लक्षांत घे. कारण (ज्यानें) वासनांचा

संन्यास (त्याग) केला नाहीं, असा कोणीही (पुरुष) कर्मयोगी होत नाहीं. (होऊं शकत नाहीं.)

[ कर्मयोगमार्गांत फलाच्या त्यागाप्रमाणेंच कर्मांच्या वासनांचाही त्याग अवश्य आहे. असें येथें सांगितलें आहे. मागील अध्यायांत प्रतिपादन केलेल्या कर्मयोगमार्गाच्या श्रेष्ठत्वाचाच अनुवाद वरील श्लोक १ व २ यांत केला आहे. या श्लोकांतील पहिल्या वाक्यांत आलेलें **यं** हें पद योगाचेंच विशेषण आहे, **यं** या पदानें संन्यास घेतां येत नाहीं, कारण 'ज्याला, संन्यास म्हणतात, तो योग असा आहे', या शब्दयोजनेंत 'ज्याला' या शब्दानें संन्यासाहून कांहीं निराळा पदार्थ विवक्षित असला पाहिजे हें उघड आहे. यावरून दुसऱ्या वाक्यांतील **योग** हें पद मागल्या वाक्यांत घेतल्यानें अन्वयाची ओढाताण कशी होत नाहीं, हें सहजच लक्षांत येईल. **यं** आणि **तं** ह्या दोनही सर्वनामांचा **योग** या एकाच पदाशीं संबंध जोडावयाचा आहे. तात्पर्य इतकेंच कीं, ज्या कर्मयोगाला तात्त्विकदृष्ट्या संन्यास असें म्हणतां येतें. त्याचें स्वरूप दुसऱ्या वाक्यांतच समजून देण्याचा उद्देश आहे.

हा कर्मयोग साधकावस्थेंत व सिद्धावस्थेंतही कसा चालतो तें सांगतातः—

**आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते**
**योगारूढस्य तस्यैव शमः कारणमुच्यते** ३

**योगम् आरुरुक्षोः मुनेः कर्म, ( शमस्य ) कारणम् उच्यते।**
**योगारूढस्य शमः एव तस्य ( कर्मणः ) कारणम् उच्यते।**

कर्मयोगाचें आरोहण (योगसिद्धिसंपादन) करूं इच्छिणाऱ्यांस (साधकांस) कर्म हें **शमास** म्हणजे **समत्व संपादनास कारण** म्हणजे **साधन** होतें (उपयोगी पडतें) असें म्हटलें आहे; आणि योगारूढास (स्थितप्रज्ञास) हा शम म्हणजे समत्वच कर्मास (निष्काम कर्माचरणास) कारण म्हणजे साधन होतें (उपयोगी पडतें) असें म्हटलें आहे.

[ विचारी मनुष्य साधकावस्थेंत कर्मयोगाचरण स्वतःच्या पूर्ण सिद्धीकरितां करीत असतो. त्याचप्रमाणें सिद्धावस्थेंत शांत चित्तानें लोकसंग्रहार्थ कर्मयोगाचरण करीत राहतो. या श्लोकांत दोन वाक्यें आहेत. त्यांतील पहिल्या वाक्याच्या

अन्वयांत **शमस्य** हें पद अध्याहृत घेतलें आहे याचें कारण असें कीं, दुसऱ्या वाक्यांत आलेल्या **शम** या पदास प्राधान्य आहे त्यामुळें पहिल्या वाक्यांत त्याचा संबंध येणें अपरिहार्य आहे. शिवाय **आरुरुक्षूला** म्हणजे **साधकाला** समत्व हें साध्य कोटींतील वाटणें स्वाभाविक आहे. या साधकावस्थेमध्यें त्याच्या बुद्धीचें समत्व पूर्ण झालेलें नसतें. हें पूर्णत्व संपादन करण्याकरितांच त्याला कर्मयोगाचें आचरण करावयाचें असतें. हें **पूर्णसमत्व** म्हणजे **ब्राह्मी स्थिति** होय. (अ० २, श्लोक ७२ ) व ( अ० ५, श्लोक १९ ). या ब्राह्मी स्थितीला पोहोंचल्यानंतर त्याची बुद्धि पूर्ण सम होते. आणि हें पूर्ण समत्व त्याच्या केवळ लोकसंग्रहार्थ चालू असलेल्या कर्माला उपयोगी पडतें म्हणून शम हा योगारूढाच्या कर्माला कारण असतो, असें दुसऱ्या वाक्यांत म्हटलें आहे. याप्रमाणें श्लोकाचा विचार केल्यास वाक्यार्थ पूर्ण समाधानकारक बसतो. दोन्ही वाक्यांत मिळून समत्व हें एकदां साध्य म्हणून व एकदां साधन म्हणून आलेलें आहे. एकाच गोष्टीला साध्य व साधन मानणें हा एक प्रकारचा तर्कशास्त्रांतील दोष होय. ह्यास 'साध्यसाधन' असेंही म्हणतात. परंतु हा दोष प्रस्तुत ठिकाणीं येऊं शकत नाहीं- कारण एकाच वेळीं एकाच कर्मामध्यें एकच गोष्ट साध्य व साधन मानल्यास हा दोष येतो. प्रस्तुत श्लोकांत तशी स्थिति नाहीं. समत्व हें साधकावस्थेंतील साध्य आहे. आणि सिद्धावस्थेंतील कर्माचरणाचें साधन आहे, याप्रमाणें अवस्थाभेदानें हीं साध्यसाधनाचीं दोनही नातीं समत्वाकडे येत असल्यामुळें येथें वरील दोषाची शंकाही उरत नाहीं.]

योगारूढाचें थोडक्यांत वर्णन करितातः—

**यदा हि नेन्द्रियार्थेषु न कर्मस्वनुषज्जते**
**सर्वसंकल्पसंन्यासी योगारूढस्तदोच्यते** ४

**हि यदा न इंद्रियार्थेषु न कर्मसु अनुषज्जते, तदा सर्वसंकल्पसंन्यासी योगारूढः उच्यते ।**

कारण जेव्हां (साधक) विषयोपभोगाविषयीं किंवा विवक्षित कर्माविषयीं आसक्त होत नाहीं व सर्व वासनांचा त्याग करितो, तेव्हांच त्याला योगारूढ म्हणतात.

ह्या कर्मयोगमार्गांतील योगारूढत्व ( आत्मोन्नति ) संपादन करणें प्रत्येकाला अवश्य आहे असें सांगतातः—

**उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत्**
**आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः** ५

**आत्मना आत्मानम् उद्धरेत् । आत्मानम् न अवसादयेत् । हि आत्मा एव आत्मनः बंधुः, आत्मा एव आत्मनः रिपुः ।**

मनुष्यानें स्वतःच स्वतःचा उद्धार करावा. स्वतःला अधोगतीस नेऊं नये. कारण मनुष्य आपणच आपला बंधु (हितकर्ता) व आपणच आपला शत्रु (अहितकर्ता) होतो.

[ या श्लोकांत मनुष्यास आत्मोन्नतीच्या बाबतींत पूर्ण स्वातंत्र्य असून, त्यास स्वावलंबनाची अत्यंत आवश्यकता आहे, असें दर्शविलें आहे. विषयवासना स्वभावाधीन म्हणजे संस्काराधीन असल्या, तथापि प्रत्येकानें आपली बुद्धि ज्ञानाच्या योगानें विकसित करून आपली आध्यात्मिक उन्नति करून घेणें त्याच्या स्वाधीन असून ती त्यानें अवश्य करून घेतली पाहिजे. असें न करणें म्हणजे जाणूनबुजून आत्मघात ( पाप ) करणें होय. ]

आपणच आपला मित्र कसा होतो व शत्रु कसा होतो तें सांगतातः—

**बंधुरात्मात्मनस्तस्य येनात्मैवात्मना जितः**
**अनात्मनस्तु शत्रुत्वे वर्तेतात्मैव शत्रुवत्** ६

**येन आत्मना एव आत्मा जितः, तस्य आत्मा आत्मनः बंधुः। अनात्मनः तु आत्मा एव शत्रुवत् शत्रुत्वे वर्तेत ।**

ज्यानें आपणच आपल्याला जिंकलें (मनोजय केला) तो स्वतःच स्वतःचा बंधु (हितकर्ता) होय. परंतु अनात्मा (मनोजय न करणारा) मनुष्य स्वतःच स्वतःच्या वैऱ्याप्रमाणें आत्मघातास कारण होईल.

[ व्यवहारांतील आत्महत्येच्या गुन्ह्याप्रमाणें परमार्थांत आपली बौद्धिक अवनति करणें हें पाप असून तें कोणींही करूं नये. प्रत्येकानें आपली आध्यात्मिक उन्नति करण्याचा शक्य तो प्रयत्न केलाच पाहिजे अशी भगवंतांची स्पष्ट आज्ञा आहे ]

**जितात्मनः प्रशांतस्य परमात्मा समाहितः**
**शीतोष्णसुखदुःखेषु तथा मानापमानयोः** ७

**जितात्मनः प्रशांतस्य आत्मा शीतोष्णसुखदुःखेषु तथा मानाऽपमानयोः परं समाहितः ।**

ज्यानें अंतःकरण जिंकलें आहे (ताब्यांत ठेवलें आहे) अशा अत्यंत शांत झालेल्या (पुरुषाचा) आत्मा (बुद्धि) शीत उष्ण, सुखदुःख, त्याचप्रमाणें मानापमान (इत्यादि द्वंद्वें) ह्यांविषयीं परम म्हणजे अत्यंत सम झालेला असतो.

**ज्ञानविज्ञानतृप्तात्मा कूटस्थो विजितेंद्रियः**
**युक्त इत्युच्यते योगी समलोष्टाश्मकांचनः** ८

**ज्ञानविज्ञानतृप्तात्मा विजितेंद्रियः समलोष्टाश्मकांचनः कूटस्थः योगी युक्तः इति उच्यते ।**

आत्मज्ञान व सृष्टिज्ञान यांनीं ज्याचें अंतःकरण तृप्त झालें आहे (सर्व ज्ञान ज्याला पूर्णपणें झालें आहे), जो जितेंद्रिय आहे, ज्याला माती, दगड व सोनें हें सारखेंच वाटत आहे (उपभोगतृष्णाशून्यतेमुळें ज्याला त्याचें महत्त्व उरलें नाहीं), अशा बुद्धीचे ठिकाणीं प्रकाशकत्वानें (निर्विकार) असणाऱ्या (आत्मज्ञानानें प्रकाशित झालेल्या सात्त्विक बुद्धीनें नियत कर्में करणाऱ्या) कर्मयोगी पुरुषासच **युक्त** म्हणजे **योगारूढ** म्हणतात.

[अ. २ श्लो. ४५ यांतील बुद्धियोगाची पूर्णताच ह्या दोन श्लोकांत मिळून दर्शविली आहे.]

**सुहृन्मित्रार्युदासीनमध्यस्थद्वेष्यबंधुषु**
**साधुष्वपि च पापेषु समबुद्धिर्विशिष्यते** ९

**सुहृन्मित्रार्युदासीनमध्यस्थद्वेष्यबंधुषु, साधुषु, पापेषु च अपि, समबुद्धिः विशिष्यते ।**

हितकर्ता, मित्र, वैरी, तटस्थ, मध्यस्थ, द्वेष करण्यासारखा, बांधव, सज्जन आणि दुर्जन यांच्याविषयीं समबुद्धि ठेवणारा (स्थितप्रज्ञ) श्रेष्ठ होय.

[पूर्वी अ. ५ श्लोक २ ते २४ अखेर प्रतिपादन केलेल्या विषयांचा येथें श्लोक १ ते ८ अखेर थोडक्यांत अनुवाद करून पांचव्या अध्यायांतील २९ व्या श्लोकांत सांगितलेलें सिद्धावस्थेंतील व्यवहाराचें स्वरूप येथें ९ व्या श्लोकांत स्पष्ट केलें आहे.

मानवी प्राणी व इतर प्राणी या सर्वांमध्यें एकच तत्त्व सारखें भरलेलें आहे अशी ज्ञानी पुरुषांची समदृष्टि असते, असें अ. ५, श्लो. १८ यांत सांगून पुढें त्याच अध्यायांतील २५ व्या श्लोकांत जीवन्मुक्त ज्ञानी सर्व प्राणिमात्रांचें हित करण्याविषयीं तत्पर असतात, असें त्यांच्या व्यवहाराचें वर्णन केलें आहे. व्यवहारांत चांगल्याशीं चांगलें व वाइटाशीं वाईट म्हणजे **जशास तसें** वागणें योग्य मानलें जातें, हेंच तत्त्व **महाभारत** व **स्मृति** इत्यादि ग्रंथांतही मान्य झालेलें आहे.असें असतां, जीवन्मुक्तांचा सर्वभूतहितकारक व्यवहार समदृष्टीनें चालतो, तो वरील व्यावहारिक व शास्त्रसंमत नियमाच्या विरुद्ध असतो कीं काय? सुष्ट आणि दुष्ट प्राण्यांचें हित करण्याची त्याची पद्धति एकच असते कीं काय? त्याचप्रमाणें प्राणिमात्रांच्या निरानिराळया स्वभावांचें त्याला भिन्नत्वानें ज्ञान असतें कीं नाहीं? असे प्रश्न सहज उद्भवतात.**भगवद्गीतेच्या** म्हणजे **कर्मयोगशास्त्राच्या** दृष्टीनें वरील प्रश्नांचें उत्तर असें आहे कीं, जीवन्मुक्त व्यवहारांत जशास तसें ओळखूनच त्यांचें हित करण्याच्या हेतूनें त्यांच्याशीं त्यांच्या त्यांच्या पात्रतेप्रमाणें वागत असतो. तो एखाद्यावर अनुग्रह करितो तो जसा त्याच्या हिताकरितां असतो, त्याप्रमाणेंच प्रसंगविशेषीं त्यानें एखाद्यास शासन केलें तरी तें त्याच्या हिताकरितांच असतें. त्यांत त्याची सूड घेण्याची बुद्धि जीवन्मुक्ताच्या अंतःकरणांत असत नाहीं. म्हणून सर्वभूतहितरत जीवन्मुक्त कर्मयोग्याचा प्रतिकारदेखील नेहमीं उग्रस्वरूपाचा असत नाहीं. ह्यावरून, सज्जनास सज्जन व दुर्जनास दुर्जन समजूनच त्याच्या त्याच्या पात्रतेनुरूप त्यांच्या हिताचा प्रयत्न करणें हेंच समबुद्धीचें लक्षण होय, असें ठरतें.]

आतां उपक्रमांत सांगितल्याप्रमाणें, कर्मयोगाच्या पूर्णतेस अवश्य असलेल्या इंद्रियनिग्रहास व मनोनिग्रहास उपयुक्त होणाऱ्या अभ्यासयोगाच्या विवेचनास आरंभ करितातः—

**योगी युंजीत सततमात्मानं रहसि स्थितः**
**एकाकी यतचित्तात्मा निराशीरपरिग्रहः** १०

**योगी एकाकी, यतचित्तात्मा, अपरिग्रहः, निराशीः, रहसि स्थितः, सततम् आत्मानम् युंजीत।**

योग्यानें (अभ्यासयोगानें) एकट्यानें मन व बुद्धि यांचा निग्रह

करून, उपभोगसामग्री जवळ न ठेवितां, व विषयवासनांचा त्याग करून एकांतीं बसून **सततं** म्हणजे **प्रतिदिवशीं** चित्त एकाग्र करावें (करण्याचा प्रयत्न करावा).

**शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः**
**नात्युच्छ्रितं नातिनीचं चैलाजिनकुशोत्तरम्** ११
**तत्रैकाग्रं मनः कृत्वा यतचित्तेंद्रियक्रियः**
**उपविश्यासने युंज्याद्योगमात्मविशुद्धये** १२

**शुचौ देशे, न अत्युच्छ्रितम्, न अतिनीचम्, चैलाजिनकुशोत्तरम् आत्मनः स्थिरम् आसनम् प्रतिष्ठाप्य, तत्र आसने उपविश्य, मनः एकाग्रम् कृत्वा, यतचित्तेंद्रियक्रियः, आत्मविशुद्धये योगम् युंज्यात्।**

स्वच्छ (पवित्र) ठिकाणीं, फार उंच नव्हे किंवा फार सखल नव्हे असें, वस्त्र, कृष्णाजिन व दर्भासन एकावर एक (प्रथम दर्भासन त्यावर कृष्णाजिन व त्यावर वस्त्र) आहेत असें आपलें न डळमळणारें आसन मांडून त्या आसनावर बसून, मन एकाग्र करून चित्त व इंद्रियें यांचे व्यापार बंद ठेवून अंतःकरणाची शुद्धि होण्याकरितां योगाभ्यास करावा.

**समं कायशिरोग्रीवं धारयन्नचलं स्थिरः**
**संप्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन्** १३
**प्रशांतात्मा विगतभीर्ब्रह्मचारिव्रते स्थितः**
**मनः संयम्य मच्चितो युक्त आसीत मत्परः** १४

**कायशिरोग्रीवम् समम् अचलम् धारयन्, स्थिरः, स्वम् नासिकाग्रम् संप्रेक्ष्य, दिशः अनवलोकयन् च, प्रशांतात्मा, विगतभीः, ब्रह्मचारिव्रते स्थितः, मनः संयम्य, मच्चित्तः, मत्परः, युक्तः, आसीत्।**

काय, मस्तक व मान सरळ व अचल ठेवून, स्थिर होत्साता, स्वतःच्या नासिकाग्रावर दृष्टि ठेवून, सभोंवतीं न पाहतां, शांतचित्त, निर्भय, व ब्रह्मचर्यव्रतानें राहिलेला, मनाचें संयमन करून, माझ्या

(परमेश्वराचे) ठिकाणींच चित्त ठेवणारा, व मत्परायण (ईश्वरपरायण) अशा अभ्यासयोगयुक्तानें (अभ्यासास) बसावें.

[ अंतःकरणाची शुद्धि करणें हाच योगाभ्यासाचा उद्देश येथें दर्शविला आहे.]

**युंजन्नेवं सदात्मानं योगी नियतमानसः**
**शांतिं निर्वाणपरमां मत्संस्थामधिगच्छति** १५

**एवम् नियतमानसः, आत्मानम् सदा युंजन् योगी, निर्वाणपरमाम् मत्संस्थाम् शांतिम् अधिगच्छति।**

ह्याप्रमाणें ज्याचें मन निग्रहयुक्त झालें आहे अशा (अभ्यास) योग्याला सतत चित्त एकाग्र केल्यानें (ध्यानधारणा केल्यानें) आनंद-युक्त, व माझ्या ठिकाणीं असलेल्या (ईश्वरी) शांतीचा लाभ होतो.

**नात्यश्नतस्तु योगोऽस्ति न चैकांतमनश्नतः**
**न चातिस्वप्नशीलस्य जाग्रतो नैव चार्जुन** १६

**अर्जुन ! तु अत्यश्नतः योगः न अस्ति। एकांतम् अनश्नतः च न। अतिस्वप्नशीलस्य च न। जाग्रतः च न एव।**

परंतु अर्जुना! अति खाणाऱ्या मनुष्याला (हा) योग साध्य नाहीं. त्याचप्रमाणें, अगदींच न खाणाऱ्यालाही साध्य नाहीं. आणि अति झोंप घेणाऱ्याला साध्य नाहीं. तसाच अति जागरण करणाऱ्याला-देखील साध्य नाहीं.

**युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु**
**युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा** १७

**युक्ताहारविहारस्य कर्मसु युक्तचेष्टस्य, युक्तस्वप्नावबोधस्य योगः दुःखहा भवति।**

ज्याचे यथायोग्य आहारविहार आहेत, ज्याचा कामकाजांतील व्यायाम प्रमाणशीर आहे. व ज्याची झोंप व जागृतावस्था योग्य प्रमाणांत आहे, त्याचाच अभ्यासयोग दुःखनाशक होतो.

[ अव्यवस्थित वागणाऱ्या मनुष्यास कोणताही योग साध्य होणें शक्य नसतें.]

**यदा विनियतं चित्तमात्मन्येवावतिष्ठते**
**निस्पृहः सर्वकामेभ्यो युक्त इत्युच्यते तदा** १८

**यदा विनियतम् चित्तम् आत्मनि एव अवतिष्ठते, सर्वकामेभ्यः निस्पृहः, तदा युक्तः इति उच्यते ।**

जेव्हां (असें) नियमित झालेलें अंतःकरण आत्म्याच्याच ठिकाणीं स्थिर होतें (एकाग्र होतें) व सर्व उपभोगांविषयींची आसक्ति नष्ट होते, तेव्हां (त्याला) योगी असें म्हणतात.

**यथा दीपो निवातस्थो नेंगते सोपमा स्मृता**
**योगिनो यतचित्तस्य युंजतो योगमात्मनः** १९

**आत्मनः योगं युंजतः योगिनः यतचित्तस्य, निवातस्थः दीपः यथा न इंगते, सा उपमा स्मृता ।**

मनाच्या एकाग्रतेचा अभ्यास करणाऱ्या योग्याच्या नियतचित्ताला निवाऱ्याच्या ठिकाणीं असलेला दिवा (दीपज्योति) ज्याप्रमाणें हलत नाहीं, ती उपमा मानिली आहे ( निवाऱ्यांतील दिव्याच्या न हलणाऱ्या ज्योतीप्रमाणें योग्याचें मन निश्चल असलें पाहिजे).

**यत्रोपरमते चित्तं निरुद्धं योगसेवया**
**यत्र चैवात्मनात्मानं पश्यन्नात्मनि तुष्यति** २०

**यत्र योगसेवया निरुद्धम् चित्तम् उपरमते । यत्र च, आत्मना आत्मनि एव आत्मानम् पश्यन् तुष्यति ।**

ज्या स्थितींत योगाभ्यासानें वृत्तिशून्य झालेलें चित्त शांत होतें आणि ज्या स्थितींत अंतःकरणानें आत्म्याला स्वतःचे ठिकाणीं अवलोकन करणारा संतुष्ट होतो.

**सुखमात्यंतिकं यत्तद्बुद्धिग्राह्यमतींद्रियम्**
**वेत्ति यत्र न चैवायं स्थितश्चलति तत्त्वतः** २१

**यत् अतींद्रियम्, बुद्धिग्राह्यम्, तत् आत्यंतिकम् सुखम् । यत्र स्थितः अयम् वेत्ति, तत्त्वतः न चलति च ।**

जें इंद्रियांच्या पलीकडील व बुद्धीनेंच ग्रहण करण्यास योग्य

असें निरतिशय, सुख ज्या स्थितींत हा (योगी) जाणतो (अनुभवितो), व ज्या स्थितींतून तत्त्वतः कधींच ढळत नाहीं;

**यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः**
**यस्मिन् स्थितो न दुःखेन गुरुणापि विचाल्यते** २२

**यम् लब्ध्वा, अपरम्, ततः अधिकम् न मन्यते, च यस्मिन्, स्थितः, गुरुणा अपि दुःखेन न विचाल्यते।**

जी स्थिति प्राप्त झाल्यावर (योगी) इतर लाभाला त्याहून अधिक (श्रेष्ठ) मानीत नाहीं व ज्या स्थितींत असतांना मोठ्या (दारुण) दुःखानेंदेखील चंचल होत नाहीं.

**तं विद्याद्दुःखसंयोगवियोगं योगसंज्ञितम्**
**स निश्चयेन योक्तव्यो योगोऽनिर्विण्णचेतसा** २३

**तम् दुःखसंयोगवियोगम् योगसंज्ञितम् विद्यात्। सः योगः अनिर्विण्णचेतसा निश्चयेन योक्तव्यः।**

ज्यांत दुःखप्राप्तीचा अभाव असतो, अशा त्या स्थितीलाच योग अशी संज्ञा आहे, असें समजावें. तो योग निर्भय मनानें व निश्चयानें संपादन करावा (त्याचा अभ्यास करावा).

[ह्याप्रमाणें श्लोक १० ते २३ अखेर वर्णिलेलें 'अभ्यासयोग प्रकरण' सांख्य-निष्ठेस जसें आवश्यक मानण्यांत येतें, तसें कर्मयोगनिष्ठेंत मानण्यांत येत नाहीं. कारण, कर्मयोगनिष्ठेंतही अवश्य असलेला मनोनिग्रह संपादन करण्यास अभ्यासयोग हें एकच साधन नसून, मनोनिग्रह साध्य होण्यास ह्यापेक्षां सुखकर म्हणजे अल्पायासाचें दुसरें साधन आहे. तेंच ह्यापुढें सांगितलें आहे.]

**संकल्पप्रभवान्कामांस्त्यक्त्वा सर्वानशेषतः**
**मनसैवेंद्रियग्रामं विनियम्य समंततः** २४
**शनैः शनैरुपरमेत् बुध्या धृतिगृहीतया**
**आत्मसंस्थं मनः कृत्वा न किंचिदपि चिंतयेत्** २५

**सर्वान् संकल्पप्रभवान् कामान् अशेषतः त्यक्त्वा, मनसा एव इंद्रिय-ग्रामम् समंततः विनियम्य, शनैः शनैः उपरमेत्। धृतिगृहीतया बुध्या मनः आत्मसंस्थम् कृत्वा, किंचित् अपि न चिंतयेत्।**

विषयचिंतनापासून उत्पन्न होणाऱ्या सर्व वासनांचा निःशेष त्याग करून, इंद्रियसमूहाचें बाह्य विषयांपासून मनानेंच ( आसनप्राणायामादि बाह्य उपायांची अपेक्षा न ठेवतां ) नियमन करून, हळुहळू (क्रमाक्रमानें) समता संपादन करावी, आणि धारणायुक्त बुद्धीनें मन आत्मस्वरूपाचे ठिकाणीं स्थिर करून कशाचीही चिंता करूं नये.

[ धारणा म्हणजे दृढनिश्चयानें युक्त बौद्धिक प्रयत्नानेंच मनाचा व तद्द्वारा इंद्रियांचा निग्रह कसा करावा हें या दोन श्लोकांत बुद्धियोगाला अनुसरूनच सांगितलें आहे; मागील अध्यायांतील नित्यसत्त्वस्थाधिकरणांत वर्णिलेली साम्यावस्था संपादन करण्याचें साधन म्हणून येथें आंतर-अभ्यासाचें विवेचन केलें आहे. मागील आसन-प्राणायामादि बाह्य अभ्यासापेक्षां हा **अंतराभ्यास** अधिक परिणामकारक असून सुलभ आहे, असें येथें भगवंतांनीं विधान केलें आहे. मागील अभ्यासयोगापेक्षां सुलभ असा हा **अंतराभ्यासयोग** किंवा **साम्ययोग** हा कर्मयोगांत प्राह्य आहे.]

**यतो यतो निश्चरति मनश्चंचलमस्थिरम्**
**ततस्ततो नियम्यैतदात्मन्येव वशं नयेत्** २६

**चंचलम्, अस्थिरम् मनः यतः यतः निश्चरति, ततः ततः एतत् नियम्य, आत्मनि एव वशम् नयेत्।**

चंचल व अस्थिर मन जिकडे जिकडे धावतें, तिकडून तिकडून त्याचा निग्रह करून आत्मवशच करावें.

[ मनाचा चंचलपणा नाहींसा करून त्याला स्थिर करणें, हें सात्त्विकबुद्धीचें कार्य आहे. ]

**प्रशांतमनसं ह्येनं योगिनं सुखमुत्तमम्**
**उपैति शांतरजसं ब्रह्मभूतमकल्मषम्** २७

**हि शांतरजसं प्रशांतमनसम् ब्रह्मभूतम् एनम् योगिनम्, अकल्मषम् उत्तमम् सुखम् उपैति।**

कारण (चंचलत्व) दोष नाहींसा झाल्यामुळें ज्याचें मन शांत झालें आहे, अशा ब्रह्मनिष्ठ कर्मयोग्याला निर्मल अतएव उत्तम सुख प्राप्त होतें.

**युंजन्नेवं सदात्मानं योगी विगतकल्मषः**
**सुखेन ब्रह्मसंस्पर्शमत्यंतं सुखमश्नुते** २८

**एवम् आत्मानम् सदा युंजन् विगतकल्मषः योगी सुखेन ब्रह्मसंस्पर्शम् अत्यंतम् सुखम् अश्नुते।**

ह्याप्रमाणें नेहमीं अंतःकरण स्थिर ठेवणारा निष्पाप योगी (कर्मयोगी) अनायासानें ब्रह्मप्राप्तिस्वरूप निरतिशय सुख सेवन करितो.

[ २४ व्या श्लोकापासून येथपर्यंत शुद्ध बुद्धीनें मनाचें स्थैर्य संपादन करण्याविषयीं जें विवेचन केलें आहे तें साम्ययोगाच्या अभ्यासाचें वर्णन आहे. पूर्वीच्या प्रकरणांत आसन-प्राणायामादि अभ्यासानें चित्ताची एकाग्रता ( ध्यान ) करण्याचा मार्ग सांगितला, त्याचप्रमाणें त्यापेक्षां सुलभ असा, बौद्धिक प्रयत्नानें चित्ताची एकाग्रता म्हणजे साम्यसंपादन करण्याचा हा दुसरा कर्मयोगांतील मार्ग सांगितला आहे. ह्या मार्गानें अंतःकरणाचें साम्य सिद्ध झालें म्हणजे बुद्धियोग पूर्ण होऊन ब्रह्मसाक्षात्कार होतो, असें शेवटीं सांगितलें आहे व हा मार्ग मागील अभ्यासयोगापेक्षां अत्यंत सुलभ आहे असें सुखेन या पदावरून २५ व्या श्लोकांतील विधानांचें निगमन केलें आहे.]

या अंतराभ्यासानें ज्याची बुद्धि पूर्ण सम झाली आहे अशा पुरुषांचा उपासनामय व्यवहार कसा असतो तें सांगतातः—

**सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि**
**ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः** २९

**योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः, सर्वभूतस्थम्, आत्मानम् आत्मनि सर्वभूतानि च ईक्षते।**

योगयुक्त चित्त असलेला व सर्वत्र एकसारखेंच (तत्त्व) पाहणारा (स्थितप्रज्ञ) सर्व पदार्थांमध्यें आत्मा व आत्म्याचे ठिकाणीं सर्व पदार्थ पाहतो.

[ सर्वत्र ब्रह्मतत्त्व पाहणारा स्थितप्रज्ञ सर्वसृष्टीमध्यें जें ब्रह्मतत्त्व व्यापून राहिलें आहे तेंच आपल्या ठिकाणीं आत्मस्वरूपानें भरलें आहे, हें पूर्ण ओळखतो. ही कर्मयोगांतील अव्यक्तोपासनेची पूर्णावस्था होय.]

**यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति**
**तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति ३०**

**यः माम् सर्वत्र पश्यति, सर्वम् मयि पश्यति च। तस्य अहम् न प्रणश्यामि। सः च मे न प्रणश्यति।**

जो मला (परमेश्वराला) सर्व ठिकाणीं पाहतो व सर्व सृष्टि माझ्या ठिकाणीं (परमेश्वराचे ठिकाणीं) पाहतो, त्याला मी (परमेश्वर) नाहींसा होत नाहीं.

[ आपल्यालासुद्धां सृष्टि परमेश्वरस्वरूपच आहे अशी दृढ भावना होणें ही कर्मयोगांतील व्यक्तोपासनेची पूर्णावस्था होय. ह्याप्रमाणें व्यक्त व अव्यक्त असे उपासनेचे दोन प्रकार सांगितले असले तथापि दोहोंतही अद्वैतबुद्धीच असल्यामुळें त्यांत तात्त्विक भेद विलकूल नाहीं, हें उघड आहे. उपासनेचीं हीं दोन स्वरूपें मागें अध्याय ४ श्लोक ३५ येथेंही आलीं आहेत.]

अध्याय ५ श्लोक २५ व अध्याय ६ श्लोक ९ यांस अनुलक्षून सिद्धावस्थेंतील व्यवहाराचा पुनः उल्लेख करितातः—

**सर्वभूतस्थितं यो मां भजत्येकत्वमास्थितः**
**सर्वथा वर्तमानोऽपि स योगी मयि वर्तते ३१**

**यः एकत्वम् आस्थितः सर्वभूतस्थितम् माम् भजति। सः योगी सर्वथा वर्तमानः अपि मयि वर्तते।**

जो साम्यावस्था प्राप्त झालेला (कर्मयोगी) सर्वभूतीं असलेल्या माझी (परमेश्वराची) सेवा करितो, तो कर्मयोगी सर्व प्रकारें कर्मे करीत असतांही माझ्या ठिकाणीं (परमेश्वरनिष्ठ) असतो.

[ सर्वभूतहितार्थ जें जें कर्म स्थितप्रज्ञ कर्मयोगी करीत असतो, तें सर्व ईश्वरोपासनारूपच असतें. कारण सर्वत्र ईश्वर भरलेला आहे ही त्याची भावना अढळ असते.]

सिद्धावस्थेंतील व्यवहाराचें मूलतत्त्व सांगतातः—

**आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन**
**सुखं वा यदि वा दुःखं स योगी परमो मतः ३२**

**यः सर्वत्र सुखम् वा, यदि दुःखम् वा, आत्मौपम्येन समम् पश्यति सः योगी परमः मतः।**

अर्जुना! जो सर्वांभूतीं सुख किंवा दुःख आत्मौपम्यदृष्टीनें (आपल्या स्वतःप्रमाणेंच) सम पाहतो, तो कर्मयोगी अत्यंत श्रेष्ठ होय, असें मी समजतों.

[ सर्वांभूतीं एकच परमेश्वरी तत्त्व भरलें आहे, असें ज्ञान असल्यावांचून, आपल्याप्रमाणेंच इतर प्राण्यांनाही, सुखदुःख होतें ह्या परमश्रेष्ठ नीतितत्त्वाची यथार्थ उपपत्ति समजणें शक्य नाहीं. प्राणिमात्रांचे स्वभाव व व्यवहार (गुणकर्मे) भिन्न भिन्न प्रकारचीं असल्यामुळें त्यांचीं सुखदुःखांचीं साधनेंही भिन्न भिन्न असतात हें उघड आहे. ह्याप्रमाणें साधनें भिन्न असलीं तथापि त्यांपासून होणाऱ्या सुख-दुःखांचे बाह्य परिणाम प्रफुल्लता व म्लानता ह्यांत पूर्ण सादृश्य दिसून येत असल्यामुळें, त्यांच्या मुळाशीं असलेली संवेदना एकच असली पाहिजे असें सिद्ध होतें, व ही संवेदना सर्व स्थावर-जंगम पदार्थांत विद्यमान असते, असें प्राचीन शास्त्राप्रमाणेंच अर्वाचीन शोधांनींही सिद्ध झालें आहे. ह्या संवेदनेच्या एकत्वावरून व व्यापकत्वावरून सर्वांभूतीं एकच आत्मतत्त्व भरलें आहे, असें वेदांतशास्त्रानें सिद्ध केलें आहे. हा सिद्धान्त ज्याला पूर्णपणें समजेल, त्याच्याच व्यवहारांत आत्मौपम्यदृष्टि सदैव जागृत असते, म्हणजे, स्वतःला ज्याप्रमाणें सुखदुःख होत असतें तसेंच तें इतरांसही होतें, हें सदैव ध्यानांत ठेवून तो आपला व्यवहार चालवीत असतो.]

ह्याप्रमाणें भगवंतांनीं मनाची साम्यावस्था संपादन करण्याचा सोपा म्हणून सांगितलेला उपाय सुलभ नाहीं असें वाटून अर्जुन म्हणतोः—

**अर्जुन उवाच**

**योऽयं योगस्त्वया प्रोक्तः साम्येन मधुसूदन**
**एतस्याहं न पश्यामि चंचलत्वात्स्थितिं स्थिराम् ३३**

**मधुसूदन! यः अयम् साम्येन योगः त्वया प्रोक्तः, एतस्य स्थिराम् स्थितिम् ( मनसः ) चंचलत्वात् अहम् न पश्यामि ।**

अर्जुन म्हणाला—भगवंता! जो हा (मनाच्या) साम्यानें युक्त असा योग तुम्हीं मला सांगितला, त्याचें स्थैर्य (साम्य), मनाच्या चंचलत्वामुळें, होईल असें दिसत नाहीं.

**चंचलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवद्दृढम्**
**तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम्** ३४

**हि, कृष्ण! मनः चंचलम्, प्रमाथि बलवत्, दृढम् तस्य निग्रहम् वायोः इव सुदुष्करम् अहम् मन्ये।**

कारण हे कृष्णा! मन (अतिशय) चंचल, उच्छृंखळ, अनावर व चिवट असल्यामुळें, त्याचा निग्रह वायूप्रमाणें अत्यंत दुष्कर होय, असें मला वाटतें.

**श्रीभगवानुवाच**

**असंशयं महाबाहो मनो दुर्निग्रहं चलम्**
**अभ्यासेन तु कौंतेय वैराग्येण च गृह्यते** ३५

**महाबाहो! मनः असंशयम् चलम् दुर्निग्रहम्। तु कौंतेय! अभ्यासेन वैराग्येण च गृह्यते।**

श्रीभगवान् म्हणाले—अर्जुना! मन चंचल व अनिवार आहे खरें; परंतु हे कौंतेया! अभ्यासानें (म्हणजे २५ व २६ व्या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें क्रमाक्रमानें) आणि वैराग्यानें (म्हणजे विषयोपभोगाची आसक्ति सोडल्यानें) त्याचा निग्रह करतां येतो.

**असंयतात्मना योगो दुष्प्राप इति मे मतिः**
**वश्यात्मना तु यतता शक्योऽवाप्तुमुपायतः** ३६

**असंयतात्मना, योगः दुष्प्रापः। यतता तु उपायतः अवाप्तुम् शक्यः इति मे मतिः।**

आत्मसंयमन न करणाऱ्या पुरुषाला हा साम्ययोग प्राप्त होणें कठीण आहे, परंतु अभ्यासी आत्मसंयमन करणाऱ्या पुरुषाला (योग्य) उपायांनीं (तो) प्राप्त होणें शक्य आहे, असें माझें निश्चित मत आहे.

**अर्जुन उवाच**

**अयतिः श्रद्धयोपेतो योगाच्चलितमानसः**
**अप्राप्य योगसंसिद्धिं कां गतिं कृष्ण गच्छति** ३७

**कृष्ण! श्रद्धया उपेतः अयतिः योगात् चलितमानसः, योगसंसिद्धिम् अप्राप्य काम् गतिम् गच्छति ?।**

हे कृष्णा ! श्रद्धायुक्त, पण अभ्यास न झाल्यामुळें, ज्याचें मन (साम्य-) योगापासून ढळलें आहे, त्याचा योग पूर्ण न झाल्यामुळें, (तो) कोणत्या गतीला जातो ? (काय परिणाम होतो ?)

**कच्चिन्नोभयविभ्रष्टश्छिन्नाभ्रमिव नश्यति**
**अप्रतिष्ठो महाबाहो विमूढो ब्रह्मणः पथि ३८**

**महाबाहो ! विमूढः ब्रह्मणः पथि अप्रतिष्ठः, उभयविभ्रष्टः छिन्नाभ्रम् इव न नश्यति कच्चित् ?।**

हे कृष्णा ! (मनाच्या चांचल्यानें) विवेकशून्य झालेला, (म्हणूनच) अमृतत्वप्राप्तीच्या मार्गांत स्थिर न झालेला ( अर्धवट योगी ) ऐहिक व परमार्थिक ह्या दोन्ही गतींस मुकून, फुटक्या ढगाप्रमाणें नाश पावत नाहीं ना ? ( त्याचा अधःपात होतो काय ? )

**एतन्मे संशयं कृष्ण छेत्तुमर्हस्यशेषतः**
**त्वदन्यः संशयस्यास्य छेत्ता न ह्युपपद्यते ३९**

**कृष्ण! मे एतत् संशयम् अशेषतः छेत्तुम् अर्हसि। हि अस्य संशयस्य छेत्ता, त्वदन्यः न उपपद्यते।**

हे कृष्णा ! हा माझा संशय पूर्णपणें दूर करण्यास तुम्ही समर्थ आहां, कारण हा संशय नष्ट करणारा तुमच्यावांचून कोणीही समर्थ नाहीं !

**श्रीभगवानुवाच**

**पार्थ नैवेह नामुत्र विनाशस्तस्य विद्यते**
**न हि कल्याणकृत्कश्चिद्दुर्गतिं तात गच्छति ४०**

**पार्थ ! तस्य विनाशः इह न, अमुत्र न एव विद्यते हि, तात ! कल्याणकृत् कःचित् दुर्गतिं न गच्छति।**

श्रीभगवान् म्हणाले—अर्जुना, त्याचा (अर्धवट योग्याचा) नाश

(अधःपात) इहलोकीं किंवा परलोकीं होत नाहीं. कारण, बाबा, सत्कर्माचरण करणारा कोणीही अधोगतीला जात नाहीं.

[ सन्मार्गानें वागणाऱ्या पुरुषाचा ऐहिक किंवा पारलौकिकदृष्ट्या नाश होत नाहीं. म्हणून आपल्या हातून साम्ययोगाचें आचरण पूर्ण झालें नाहीं, सबब आपला प्रयत्न व्यर्थ गेला की काय, अशी त्यानें चिंता बाळगण्याचें कारण नाहीं. म्हणजे आपण आचरण केलेला थोडाबहुत साम्ययोग पुढें आपल्या उपयोगी कसा पडेल आणि तो अपूर्ण राहिलेला योग पूर्ण कसा होईल, त्याविषयीं त्यानें निर्धास्त असावें म्हणजे आत्मकल्याणाचा हेतु दृढ ठेवून, कर्मयोगाच्या पूर्णते-विषयीं निर्योगक्षेम असावे, असें येथें विधान केलें आहे.]

**प्राप्य पुण्यकृतांल्लोकानुषित्वा शाश्वतीः समाः**
**शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते ४१**

योगभ्रष्टः, पुण्यकृतान् लोकान् प्राप्य, शाश्वतीः समाः उषित्वा, शुचीनाम् श्रीमताम् गेहे अभिजायते ।

योगभ्रष्ट मनुष्य पुण्यवानांच्या लोकांस प्राप्त होऊन (पुण्य करणाऱ्या लोकांना प्राप्त होणाऱ्या स्वर्गादि लोकांस प्राप्त होऊन) तेथें दीर्घकालपर्यंत राहिल्यावर, पवित्र आणि वैभवशाली पुरुषांच्या घरांत (घराण्यांत) पुन्हा जन्मास येतो.

[ योगभ्रष्ट मनुष्याला स्वर्गादि लोक प्राप्त झाल्यानंतर पुन्हा श्रीमंत घराण्यांत त्याला जन्म मिळतो असें या श्लोकांत स्पष्ट सांगितलें आहे. मात्र या श्रीमंत लोकांना **'पवित्र'** अशा अर्थाचें विशेषण दिलें आहे. यावरून पवित्रपणा सांभाळल्या-वर धनसंपत्ति परमार्थास पोषक होते असें सहजच सिद्ध करतां येण्यासारखें आहे. यावरून संपत्तीचा परमार्थाशीं स्वाभाविक विरोध आहे ही समजूत शास्त्र-दृष्ट्या निराधार आहे असें समजण्यास हरकत नाहीं. तैत्तिरीय उपनिषद व भृगुवल्ली मध्येंदेखील संपत्ति परमार्थाला अनुकूल आहे, असें सांगितलें आहे. ( भृगु०, अनुवाक १० )

**अथवा योगिनामेव कुले भवति धीमताम्**
**एतद्धि दुर्लभतरं लोके जन्म यदीदृशम् ४२**

**अथवा, धीमताम् योगिनाम् एव कुले भवति । हि, यत् ईदृशम् जन्म, एतत् लोके दुर्लभतरम् ।**

किंवा ज्ञानवान् कर्मयोग्यांच्याच कुलांत उत्पन्न होतो. कारण, अशा प्रकारचा जो जन्म, तो इहलोकीं अतिशय दुर्लभ असतो.

**तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम्**
**यतते च ततो भूयः संसिद्धौ कुरुनंदन ४३**

**कुरुनंदन ! तत्र तम् पौर्वदेहिकम् बुद्धिसंयोगम् लभते । ततः च संसिद्धौ भूयः यतते ।**

अर्जुना ! तेथें (त्या जन्मांत) तोच पूर्वजन्मींचा (अर्धवट) बुद्धियोग त्याला प्राप्त होतो. आणि तेथून पुढें तो योग पूर्ण करण्याविषयीं फिरून यत्न करूं लागतो.

**पूर्वाभ्यासेन तेनैव ह्रियते ह्यवशोऽपि सः**
**जिज्ञासुरपि योगस्य शब्दब्रह्मातिवर्तते ४४**

**सः अवशः अपि, तेन एव पूर्वाभ्यासेन ह्रियते । योगस्य जिज्ञासुः अपि शब्दब्रह्म अतिवर्तते ।**

तो ( विरुद्ध परिस्थितीमुळें ) परतंत्र असला तरी त्याच पूर्वजन्मींच्या अभ्यासानें ( अभ्यासजन्य संस्कारांनीं ) कर्मयोगाकडे आकर्षिला जातो. ( त्याचें मन कर्मयोगाकडे वळूं लागतें.) बुद्धियोगाची ( नुसती उत्कट ) जिज्ञासा ज्याला झाली आहे, असा पुरुषदेखील, निवळ शब्दज्ञानापेक्षां श्रेष्ठ असतो. ( मग योगयुक्त पुरुष सर्वांत श्रेष्ठ होईल हें निराळें सांगावयास नको.)

[ जिज्ञासाहीन मनुष्य निवळ शाब्दिक ज्ञानांतच गुरफटतो. परंतु खरा जिज्ञासू शाब्दिक ज्ञानास महत्त्व न देतां खरें तत्त्वज्ञान संपादन करतो म्हणून तो श्रेष्ठ होय. अ० २, श्लोक ४० यांतील कर्मयोगनिष्ठेच्या प्रास्ताविक वर्णनांत, अभिक्रमनाश व प्रत्यवाय कर्मयोगनिष्ठेंत उत्पन्न होत नसून, त्या धर्माचें थोडेंसें आचरण देखील मोठा अनर्थ टळण्यास कारण होतें, असें सांगितलें आहे, त्याचेंच स्पष्टीकरण वरील

श्लोक ४० ते ४४ अखेर पांच श्लोकांत केलें आहे. योगभ्रष्ट ( अभिक्रमनाश ) झालेल्या मनुष्याचा नाश न होतां, तो पुन्हा पवित्र व योग्यांच्याच कुलांत जन्म घेतो, आणि कोणत्याही अडचणीस न जुमानितां तो योगाभ्यास पूर्वीप्रमाणेंच पुढें सुरू करितो. जन्मांतर झाल्यामुळें त्याच्या बुद्धींत कोणतेंही वैगुण्य ( प्रत्यवाय ) उत्पन्न होत नाहीं. अशा रीतीनें त्याचा योग पूर्ण सिद्ध होऊन तो सर्व अनर्थांतून पार पडतो. ह्याप्रमाणें विच्छिन्न झालेला योग अजिबात नष्ट न होतां तो पुन्हा सुरू होतो. म्हणून त्यानें योगाच्या पूर्णतेविषयीं ( योगक्षेमाविषयीं ) नियोगक्षेम ( निर्धास्त ) असावें असें भगवंतांनीं येथें ४० व्या श्लोकांतील विधानाचें निगमन केलें आहे. ]

ह्याप्रमाणें बौद्धिक प्रयत्नांनीं अंतःकरणाचें साम्य संपादन करण्याच्या सोप्या मार्गाचें महत्त्व सांगून पुन्हा श्लोक १० ते २३ अखेर वर्णिलेला आसन-प्राणायामादि अभ्यासयोग ह्यापेक्षां विकट व कालांतर-साध्य कसा आहे, तें सांगतातः—

**प्रयत्नाद्यतमानस्तु योगी संशुद्धकिल्बिषः**
**अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम्**　　४५

प्रयत्नात् तु यतमानः, संशुद्धकिल्बिषः योगी अनेकजन्मसंसिद्धः, ततः पराम् गतिम् याति ।

परंतु ( आसन–प्राणायामादि ) प्रयत्नांनीं अभ्यास केल्यामुळें निष्पाप झालेला योगी म्हणजे अभ्यासयोगी, अनेक जन्मांनीं सिद्ध ( ध्यानयोगसिद्ध ) होऊन, नंतर परमगतीला जातो.

[ आसन-प्राणायामादि अभ्यासानें साध्य होणाऱ्या ध्यानयोगांत ( विशेषतः सांख्यनिष्ठेसच उपयोगी असलेल्या योगास ) कर्मयोगाला अवश्य असणारीं आत्मज्ञानादि साधनें, कमी तर नाहींतच; पण उलट कर्मयोगापेक्षांही अधिक कष्ट, अमृतत्वप्राप्तीस लागणारा अधिक कालावधि व जगताच्या धारणपोषणास अवश्य असलेल्या लोकसंग्रहाचा अभाव इत्यादि कारणांवरून ह्या मार्गापेक्षां कर्मयोग मार्गच अधिक प्रशस्त आहे, असें भगवंतांनीं सिद्ध केलें आहे. ]

**तपस्विभ्योऽधिको योगी ज्ञानिभ्योऽपि मतोऽधिकः**
**कर्मिभ्यश्चाधिको योगी तस्माद्योगी भवार्जुन**　　४६

अर्जुन! तपस्विभ्यः योगी अधिकः, ज्ञानिभ्यः च अपि अधिकः मतः। कर्मिभ्यः च योगी अधिकः, तस्मात् योगी भव ।

अर्जुना ! तपस्वी (हठयोगी) यांच्यापेक्षां व ज्ञानी ( सांख्यनिष्ठ ) पुरुषांपेक्षांही कर्मयोगी श्रेष्ठ होय. त्याचप्रमाणें कर्मठापेक्षां ( काम्य कर्में करणाऱ्यापेक्षां ) देखील कर्मयोगी श्रेष्ठ आहे. म्हणून तूं कर्मयोगी हो. ( कर्मत्याग न करतां कर्तव्यतत्पर हो.)

**योगिनामपि सर्वेषां मद्गतेनांतरात्मना**
**श्रद्धावान्भजते यो मां स मे युक्ततमो मतः ४७**

**सर्वेषाम् योगिनाम् अपि, यः श्रद्धावान् मद्गतेन अंतरात्मना माम् भजते, सः युक्ततमः मे मतः।**

सर्व योग्यांमध्येंही जो श्रद्धावान् (कर्मयोगी) माझ्या (परमेश्वराचे) ठिकाणीं तल्लीन असलेल्या अंतःकरणानें माझी उपासना करितो, तो अत्यंत श्रेष्ठ योगी होय. असें माझें (निश्चित) मत आहे.

[ प्रेमळ अंतःकरणानें केल्या जाणाऱ्या भगवदुपासनेनें कर्मयोगाला अधिकच श्रेष्ठत्व प्राप्त होतें.]

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुन-संवादे आत्मसंयमयोगो नाम षष्ठोऽध्यायः।

ह्याप्रमाणें श्रीभगवंतांनीं गाइलेल्या उपनिषदांतील ब्रह्मविद्यांतर्गत कर्मयोग-शास्त्रांतील श्रीकृष्णार्जुनसंवादापैकीं **'आत्मसंयमप्रकरण'** या नांवाचा सहावा अध्याय समाप्त झाला.

## रहस्यदीपिकेच्या सहाव्या अध्यायाचा उपसंहार.

### सहाव्या अध्यायाची विषयानुक्रमणिका.


| विषय | श्लोक |
|---|---|
| कर्मयोगाचा अनुवाद. ... ... ... ... ... | १–९ |
| बाह्य अभ्यासयोग. ... ... ... ... | १०–२३ |
| अंतराभ्यासाधिकरण. ... ... ... ... | २४–२८ |
| विश्वोपासना व आत्मौपम्य. ... ... ... | २९–३२ |

अर्जुनाचा प्रश्न. ... ... ... ३३–३४
श्रीकृष्णाचें उत्तर. ... ... ... ... ३५–३६
अर्जुनाचा प्रश्न. ... ... ... . ३७–३९
निर्योगक्षेमाधिकरण. ... ... ... . ४०–४४
बाह्याभ्यास आणि अंतराभ्यास यांची तुलना व उपसंहार. ४५–४७

कर्मयोगास अवश्य असलेला इंद्रियनिग्रह संपादन करण्याची दोन साधनें ह्या अध्यायांत सांगितलीं आहेत. एक आसन-प्राणायामादि साधनांच्या अभ्यासानें ध्यानयोगाच्या द्वारें आत्मसंयमन करणें व दुसरें ज्ञानयुक्त सात्त्विक बुद्धीनें मनाचें व तद्द्वारा इंद्रियांचें नियमन करून आत्मसंयमन संपादन करणें. ह्या दोन साधनांची तुलना करतां पहिल्यापेक्षां दुसरेंच सर्वतोपरि श्रेष्ठ ठरतें. कारण पहिल्या म्हणजे अभ्यासयोगांत शारीरिक व मानसिक कष्ट फार असून, त्या मार्गानें सिद्धि प्राप्त होण्यास कालावधिही फार लागतो, असें भगवंतांनीं स्पष्ट सांगितले आहे. शिवाय ह्या मार्गास एकांताची व इंद्रियांचे सर्व व्यापार शक्य तितके बंद करण्याची नेहमीं जरूर असल्यामुळें, अभ्यासयोग्याला समाजाच्या दृष्टीआड राहणें म्हणजे समाजापासून अलिप्त राहणें भाग पडतें. अर्थात् गिरिकंदरीं वास करणाऱ्या ह्या योग्याच्या ज्ञानाचा उपयोग, समाजास यत्किंचितही होण्याचा संभव नसल्यामुळें, लोकहिताच्या दृष्टीनें देखील हा ध्यानयोग निरुपयोगी ठरतो. परंतु दुसऱ्या म्हणजे साम्ययोगांत इंद्रियांचे व्यापार बंद करणें अवश्य नसून, ते फक्त नियमित करावयाचे असल्यामुळें, त्यांत पहिल्याइतके शारीरिक व मानसिक कष्ट होत नाहींत. त्याचप्रमाणें ज्ञानाच्या परिपाकास इंद्रियसामर्थ्याचें साहाय्य होत असल्यामुळें, सिद्धि प्राप्त होण्यास पहिल्याइतका कालावधिही लागत नाहीं (अ० ५ श्लोक ६). शिवाय, कर्मयोगी समाजात राहूनच भगवदुपासनेच्या हेतूनें सर्वभूतहितकारक कर्मे करीत असल्यामुळें, त्याच्या ज्ञानाचा (कर्मयोगाचा) आदर्शरूपानें समाजास उपयोग होऊन त्यास बुद्धिभेद न होतां, सन्मार्गाचें योग्य वळण लागतें. ह्याप्रमाणें प्रस्तुत अध्यायांतील दोन साधनांचें हें तुलनात्मक विवेचन पांचव्या अध्यायांतील कर्मयोगविशेषाधिकरणाचें अंगच आहे. प्रथम, १ ते ९ अखेर श्लोकांत पूर्वोक्त कर्मयोगश्रेष्ठत्वाचा अनुवाद करून, श्लोक १० ते २३ अखेर पहिल्या अभ्यासयोगाचें विवेचन केलें आहे. व शेवटीं २३ व्या श्लोकाच्या उत्तरार्धांत **'स निश्चयेन योक्तव्यः'** ह्या पदांनीं त्या प्रकरणाचा समारोप केला आहे. नंतर

२४व्या श्लोकांत,आसन प्राणायामादि साधनावांचून'**मनसैव**' ह्या अन्यव्यवच्छेदक पदानें दुसरें साधन सांगण्यास आरंभ करून २८ व्या श्लोकांत '**सुखेन**' ह्या पदानें त्या साधनाचें सुलभत्व दर्शवून उपसंहार केला आहे. पुढें श्लोक २८ ते ३१ अखेर, आत्मौपम्य दृष्टीनें सिद्धावस्थेंत होत असलेल्या व्यवहाराचें वर्णन केलें आहे. नंतर पुढील चार श्लोकांत ह्या साम्ययोगाच्या सुलभत्वाविषयींची अर्जुनाची शंका निवारण करून, ३७ ते ३९ अखेर तीन श्लोकांतील अर्जुनाच्या प्रश्नावरून श्लोक ४० ते ४४ अखेर नियोगक्षेमाधिकरणांत कर्मयोगमार्गांतील योग-भ्रष्ट पुरुषाचा कधींही अधःपात न होतां, तो क्रमानें योगसंसिद्ध कसा होतो, हें सांगितलें आहे. त्यांतच अध्याय २, श्लोक ४० यांतील योगनिष्ठेच्या प्रास्ताविक वर्णनाचेंही विवेचन आलें आहे. नंतर ४५ व्या श्लोकांत अभ्यासयोगांतील कष्टांचा व कालावधीचा उल्लेख करून ४६व्या श्लोकांत इतर सर्व मार्गांपेक्षां कर्मयोग श्रेष्ठ आहे असें पुन्हा स्पष्ट सांगून, '**म्हणून तुला कर्मयोगी होणेंच अवश्य आहे**' असें अर्जुनास बजाविलें आहे व अखेरीस, ह्या कर्मयोगाला प्रेमळ उपासनेची जोड मिळाली म्हणजे, त्याचें स्वरूप अधिकच उज्ज्वल व जगताला मंगलदायक होतें, असा उपसंहार करून अध्यायाची परिसमाप्ति केली आहे.

